श्रीगुरुपद-पुष्पांजुळी माला-पुष्प १ लें

॥ श्रीराम ॥

# श्रीरामदास-कथा-सारामृत



भरूनि सद्भावाचिया आंजुळी । मियां वोवीफुलें मोकलीं ।
अर्पिलीं अंघ्रींयुगुलीं । विश्वरूपाचां । (श्रीज्ञानेश्वरी).

सम्पादक
भीमराव सखाराम पारळकर



प्रकाशक
चिटणीस उदास आणि मंडळी
( श्रीसमर्थ स्टू. महाल-नागपूर )



शके १८३९ श्रीदासनवमी

किंमत १॥ रु.

# समर्पण-पत्रिका



**वैष्णवकुळीं कुळनायक। नारद प्रल्हाद सनकादिक।**
**उद्धव अक्रूर श्रीशुक। वसिष्ठादिक निज भक्त॥**

श्री ए. भा. १-१३६

या भक्तमालिकेंत पदकस्थानीं शोभणाऱ्या श्रीपरमभागवत श्रीवैष्णवाचार्य श्रीभानुदासवंशतिलक श्रीविश्वबंधु श्रीएकनाथ महाराजांच्या परमपूज्यचरणीं त्यांच्याच सारख्या संतसद्गुरुचें हें प्रथम-चरित्रपुष्प 'श्रीरामदास-कथा-सारामृत' खालील विज्ञप्तीसह अत्यंत भक्तिभावानें अर्पण करित आहे.

**तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा।**
**हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा॥**

मोरोपंत

माघ वा। ९ बुधवार
शके १८३९

श्रीसद्गुरुचरणांचा अनन्य सेवक

# श्रीरामदास-कथा-सारामृत

## अनुक्रमणिका

॥ श्रीराम ॥

# प्रस्तावना

**सांडून आपली संसारवेथा । करित जावी देवाची चिंता ।**
**निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्या चि सांगाव्या ॥**

( १ ) या श्रीसमर्थचरित्रग्रन्थाची प्रस्तावना लिहिण्याचें मी आरंभीं जितक्या तत्परतेनें कबूल केलें तितक्या च संकोचानें आज ती मला लिहावी लागत आहे. श्रीसमर्थांच्या चरित्राला प्रस्तावना नको आहे. त्यांचें चरित्र इतकें साधें, सुलभ, इतकें उदात्त, आदर्शवत्, इतकें स्वयंप्रकाशित आहे कीं, त्याची दुसऱ्या कोणी प्रस्तावना करण्याची गरज नाहीं. लहानांपासून तों थोरांपर्यंत तें सर्वांना अवगत आहे. बाराव्या वर्षीं लग्नांतून पळाले, बारा वर्षें घोर पुरश्चरण केलें, बारा वर्षें नाना तीर्थयात्रा केल्या, छत्तीस सदतीस वर्षें बहुविध व्याप केला, सर्व भरतखंडभर अनेक मठ स्थापन केले, उदंड राजकारण केलें, शिवराजावर कृपानुग्रह केला, नाना कवित्व करून, दासबोध, मनाचे श्लोक, इत्यादि अनेक ग्रन्थ निर्माण करून प्रवृत्ति आणि निवृत्ति, प्रपंच आणि परमार्थ, यांची एकवाक्यता करून साऱ्या राष्ट्राला कर्तव्योन्मुख केलें, इत्यादि श्रीचरित्रांतील ठळक गोष्टी ऐकून हि ठाऊक नाहींत, असा महाराष्ट्रीय विरळा ! तेव्हां प्रस्तावना श्रीचरित्राला नको, विवक्षित चरित्रग्रन्थाला पाहिजे.

( २ ) श्रीसमर्थांचें चरित्र लिहिण्याची परंपरा तेव्हांपासून आजतागाईत अव्याहत चालू आहे. हनुमंतस्वामींनीं बखर लिहिली, तो च शेवटचा श्रीचरित्रग्रन्थ होय, अशी कोणी हि आपली समजूत करून घेऊं नये. १६०३ पासून १७४० पर्यंत तर शेकडों भक्तांनीं श्रीसमर्थलीला गायिल्या, परंतु अवनतीच्या गेल्या शंभर वर्षांत हि लिहिले गेलेले दहा पांच लहान मोठे श्रीचरित्रग्रन्थ आह्मांस ठाऊक आहेत. या सर्व ग्रन्थांपैकीं फार

च थोडे छापले गेले आहेत. इतके चरित्रग्रन्थ दुसऱ्या कोणाच्या वाट्याला आलेले आह्मांस माहीत नाहींत. रामोपासकाला जसें रामायण तसें रामदासोपासकाला दासायन होय ! प्रभुगुण गावे ही जशी रामोपासकाला स्फूर्ति होते व एकाद दुसरें तरी कांड तो लिहितो, तद्वत् च **श्रीरामदासांकिताला** सद्गुरुलीला वर्णाव्या असें वाटतें. हें अगदीं सहज च घडतें! ही अशी परंपरा चालत आली आहे व अखंड चालावयाची आहे. त्या परंपरेला अनुसरून अगदीं अलिकडचा ग्रन्थ ह्मणजे प्रस्तुतचें **श्रीरामदासकथासारामृत** होय.

( ३ ) इतके चरित्रग्रन्थ आधीं च असतां, आणखी त्यांत भर कशास हवी, अशी शंका तिऱ्हाइताला येईल, सांप्रदायिकाला येणें शक्य नव्हे ! एक **वाल्मीकिप्रणीत रामायण** असतां, आणखी हजारों रामायणें कशास पाहिजेत ? कांहीं कांहींचें तर रामायण एकदां लिहून समाधान होत नाहीं. **मोरोपंतांनीं** एक शें आठ रामायणें लिहिलीं तरी त्यांचा हव्यास पुरला होता कीं नाहीं, कोण जाणे ! आमच्या **गिरिधरांनीं** निरनिराळीं सात रामायणें लिहिलीं ! कां ? कथानकाच्या दृष्टीनें एकापेक्षां दुसऱ्यांत कांहीं निराळें आहे काय ? जर नसेल, तर मग हीं इतकीं रामायणें कां लिहावीं आणि छापावीं ? तो च न्याय श्रीसमर्थचरित्राचा. जो लिहितो तो बहुधा स्वत:च्या कल्याणार्थ लिहितो आणि त्यांत च इतरांचें कल्याण असतें म्हणून इतरांना अर्पण करितो !

**मी आपुलिया मनरंजना । चरित्ररचना आरंभिली ॥ १-१६**

असें च **अमृतकार** ह्मणत आहेत. हें अगदीं खरें आहे. दुसऱ्या कोणाला त्या ग्रन्थाची अपेक्षा असो वा नसो, स्वत:चें मात्र त्या लेखनापासून कोट कल्याण होतें.

**श्रीसमर्थ चरित्राची गोडी । माझी मज चि लागली धडफुडी ।**
**येथील शुद्ध प्रेमाची चवी गाढी । अभाविकें बापुडीं नेणती ॥१० १९८**
**मी निजनिष्ठेचिया गुणें । आदरिलें श्रीसमर्थचरित्रगाणें ।**
**श्रीसमर्थचरित्रगुणीं चित्त वेधणें । हें माझें मी च जाणे सुख पूर्ण ॥१९९**

हें असें जरी गुरुपुत्राला वाटत असतें, तरी दुसऱ्यांना हि त्या प्रेमाची थोडीशी चव असते हें तो जाणतो आणि ह्मणून तर प्रकाशनाचा उद्योग आरंभून गुरुप्रेमाची तो लूट करवीत असतो !

( ४ ) गुरुचरित्रलेखनव्यवसाय हा भक्तीचा एक श्रेष्ठ मार्ग आहे, असें मला वाटतें. या मार्गाला लागलें ह्मणजे आपोआप नवविधा भक्ति घडते. गुरुचरित्र लिहावयाचें ह्मटलें ह्मणजे संपूर्ण पूर्व चरित्रग्रन्थ वाचावे लागतात, गुरुग्रन्थांचा परिचय असावा लागतो, तत्कालीन वाङ्मयाचा अभ्यास करावा लागतो, तुलनेसाठीं इतर पूर्वोत्तर ग्रन्थांचें हि आलोडन झालेलें असावें, आणि यापरती दुसरी **श्रवण** भक्ति कोणती, गुरुचरित्रलेखन ह्मणजे च **कीर्तन** होय, चरित्र लिहितांना नाना प्रसंगांचें जें चिंतन करावें लागतें, तेणें करून **स्मरण** भक्ति अनायासें घडते, गुरुमूर्ति वारंवार आठवून श्रीचरणीं चित्त जडल्यानें **पादसेवन** निराळें उरत नाहीं, अष्टौ प्रहरांची त्यांची दिनचर्या वर्णन करणें हें च त्यांचें **अर्चन** होय, पूर्ण पुण्याईनें त्यांनीं आपला अंगिकार केलेला पाहून आपण त्यांना वारंवार देहेंविण जीं लोटांगणें घालतो तें च **वंदन** होय, त्यांचें **दास्य** पत्करिल्याशिवाय चरित्रलेखनाची मुळीं बुद्धि च होणार नाहीं, अहोरात्र तच्चरणांचा सारखा ध्यास लागून गुरुप्रेमातिरेकानें जीव कासावीस होऊन आपण त्यांच्याशीं जें हितगुज करीत असतो, तें काय **सख्य** भक्ति घडल्यावांचून होय, आणि इतक्या आठ प्रकारांनीं श्रीचरणाची निष्ठेनें भक्ति केल्यावर **आत्मनिवेदन** कितीसें दूर रहाणार ? अमृतकारांचा प्रत्यय असा च दिसतो.

**श्रीसमर्थचरित्रमहिमान । माझें मज चि आलें कळोन ।**
**सर्व काळीं श्रीसमर्थचरित्रचिंतन । परम कल्याण जीवशिवा॥**१७-३०
**श्रीसमर्थचरित्र गातां । माझी समूळ पळाली अहंता ।**
**श्रीसमर्थ हृदईं ध्यातां । देहशुद्धता परिपूर्ण जाली ॥ ३१ ॥**
**कोणी केलें काहीं । मज श्रीसमर्थचरित्रचिंतनेंविण नाहीं ।**
**श्रीसमर्थचिंतनें भवडोहीं । श्रीसमर्थें निजबाहीं तारिलें ॥ ३२ ॥**
**जन्मांतरींचें पुण्य फळलें । श्रीसमर्थश्रीचरण हृदयीं आले ।**
**तेणें वृथाभिमानासी निरासिलें । पुनीत जालों नरदेहीं ॥ ३३ ॥**

( ५ ) अशा च भावनेनें श्रीगुरुभक्तिपरायण **भीमराव सखाराम पारळकर** यांनीं हा ग्रन्थ लिहिला आहे. त्यांची गुरुनिष्ठा अवर्णनीय आहे. तिचें फळ ह्मणजे च हा प्रासादिक चरित्रग्रन्थ होय. ग्रन्थाची ओवी प्रासादिक आहे, हें मी निशंकपणें ह्मणतों व वाचकांनीं तसा प्रत्यय घेऊन माझें ह्मणणें बरोबर आहे कीं नाहीं, हे ठरवावें, अशी मी विनंति करितों. प्रासा-

दिक कवित्वाचीं श्रीसमर्थांनीं जीं लक्षणें दिलीं आहेत तीं सर्व या ग्रन्थांत आढळतात. चरित्र लिहित असतांना चरित्रकाराची वृत्ति श्रीचरणीं अगदीं तल्लीन झालेली होती, हें उघड दिसतें.

**श्रीसमर्थरामदासकृपा भारी । अवचट वचनें येतीं जिव्हाग्रीं ।**
**तें चि चरित्रलेखन करी । गर्व न धरीं मी माझा ॥ १-१७**
**करितां श्रीरामदासस्मरण चित्तीं । तंव वचनें अकस्मात आठवती ॥**
**त्रिसत्य सत्य नव्हे हे मत्कृती । संत रिझती या बोला ॥ १९ ॥**

असें चरित्रकारांनीं सांगितलें नसतें तरी तें वाचकांच्या निदर्शनास आलें असतें. गुरुकृपेवांचून हा असा ग्रन्थ हातून लिहिला जावयाचा च नाहीं, आणि ह्मणून गुरुभक्तांनीं तो अवश्य प्रेमानें वाचावा, अशी माझी विनंति आहे.

( ६ ) ग्रन्थाचे एकंदर अठरा प्रसंग आहेत. **त्रयोदशाक्षरी** मंत्रांतील एक एक अक्षरानें आरंभिलेले तेरा व **श्रीरामदास** या पंचाक्षरी मंत्राचे पांच, मिळून अठरा प्रसंगांत सर्व अमृत सांठविलें आहे. कांहीं कांहीं प्रसंग फार च सरस वठले आहेत. प्रसंग नववा व प्रसंग दहावा, हे दोन प्रसंग त्यांतल्या त्यांत मला फार आवडले. ग्रन्थकाराच्या हातून असा प्रासादिक व प्रेमभावयुक्त ग्रन्थ निर्माण झाला, याचें कौतुक वाटतें. असें चरित्र आपल्या हातून लिहविण्यानें आपल्या वाट्याला आलेल्या भाग्याबद्दल चरित्रकारानें जे अनेकदां धन्योद्गार काढले आहेत, ते सर्वथैव यथार्थ होत.

( ७ ) ग्रन्थ आजचा आहे, पण ग्रन्थाची भाषा मात्र जुनी आहे. आमच्या **राजवाड्यांच्या** हातीं या ग्रन्थाची हस्तलिखित प्रत दिली तर ते ग्रन्थ शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांतील ठरवून नक्लकारानें भाषेला क्वचित् अर्वाचीन पेहराव चढविला आहे, असा अभिप्राय देतील. सांगण्याचा भावार्थ इतका च कीं, इतकी भाषा जुनी आहे. ती **एकनाथमहाराजांच्या** भाषेच्या वळणावर जास्त गेलेली आहे. ओवीची धाटणी हि **नाथांच्या** भागवताप्रमाणें आहे. खरें खोटें त्यांना माहीत, पण एके काळीं ग्रन्थकारांचें चित्त **नाथ**भजनीं विशेष जडलें असावें, व नंतर तें तेथून कांहीं कारणानें श्रीसंप्रदायाकडे मुरडलें असावें, असें मला वाटतें. श्रीग्रन्थराज, **श्रीसमर्थप्रताप**, इत्यादि सांप्रदायिक ग्रन्थांतील शब्दयोजना क्वचित् आली

आहे, पण ग्रन्थकाराचा मुख्य भर नाथवाङ्मयावर विशेष असला पाहिजे, असें दिसतें. चरित्र **श्रीरामदासांचें** आणि भाषा **श्रीनाथांची !** यांत वावगें कांहीं च नाहीं. प्रस्तुत लेखकानें, तसा ऋणानुबंध होता ह्मणून, **श्रीसमर्थ-**चरणांचा आश्रय केला नसता, तर तो **नाथ**भजनीं च लागला असता, इतकें **नाथ**चरित्र हृदयंगम आहे.

( ८ ) असें या चरित्राचें थोडक्यांत स्वरूप आहे. **श्रीसमर्थांचें** चरित्र लिहिण्याची अजून वेळ आली नाहीं, हें जरी खरें, तरी तोंपर्यंत सर्वांनीं थांबलें च पाहिजे, असें नाहीं. **श्रीसमर्थांच्या** प्रत्यक्ष शिष्यांनीं लिहिलेलीं दहा पांच लहान मोठीं चरित्रें उपलब्ध व्हावींत, **श्रीसमर्थांच्या** हृदयाचें आविष्करण करणारीं शेकडों कागदपत्रें मिळावींत, **श्री**सांप्रदायिक कागदपत्रांचा विपुल संग्रह हातीं यावा आणि मग एकादें विस्तृत **श्रीसमर्थ**चरित्र लिहिलें जावें, असें जरी मला वाटतें, तरी त्या मार्गानें जातांना मुक्कामा मुक्कामाचे ठिकाणीं असल्या चरित्रग्रन्थांनीं मार्गदर्शकाचें काम करावें, हें योग्य च होय. चरित्र लिहिण्याचा हा मार्ग अगदीं नवीन आहे व त्या मार्गांतील पहिला मुक्काम रा. **भीमराव पारळकर** यांच्या प्रस्तुतच्या ग्रन्थानें निःसंशय गांठून पुढें येणाऱ्या **श्रीरामदासांकितांवर** मोठे उपकार करून ठेवले आहेत.

धुळें<br>१८३९ महाशिवरात्र } **शंकर श्रीकृष्ण देव**



# विनंति

ह्या आवृत्तीमध्यें क्वचित् अशुद्ध पाठ पडले आहेत, ते श्रीसमर्थ-कृपेनें पुन्हां आवृत्ति काढण्याचा समय प्राप्त झाल्यास सर्व दुरुस्त करण्यांत येतील. ग्रंथकाराची ही प्रथम कृती जाणून सूज्ञांनीं ग्रंथपरीक्षण करून आवडतील त्या सूचना केल्यास त्यांचा हि पुढील आवृत्तींत जरूर विचार केला जाईल.

**ग्रंथ-प्रकाशक**

॥ श्रीराम ॥

श्रीरामसमर्थ

# रामदासकथासारामृत

## प्रसंग १ ला

### मंगलाचरण

आदिं नारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥
ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं बद्धपद्मासनस्थं ।
पीतं वासोवसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नं ।
वामांकारूढसीता मुखकमलमिलल्लोचनं नीरदाभम् ।
नानालंकारदीप्तं दधतमुरुजटा मंडनं रामचंद्रम् ॥ १ ॥
ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम्
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ २ ॥
ध्यायेद्बालदिवाकरद्युतिनिभं देवारिदर्पापहम् ।
देवेंद्रप्रमुख प्रशस्त यशसं दैदिप्यमानं रुचा ।
सुग्रीवादि समस्त वानरयुतं सुव्यक्त तत्वप्रियम् ।
संरक्ता रुणलोचनं पवनजं पीतांबरालंकृतम् ॥ ३ ॥
गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरुरेव परंब्रह्म तस्मै श्रीगुरुवेनमः ॥ ४ ॥

गुणातीतमेकं शिवं शांतमाद्यं । मनाकाशमाकाश नित्यं विशुद्धं ।
असंगं तथा सच्चिदानंदरूपं । सदा रामदासं भजे चिद्विलासम् ॥ ५

श्रीसद्गुरु रामदासाय नमः ॥



श्री गजानन मंगळमूर्ती । मियां नमन केलें अति प्रीती । आतां सकळ काम पुरती । वांछित मानसीचे ॥१॥ राहो कंठीं सरस्वती । जे महापुरुषभार्या मूळ-प्रकृती । जियें पासोनि निपजती । नाना कवित्व-स्फूर्ती प्रबंधरचना ॥ २ ॥ नमूं श्रीगंगादेवी माता । तैसा चि सखाराम पिता । श्रीगुरू श्रीधरू पढियंता । नमन शतधा पर-मार्थबुद्धी ॥ ३ ॥ नमूं कुळेश्वरू श्रीनृहरी । जो महाभक्त प्रल्हाद कैवारी । वैकुंठींहूनि धांवला झडकरी । दैत्य दुरा-चारी विदारिला॥ ४ ॥ नमूं श्री काश्यप महा मुनी । कुळीचा कुळगुरू परंपरे लागुनी । पवित्र जन्म लाधला जनी । पितृ-गणी महालाभ जोडिला ॥ ५ ॥ नमन असो संतसज्जनीं । जे अखंड रंगले रामकृष्ण कीर्तनी । माया अविद्या ओलां-डुनी । भव पार उतरले ॥ ६ ॥ ते निवृत्ति प्रमुख ज्ञानेश सोपान । चांगया मुक्ताई जनाई श्रीनामदेव सज्जन । भानुदास श्रीएकनाथ श्रीजनार्दन । श्रीतुकारामाख्य महावैष्णव ॥ ७ ॥ इहीं ओस करोनि वैकुंठा । मृत्यलोकीं देवो आणिला पंढरी-पेठा । चंद्रभागा भिवरा वाळुवंटा । ब्रह्मसाम्राज्य निर्मिलें ॥ ८ ॥ तेथ झणत्कारती टाळ झडती मृदंग थापा । तेणें चळि-कांप सुटे महापापा । कळिकाळ यमधर्माचिया बापा । प्रळय प्रकोपा कोणी न मानी ॥ ९ ॥ ऐसे वैष्णव भले भले । मियां सर्व भावें सर्वांगेंसीं अभिवंदिले । मग साष्टांग दंडवत घातलें । श्रीरामदासचरणीं ॥ १० ॥ श्रीरामदासें चरित्रलीला केली । ती अधिकारपरत्वें महंतीं गाइली । मजहीं आवडी उपजली । जे स्वल्प चरित्र गाऊं ॥ ११ ॥ ‘ बखर ’ लिहीली हनुमंतांनीं । प्रताप वर्णिला गिरिधरांनीं । विश्राम गाइला

आत्मारामांनीं । अभंग वाणी भीमस्वामी वद्ले ॥ १२ ॥ पृथक् उद्धवसुत आणि महिपती । आवडीं महाराज चरित्र गाती । म्हणती अकरावा रुद्र श्रीमारुती । प्रतापख्याती श्रीरामदास प्रगटले ॥ १३ ॥ इतुकियाही चरित्रकारा । मियां नमन केलें एकसरा । विनवणी जी मज पामरा । प्रसाद करा संत तुम्ही ॥ १४ ॥ नेणो शास्त्र व्युत्पत्ती संस्कृत कांहीं । अंगीं कवित्व कळाकुसरी नाहीं । अनर्गळ अविचार अपस्वार्थ पाही । ऐसा मही वाढलों ॥ १५ ॥ त्या मज अज्ञानाची प्रबंध-रचना । कैसी मानेल संत सज्जना । मी आपुलिया मनरंजना । चरित्ररचना आरंभिली ॥ १६ ॥ श्रीसमर्थ रामदास कृपा भारी । अवचटे वचनें येती जिव्हाग्रीं तेचि चरित्रलेखन करी । गर्व न धरीं मी माझा ॥ १७ ॥ काय सांगो नवलपरी । मी हीन दीन असतां अनधिकारी । त्या मज मुर्खाहाती चरित्र करी । नवल तरी हेचि वहू ॥१८॥ करितां श्रीरामदासस्मरण चित्तीं । तंव वचनें अकस्मात आठवती । त्रिसत्य सत्य नव्हे हे मत्कृती । संत रिझती या बोला ॥ १९ ॥ आतां श्रीसमर्थ-देवा तूंचि श्रोतावक्ता । तैसाचि स्फूर्तिरूप माझिया चित्ता । मी माझें ऐसें ह्मणतां । तूंचि तत्वता सर्वांघटीं ॥ २० ॥ तंव संत श्रोते ह्मणती भले केले । तुंवां संत सद्गुरू एका भावें स्तविले । येणे आमुचे समाधान कीर जाहले । परी चित्त वेधलें चरित्र-श्रवणा ॥ २१ ॥ तुंवां श्रीसमर्थ पवित्र लीला । आजि श्रवण करवावी आह्मां सकळां । कोण दिवस भाग्यागळा । आजि उगवला चरित्र श्रवणा ॥ २२ ॥ तेथ भिमु ह्मणे जी तुह्मी अव-धान द्यावें । मग मियां श्रीरामदासचरित्र गावें । येतुलेनि चित्त चैतन्य पदवी पावे । ब्रह्मीभूत व्हावें सस्वरूपीं ॥ ३ ॥ श्रीरा-मदासकथासारामृत । सावधान संत श्रोते परिसोत । श्रीधर-चरणी भिमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ २४ ॥

इति श्रीरामदासकथासारामृत । भिमु विरचितं मंगलाचरणं-नाम प्रथम प्रसंग सम्पूर्ण ॥

श्रीसमर्थरामदासार्पणमस्तु

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग २ रा

आदि नारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठिकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥
श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



रामदास चरित्र गहन । येथिचें कोण जाणे महिमान । अतर्क्य अनुपम अनिर्वचन । ब्रह्म पूर्ण सनातन कीं ॥ १ ॥ तया दुरूनि भावें नमस्कारु । जयाचा श्रुति वेदां न कळे पारु । येथ कांहीं गुणरूप करु । हा विचारु न चले येथ ॥ २ ॥ सकळैक चैतन्य परब्रह्म । जो आपण व्यापोनि उरला अगम्य । अविकार अविनाश अनुपम्य । जिव शिव सम सारिखा जो ॥ ३ ॥ येथ चराचर जे कांहीं । त्याविण रितेपण तों नाहीं । नवल पाहो जातां कही । भ्रम सम्मोहीं जीव पडे ॥ ४ ॥ तया दृष्टीं पाहों जातां । तंव दृष्टीसी येत पांगुळता । करीं बोटीं दाऊं ह्मणता । ठाव रिता उरो चि नेदी ॥ ५ ॥ ऐसें हें मज नसतां ठावें । तंव संत ह्मणती तें चि तुवां गावें । आमुचे चित्त रंजवावें । लीलाभावें गाउनियां ॥ ६ ॥ मज अधिकार नसतां जाण । श्रीसंत मिळोन आज्ञापिती आपण । ह्मणती उठी करीं चरित्रकथन । आह्मी निर्वाण श्रवणेच्छु ॥ ७ ॥ कलि गिळितया लोकां । जो तारकू जाला सकौतुका । तो महाराज रुद्रावतार निका । श्रीसमर्थ देखा मानवी तनू ॥ ८ ॥ तेणें कैसा धरिला मनुष्य देहो । कोण भूमी कोण ठावो । कैसी आच-

रिली लीला स्वयमेवो । आह्मां हाव श्रवणाची ॥ ९ ॥ कैसें केलें जन्मकर्म । कोण आचरला नेमधर्म । कैसा अनुष्ठानि दाविला पुरुषोत्तम । कळावया वर्म पतितां कीं ॥ १० ॥ असुर भूपती सर्वी सर्वत्र । साम्राज्य पावतां एकछत्र । इच्छी प्रजा व्हावी स्वधर्म स्वगोत्र । छळ विचित्र आदरिला तेणें ॥ ११ ॥ तेथ धेनु विप्रांच्या कैवारे । मानवीतनू धरिजे श्रीशंकरें । स्वधर्मप्रतिपाळुनी अति निर्धारें। दुष्टां सपरिवारें निर्दाळिजे ॥१२॥ आजि तेचि सांगे पवित्रकथा । आह्मी निर्भर बैसलों श्रवणपथा । जे पवित्राही आणी पवित्रता । ते धन्य कथा संतांची ॥ १३ ॥ श्रीसंत कथा हेचि गंगा । श्रवणे पातकां नेतसे भंगा । गजबजोनि पळे कळिकाळ दांडगा । ऐसी शुभगा संतकथा॥१४॥ आह्मी कळिकाळभय घालोनि बाहेरी । तुझिये बैसलों श्रवणामाझारीं । आतां ह्मणीअवकाश न करी ।बोल निर्भरीं श्रीसमर्थकथा ॥ १५ ॥ तुझेनि मुखें जाण । वदताहे श्रीरामदास आपण । ही तंव आह्मासी बाणली खुण । न धरू अनुमान संदेह कांहीं ॥ १६॥ तेथ हर्षरोमांचित भिमु ह्मणे । जी मी तुह्मां संतांचे लडेवाळ तान्हे । नवल तरी बोवडीं वचनें । संतसज्जनीं स्वीकारिली ॥ १७ ॥ असो आतां अवधारा प्रश्णोपप्रश्ण । मागां संतश्रोतीं केले जे आपण । ते चि कथानुसंधान । सिंहावलोकने अवधारिजे ॥ १८ ॥

श्लोकः— यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवती भारत ।
अभ्युथ्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ १५ ॥
परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् ।
धर्म संस्थापनार्थाय संभवामी युगे युगे ॥ १६ ॥

श्री० भ० गीता

ह्मणोनि युगायुगाचे ठाईं । पार्था मी प्रगटे गा शेषशाई । येविषीं तूं कांहीं । संदेहडोहीं बुडो नको ॥ १९ ॥ जईं धर्माची

अवगणना । आणि अधर्म चढे मान्यपणा । तई मज गा पंडुनन्दना । अवतार कारणा येणे घडे ॥ २० ॥ ऐसें हें श्री भारतीं । देवें अर्जुना गुह्य सांगीतलें एकांतीं । सांप्रत तोचि समयो सुनिश्चिती । यथा निगुती अवधारा ॥ २१ ॥ राहिलें यज्ञ दान तप हवन । ओस जाहलीं तीर्थक्षेत्रें सम्पूर्ण । कोणी न करिती नामस्मरण । हरिकीर्तन हरिदिनी ॥ २२ ॥ उन्मत्त असुर उठावले । देव देवाळयां भंगू गेले । ऋषीश्वरीं आश्रम सांडिले । जीव पळाले दिगंतरा ॥ २३ ॥ अधर्मता नरनारीं । वर्तों लागलीं घरोघरीं । तेणें ठाकोनि आली वोहरी कली भारी मातला ॥ २४ ॥ भजन भावें ढोंग वाढलें । गुरू शिष्या भोंदू लागले । कुळीं कुळधर्म सांदीं पडिले । सत्य गलें रसातळा ॥ २५ ॥ पर्जन्य वर्षेना वार्षिक । धरा पीक पिकेना सम्यक । हा हा भूत विश्वलोक । काळ घातुक वोढवला ॥२६॥ पूर्वीं रावण कंसें होते पिडिलें । सांप्रत तेंचि विघ्र ठाकोनि आलें । धेनुविप्र रडो लागले । काय हें केलें भगवंता ॥ २७ ॥ जयजयाजी श्रीदेवदेवा । अच्युता मुकुंदा माधवा केशवा । तुज कां नये वा आमुची कणवा । विश्वभावा विश्वात्मका ॥२८॥ तुंवाचि रघुवंशीं अवतरोन । रावण विंधिला कुंभकर्ण । कंसचाणूर मर्दुन । अवतार श्रीकृष्ण यादवकुळीं ॥ २९ ॥ प्रऱ्हादाचें हाके सरसी । तुंवां येणें केलें श्रीनृसिंहवेशीं । नखें निर्दाळोनि दैत्याशी । निजदासासि कुरवाळिलें ॥ ३० ॥ हे विश्व तुझेचि निर्मिलें । प्रतिक्षणी तुझेचि प्रतिपाळिलें । पुढती प्रतिपाळूं ह्मणितलें । हें लटिके होऊं सरलें वचन तुझें ॥ ३१ ॥ तंव वैकुंठ कैलास सत्यलोक पाताळ । कम्पायमान जाहलीं एकवेळ । मृत्यलोकींचा हलकल्लोळ । कानीं सकळीं आइकिला ॥ ३२ ॥ प्रजापती इंद्र चंद्र यम कुबेर । वर्शूं लागलीं पुष्प-संभार । ह्मणती महारुद्र श्रीरामदास अवतार । होणार निर्धार

कलियुगीं ॥ ३३ ॥ वैरियें पिडिलिया वसुंधरा । हें तंव न साहवेचि श्रीशंकरा । तो आतां श्रीरामदास अवतारा । जाईल खरा मृत्यलोकीं ॥३४॥ भविष्योत्तरमहापुराणीं । वदोनि गेली श्रीव्यासवाणी । तें साचपण करावया धरणी । शूळपाणी जाईल कीं ॥ ३५ ॥

श्लोकः—कृतेतु मारुताख्याश्च त्रेतायां पवनात्मजः ।
द्वापारे भीम संज्ञश्च रामदासः कलौ युगे ॥

द्वादश वरुषें गोदातटीं । तीव्र तप आचरेल धुर्जटी । विश्व उद्धरील अति संकटीं । श्रीरघुनाथभेटी प्रेम सम्मेळीं ॥ ३६ ॥ करील धर्मसंस्थापन । नाना पाखांडखंडण । वाढवील हरिकथा नामस्मरण । जेणें संत सज्जन सुखावती ॥३७॥ विशेष श्रीरामउपासना । रोकडी दावील विश्वजना । दूर करील यमयातना । दीनोद्धारणा अवतार कीं ॥३८॥ श्रीरामनामाचिया गजरें । विश्व हेळामात्रेंचि उद्धरें । जीव जीवभावातें विसरे । पाप नुरे तेथ कांहीं ॥ ३९ ॥ विशेष कलियुगामाझारीं । हरिकथेची वाढवील थोरी । श्रीरामनवमी घरोघरीं । अती गजरीं करतिल कीं ॥ ४० ॥ आपण जाऊं मृत्यलोकां । पाहूं तेथील नवल कवतुका । ऐसें वदोनि एक एका । देवीं वैकुंठलोका सांडिलें ॥ ४१ ॥ मग मिळोनि गेले कैलासशिखरीं । स्तऊं आदरिला श्री त्रिपुरारी । ह्मणती तूं श्रीरामदासरूप धरी । धरा उद्धरीं लवलाह्या ॥ ४२ ॥ आह्मी संतरूपें एकागळीं । घेवोनि येतसों भूमंडळीं । आनंद वाढऊं विश्वीं सकळीं । सुखकल्लोळीं करूं कथा ॥ ४३ ॥ ऐसें ऐकोनि पार्वतीश सुखावले । ब्रह्मानन्दें सकळ देवां आलिंगिलें । मग मृत्यलोकीं येऊं ह्मणतिलें । निजअवतारकारणा ॥ ४४ ॥ तेथ श्री सदाशिव ह्मणती प्रसन्नचित्तें । सुर

हो एक गुह्य सांगों पां तुह्मांतें । दक्षिण देशीं सूर्याजीपंतें । पुण्य बहुत आचरिलें ॥ ४५ ॥ सूर्योपासना तीव्र करितां । तेणें प्रसन्न जाला सविता । ह्मणे कांहीं वर माग आतां । पुरवीन हेत जो कांहीं ॥ ४६ ॥ तंव तो निष्कामभाव द्विज । ह्मणे स्वामी नाशिवंत नलगे मज । कांतेसी पुसतां कुळदीपक भोज । व्हावा मज ते ह्मणे ॥ ४७ ॥ तथास्तु ऐसी प्रसन्नपणें । भाक दिधली सूर्यनारायणें । कीं प्रथम मदांशें पुत्र पूर्ण । दुजा जाणे शंकरू ॥ ४८ ॥ श्रीशंकरांशें धर्मसंस्थापणें । मदांशें गृहसंसारपणें । पुत्रोत्पत्ती येणे मानें । वरदवाणी सवित्याची ॥ ४९ ॥ यालागीं सविता जाला गंगाधरू । मी ही धरूं जातों रुद्रावतारू । तुह्मी सकळ देवकिन्नरू । मज साह्यकरू संत व्हा ॥ ५० ॥ यापरी दुःखातिशयो देखोनी । देव मिळोनि गेले शिवस्थानीं । तिहीं प्रार्थूनि प्रसन्न केला शूळपाणी । धाडिला अवनीं कैवारा ॥ ५१ ॥ ते चरित्रकथा अति रसाळ । पुढिलिये प्रसंगीं प्रांजळ । मी वर्णीन ह्मणतसें अळुमाळ । सुखकल्लोळ जी माझा ॥ ५२ ॥ मी तंव शुद्ध मतिमंद अज्ञान । करूं घातिलें चरित्रलेखन । तुह्मी मायबाप संतसज्जन । आळ पूर्ण कराल कीं ॥ ५३ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संत श्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भिमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ५४ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत भिमुविरचितं । अवतारकारण नाम द्वितीय प्रसंग सम्पूर्ण ॥

शुभं भवतु श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

छ ॥ छ ॥ छ ॥

॥ ओंवीसंख्या ५४ श्लोक ३ ॥

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ३ रा

आदि नारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



न पवनांचा वेधू । माया अविद्या अवरोधू । तेणें डहुळला संबंधू । आत्मबोधाचा ॥ १ ॥ मी मज होतों ठावा । शुद्ध स्वरूप आपुलिये गावा । जेथ षड्रिपूंचिये नांवा । शून्यत्व होतें ॥ २ ॥ ऐसा रातिदिवसा निजनिकटें । सोहंभावाचिया नेटेंपाटें । चालतां अविर्भवली अवचटें । माया उद्धटी मजमाजीं ॥ ३ ॥ तिनें वळऊनि नानापरी । मी उभा केलों संसारीं । मग शुद्धसत्वाची बोहरी । कली सत्वरी करूं आला ॥ ४ ॥ जालों परदेशीं वरपडा । कामक्रोधें लिथाडिता तडाडा । धाकें कहीं बैसो खोडा । काळ उघडा धाक दावी ॥ ५ ॥ चित्त अत्यंत निर्बुजलें । आपुलें ऐसें कोणी न उरलें । तंव अकस्मात देखिले । श्रीगुरु वहिले श्रीधरस्वामी ॥ ६ ॥ बाप स्वामी दयाकर । श्रीगुरु भेटला श्रीधर । माझा करोनियां अंगिकार । मस्तकीं अभयकर ठेविला तेणें ॥ ७ ॥ मज सन्निध बैसविलें । श्रीसमर्थदेवा न्यहाळविलें । हृदयभुवनीं अविर्भवलें । श्रीसमर्थ देखिलें दिव्यरूप मियां ॥ ८ ॥ नामस्मरणाचिया समारंभें । तेथ मी नाचों लागलों वालभें । सेवा आवडीचिया लोभें । अंग उभें श्रीगुरुचरणीं घातिलें ॥ ९ ॥ मज निरविलें श्रीसमर्थचरणीं । आपण राहिला स्वानंदभुवनीं । निजकृपाकटाक्षें करुनी । लाविलों भजनीं श्रीसमर्थजीच्या ॥ १० ॥ अहो श्रीसमर्थ आणि श्रीधरू । मज तंव दिसती एकाकारू । देह-

धर्मांचा बाडिवारू । भिन्नाकारू वेगळाले ॥ ११ ॥ हे एक एका पढियंते । भजती एक एका एकचित्तें । चालती बोलती निरुते । वसती जेथ मंगळाची ॥ १२ ॥ अहो जी भाग्योदय घडला । जंईपासोनि मज श्रीधरु भेटला । अहंभाव निपटूनि गेला । भाव जडला श्रीसमर्थचरणीं ॥ १३ ॥ श्रीधरें मज सोय दाविली । अतिकनवाळ श्रीसमर्थमाय भेटविली । येथोनि अघआपदा हरली । पापें गेलीं दिगंतरा ॥ १४ ॥ येथोनि मंगळाचा केलों । ह्मणोनि श्रीचरणीं लोटांगणीं गेलों । प्रसादखुण पावलों । मुखीं ल्यालों श्रीरामनामवाणी ॥ १५ ॥ श्रीरामनामवाणी गर्जतां । सुखस्वानंद तुंबळे चित्ता । मज बोबाडिया बोलता । चरित्रकथा स्फुरों धांवे ॥ १६ ॥ श्रीसमर्थस्वामी सन्मुख पाहातां । आणि रामनामध्यानी गर्जतां । हरुषरोमांचपुलकिता । चारित्रकथा स्फुरों धांवे ॥ १७ ॥ जयजयाजी श्रीसमर्थदेवा । आपुली कथा आपण बोलवा । मज शब्दप्रमेय पढवा । ग्रंथ न्यावा कळसावरी ॥ १८ ॥ हा हो जी लडिवाळ मी लेंकरूं । वैसलों हेचि एक हांव धरूं । जे श्रीसमर्थकथासारामृत करूं । स्वामी वरू तुह्मीं दीजे ॥ १९ ॥ ऐसें जंव मी ह्मणों लाहे । तंव झणींच स्वामी माझा हृदयस्थ होये । ह्मणे उठीं करीं चरित्र गाये । तुज मी साह्य पाठिराखा ॥ २० ॥ तुझिया बोबडिया वचनां । साठीं मी तिष्ठेन सभांगणा । न धरीं कांहीं अनुमाना । आवडी वदना येइल तें गाये ॥ २१ ॥ झणींच झालों सावधान । तंव तटस्थ देखती सभाजन । ह्मणती कां पा धरियेलें मौन । काढीं अनुसंधान कथानुरोधें ॥ २२ ॥ आह्मीं तुझा जाणितला भावो । तुज तंव निःसीम पढियंता श्रीसमर्थदेवो । यालागीं प्रतिपादीं विनितभावो । दाविसी नवलावो सेवेचा ॥ २३ ॥ तरी आह्मा हें कीं पावलें । तुझें सेव्यसेवकपण जाणवलें । आतां तेंचि काढीं चरित्र वहिलें ।

काय वर्तलें जांबनगरीं ॥ २४ ॥ आइका तरी चरित्र नव्हाळी । शेष वंदी पाताळीं । सनकादिक वंदिती दिग्मंडळीं । ठेला कळी तटस्थ ॥ २५ ॥ हें चरित्र नव्हे परमामृत । ययाची तिहीं लोकीं ख्यात । यमधर्मा जाणवली मात । तो शिरीं वंदित यमलोकीं ॥२६॥ तेंचि हें मी पुरोहित गुणें । तुह्मां पुढें बोलों ह्मणतों लेंकुरपणें । उणयापुरयातें मी कहीं नेणें । सरतें करणें तुह्मीं संतीं ॥ २७ ॥ असो आतां बहु भाषण । प्रांजळ बोलूं कथानुसंधान । जेणें संतोष पावती भगवज्जन । निवतील पूर्ण श्रद्धाळु ॥ २८ ॥ धन्य धन्य तें गोदातीर । त्याहीवरी विशेष गोदातीर । जेथ महाबळी श्रीसमर्थ दातार । रुद्रावतार जन्मला ॥ २९ ॥ धन्य धन्य तें वैष्णवकुळ । विशेष सूर्याजीपंत आचारशीळ । सती राणाई पतिव्रता केवळ । धन्य निर्मळ परिचर्या ॥ ३० ॥ श्रीराम रुक्मांगद जन्मले अयोध्या । मग ते जाली जगद्वंद्या । श्रीसमर्थ जन्मल जेथ सध्या । तें जांब अयोध्या आह्मां जोडली ॥ ३१ ॥ जांबेंतील सानथोर । ते चतुर्भुज जाणावे नारीनर । कां जिहीं तो महारुद्रावतार । निजनिर्धार देखिला डोळां ॥ ३२ ॥ तेथिंचे पशु पक्षी क्रिमी कीटक । महद्भाग्याचे निष्टंक । आपुलाल्या परी एकेक । श्रीरघुनायक आराधिला ॥ ३३ ॥ देवलोकींचे देवगण । ठाकोनि आले जांबभुवन । भू जळस्थळचरादि रूपें घेवोन। निजवसतिस्थान श्रीसमर्थांकारणें ॥ ३४ ॥ बाप पवित्र जांब नगरी । जेथ प्रत्यक्ष हनुमान क्रीडा करी । धन्य राणाई गर्भोदरीं । वानरकेसरी साठविला ॥ ३५ ॥ धन्य जांबेचिया सुंदरी । जिहीं हनुमान खेळविला कडियेवरी । ओंविया गाइल्या परोपरी । धणीभरी स्वानंदें ॥ ३६ ॥ जांबनगरीचे नगरजन । वर्तती स्वधर्मकर्मप्रतिपाळून । आलिया पांथस्था आदरोन । देती अन्नदान धर्मबुद्धीं ॥ ३७ ॥ परस्परें निर्वैर । असती निर्मत्सर निर्विकार । मंगळ

करिती घरोघर । अति अरुवार समबुद्धीं ॥ ३८ ॥
घरोघरीं गाती रामायणें । करिती हरिकथा हरिजागरणें ।
गीताभागवतपारायणें । संतर्पणें महोत्साहीं ॥ ३९ ॥
ऐसिया सुखरूपनगरीं । सूर्याजीपंत ग्रामलेखन करी ।
हृदईं धरोनि श्रीहरी । काळ सारी परमार्थीं ॥ ४० ॥
आधींच वंश पुण्यपरायण । वरी सूर्याजीपंत विशेष जाण ।
भगवद्भजनीं सुलीन । ग्रामलेखन सारोनी ॥ ४१ ॥ नित्यनेम
प्रातःकाळीं । माध्यान्हकाळीं सायंकाळीं । आराधन रवि-
मंडळीं । करिती सोज्वळी सूर्याजीपंत ॥ ४२ ॥ नित्यनेम
सूर्योपासना । अर्घ्य देती श्रीसूर्यनारायणा । सर्वकाळ नाम-
स्मरणा । वांचूनि मना अनु नेणती ॥ ४३ ॥ विपायें साधु-
संत आलियां घरीं । धांवोनि विनितभावें नमस्कारी । कांते-
सह पूजन करी । आवड भारी संतसंगीं ॥ ४४ ॥ साधुसंत
आलियां घरा । ह्मणती आजि पर्वकाळ दिवाळीदसरा । आह्मा
यमधर्म जी पाठिमोरा । भाव पुरा जरी संतीं ॥४५॥ संत जोडि-
लियां देव जोडे । येरव्हीं हें कीं कानडें । तपें तीर्थें देव जोड ।
संत रोकडे न भेटती ॥ ४६ ॥ यया संतांचें महिमान । वर्णा-
वया मी अति दीन । जेथ वेदां पडलें मौन । चतुरानन
भागला वानूं ॥ ४७ ॥ संत सुखाचे सागर । संत मोक्षाचे
मोक्षागर । संत सायुज्जता देणार । मुक्तागर मुमुक्षा ॥ ४८ ॥
संतचरणीं जडिल्या भावो । तरि मग प्रसन्न होतो देवाधिदेवो ।
ऐसा पंतांचा निःसीम भावो । ह्मणोनि पहा हो संतचरणीं
लागती ॥ ४९ ॥ पंत नित्यनेम आचारशीळ । वरी संतभजनीं
निर्मळ । न देखती गुणदोषकिडाळ । संत केवळ भगवद्रूप
मानिती ॥ ५० ॥ गृहस्थाश्रमप्रतिपाळून । तीव्रतम चालविती
अनुष्ठान । तेणें प्रसन्नला श्रीसूर्यनारायण । वरदान करूं ह्मणे
॥ ५१ ॥ दोन प्रहर भरतां पूर्ण । द्विजवेशें अंगणीं उभे नारा-

यण । पंत धांवोनि धरिती चरण । कर जोडोनि काय बोलती ॥ ५२ ॥ या जी स्वामी पूजन करूं । श्रम जाले कां चरण चुरुं । इच्छाभोजनाचा आदरु । सांगा करूं निजदासा ॥ ५३॥ तंव सविता हांसोनि ह्मणे। सांपडलों तुझिये शुद्धभावाचेनिगुणें। आतां माग कांहीं वरदान । आवडी पूर्ण करूं तुझी ॥ ५४ ॥ मी तरी प्रत्यक्ष सूर्यनारायण । तुझिया भेटीसी आलों द्विजरूप घेवोन । येथोनि तुह्मा कृत कल्याण । कराल गमन वैकुंठलोकीं ॥ ५५ ॥ ऐसें जंव सविता ह्मणे । तंव पंत घालिती लोटांगणें । ह्मणती स्वामी दुर्लभ जी तुमचे चरण। आजि दीनोद्धरणा करूं आला ॥ ५६ ॥ येथ तुह्मा ऐसिया समर्था । काय नाशिवंत मागों जी अर्था । तरि म्यां नरदेह दवडिला व्रथा । तप अनर्था मूळ केलें ॥ ५७ ॥ मागां बळी प्ऱ्हाद बिभीषण। उद्धव अक्रुर अर्जुन । इहीं निष्कामभावें पूजिला रमारमण। ते शिक-वण मज घडो ॥ ५८ ॥ निष्कामभावें देव भजतां । फुकटा जोडती मोक्ष सायुज्यता । वैकुंठ तरी सहज ये हाता । परि भक्त भक्तिपथा जडोनि ठाती ॥ ५९ ॥ तो मी ह्मणी नाशिवंत मागों । अणिविपायें आडमार्गीं लागों । तरि मग रव-रवादि भोगों । पुण्यभाग सरलियां ॥ ६० ॥ स्वामी मज दिलें पावलें । अलभ्यता दरुशन जोडलें । आजवरी अनुष्ठान सिद्धी गेलें । धन्य जालों संसारीं ॥ ६१ ॥ ते हे पाय जीवीं धरूं । तेणें सहज तरेन संसारु । अहर्निशीं चिंतनीं काळ सारूं। स्वामी वरु हा चि दीजे ॥ ६२ ॥ निष्कामता सेवा घडली । ती स्वामीचरणीं अर्पिली । महापातकां होळी जाली । कृपा केली तुह्मीं देवा ॥ ६३ ॥ आतां आस हेचि जीवीं । भगव-त्कीर्ती आइकावी । नित्य संतसेवा घडावी । मुखें गावी राम-कृष्णश्रेणी । ऐसें माझिया येत निर्धारा। स्वामी कृपा तरी हे चि करा । ह्मणी नाशिवंत पसारा । दूर सारा येथोनि ॥ ६५ ॥

पुढतपुढतीं चरण धरिती । पुढतीं पुढतीं विनविती । सविता होय विस्मित चित्तीं । धन्य ह्मणत भक्तराज तूं ॥ ६६ ॥ तुझा तुज फळेल भावो । परी तुझिये कांतेप्रती पुसों पाहों । ऐसें वदोनि सवितादेवो । राणाऊतें पाचारी ॥६७॥ राणाऊ शुद्ध पतिव्रता सती जैशा अहिल्या तारा सीता द्रौपदी । सर्वभावें पतीसी भजती । वैभव देती निजभर्त्या ॥ ६८ ॥ पतीवांचोन नेणती आन । या नांव पतिव्रता पूर्ण । पतिआज्ञाप्रतिपाळण । गेल्या प्राण नुल्लंघिती ॥६९॥ पतिइच्छा एक । आणि स्त्री ठेवी आणिक । तरी ते जाणावी विघातक । बुडवी निःशंक उभयकुळा ॥ ७० ॥ पतिइच्छा राखों नेणे । तें गर्धभीहूनि नीच वर्तणें । जळो ऐसिया स्त्रियांचीं जिणें । रवरव भोगणें प्रत्यक्ष ॥ ७१ ॥ राणाऊते पतिव्रता सती । नमन करीं शुद्धमतीं । ह्मणे कोण आज्ञा मजप्रती । सांगा निश्चितीं देवराया ॥ ७२ ॥ यापरीं राणाऊ नम्रपणें विनवीत । तंव सविता प्रसन्नपणें बोलत । ह्मणे साध्वी तूं पुण्यमार्ग आचारित । माग इच्छित पुरवीन मी ॥७३॥ स्मित हास्यें राणाऊ लाजोनि ह्मणे । स्वामी निपुत्रिकां ह्मणती उणें । यापरतें मी आणिक नेणे । उचित करणें तुह्मी जाणा ॥ ७४ ॥ कुळीं पुत्र तरी होवो । तो भगवद्भक्तीं राहो । येरव्हीं वंश गेला तरी जावो । परी न होवो कुळबुडव्या ॥ ७५ ॥ सविता वदे तूं धन्य सती । तुझिया उदरा मीचि येतों निश्चितीं । या सूर्याजीपंतें ऋणानुवर्ती । मज यथानिगुती आकळिलें ॥ ७६ ॥ आतां दुजा तोही आइके । जयाचें नांव घेतां दश-मुख वचके । लक्ष्मणा वांचवण्या कवतुकें । गिरिद्रोण अचुके ने आण केला ॥ ७७ ॥ पुनरपि तोचि महाबळी हनुमंत । तुझिये उदरीं येईल निश्चित । लावील धर्मसंस्थापनेची ख्यात । कीर्ती दिगंत घन गर्जेल ॥ ७८ ॥ एक क्षत्रियपाळ राजा । शिवअंशें वाढवील वोजा । देवलोकींच्या उतरतील फौजा

अविंधमाजी जिरवावया ॥ ७९ ॥ अणिकही आइका नवल । श्रीरामनवमीं तुह्मां श्रीदाशरथी भेटेल । इतुकें बोलोनि आळुमाळ । सविता तत्काळ गुप्त जाला ॥ ८० ॥ पंत राणाउ अंतरीं विचारिती । आजि हे कोण देखिली चमत्कृती । असेल कांहीं स्वप्नभ्रांती । कैंचें भेटती श्रीसूर्यनारायण ॥ ८१ ॥ सर्वेंचि ह्मणती काइसेनि हें अप्रमाण । अल्पकाळेंचि श्रीरघुनन्दन भेटोनि होतील मनोरथ पूर्ण । ऐसें भगवान वदोनि गेला ॥ ८२ ॥ तें जरी घडेल अप्रमाण । तरी मग हें ही ह्मणों स्वप्न । एणेपरिं समाधान । आनंद पूर्ण मानिला तिहीं ॥ ८३ ॥ मग सुखसमाधानवृत्ती काळ क्रमिला । तंव श्रीरामनवमी उत्सावें निकट आला । जांबनगरीं पूर्ण आनंद वर्तला । टकळा सकळां श्रीरामनवमी ॥ ८४ ॥ चैत्र शुद्ध प्रतिपदेमाझारीं । शके पंधराशें सव्विसोत्तरीं । क्रोधीनाम संवत्सरीं । सुखनिर्भरीं नवरात्र आलें ॥ ८५ ॥ नवरात्र नवदिन । कथा कीर्तन पुराणश्रवण । भजन दिंड्या नामस्मरण । भाविकजन मिळोन करिती ॥ ८६ ॥ श्रद्धा आवडीचिया लोटें । कथा करिती घडघडाटें । तेणें महापातकांची थाटें । गिरीद्रकुटें रिगोनि ठाती ॥ ८७ ॥ शुद्धभावें नारीनर । जय जय गर्जती श्रीरघुवीर । परिमळद्रव्यें पुष्पसंभार । आवडीं अपार श्रीरामीं अर्पिती ॥ ८८ ॥ मंगळवाद्यांची लागतां घाई । भाविक जय शब्द गर्जती ठाईं ठाईं । दुःखशोक ओखदासी नाहीं । देह विदेहीं नारीनर ॥ ८९ ॥ ऐसा प्रातिवार्षिक नवमी उत्साव । आवडीं करिती नगरजन मिळोनि सर्व । अन्नसंतर्पण रथोत्साव । नाना गौरवयुक्त क्रिया ॥ ९० ॥ सूर्याजीपंत राणाऊसती । नवरात्र नवुदिन उपोषणें करिती । कथाकीर्तनें नित्यनेमें ऐकती । विदेहवृत्ति श्रवणानुरागें ॥ ९१ ॥ भानजी हरिदास हरिरंगीं नाचती । पंत टाळ घेवोन धृपद पाठीं

धरिती । श्रीरामदर्शना अतिक्रांत चित्तीं । अश्रु लोटती नेत्रकमळां ॥ ९२ ॥ ह्मणती नवुमी शेष दिन उरला । अझुनी श्रीराम मज कां न भेटला । ऐसें ह्मणतां गहिंवर दाटला । पंत डोळां पदर लाविती ॥ ९३ ॥ काय सवित्याची ह्मणों अप्रमाण वाणी । तरी अझुनी कां न भेटे कोदंडपाणी । ऐसे विस्मयाचित्त उभे कीर्तनीं । तंव हाक दुरुनी आइकिली ॥ ९४ ॥ रात्र तरी दोन प्रहर । श्रीमहारुद्र जाले वेसकर । पंता ह्मणती चला जी सत्वर । हकीम पारावर बाहती आपणा ॥ ९५ ॥ अद्वैतनिरूपणीं रंग कीर्तना । भरतां पंता जाववेना । परी निरूपायें दास्यपणा । कीर्तनरंगणा सांडूनि चालिले ॥ ९६ ॥ पंत येतांचि नगराबाहेरी । तंव नूतन हुजूर देखिले पारीं । मग मिळोनि त्रिवर्ग श्रीमारुतिमंदिरीं । एकांत निर्जरीं बैसले ।९७॥ तंव अकस्मात फांकली प्रभा । श्रीराम लक्ष्मणेसीं उभा । कंठीं झळकली वैजयंती शोभा । त्रैलोक्यसुभा पंता पुढें ॥ ९८ ॥ श्रीराम राजीवनयन । कासे सोनसळा परिधान । किरिट कुंडलें देदिप्यमान । अयोध्याभुवनवासी जो ॥ ९९ ॥ श्रीराम मंगळा सुमंगळ । कोटिसूर्यापरिस तेजाळ । श्रीमुखारविंद अति सोज्वळ । भक्त प्रेमळ भृंग वेधती ॥ १०० ॥ आजानुबाहु दिव्यकांती । शामसुंदर सुकुमार मूर्ती । बाण कोदंड धरिला हातीं । असुर कांपती चळचळा ॥ १ ॥ जेणें पितयाचे भाकेसी । पाळोनि जाला वनवासी । असुरां निर्दाळिलें रावणासीं । भक्तजनांसी उद्धरिलें ॥ २ ॥ तो श्रीरामघनसावळा । पंत न्याहाळिती डोळां । पाहातां पाहातां देवभाव हरपला । तटस्थ राहिले क्षणएक ॥ ३ ॥ श्रीराम न्याहाळोनि परमोल्हासीं । दंडप्राय पडिले भूमीसीं । कोण पुण्यें अयोध्यावासी । सूर्याजीपंतासी जोडला ॥ ४ ॥ पंत हर्षरोमांचपुलकित । वाचा राहिली कुंठित ।

कंठ तरी आर्त सद्गदित । कलेवर जात थरथरा ॥ ५ ॥ देखोनि पंतांची स्थिति । सुहास्यवदन बोले सीतापति । भक्तराज तूं धन्य मूर्ति । उदंड ख्याती तुझिया कुळा ॥ ६ ॥ तुज सांगितलें सूर्यनारायणें । तें आजि आह्मीं केलें कीं परिपूर्ण । ना भी ह्मणी होईं सावधान । मी रघुनन्दन तुज भेटलों ॥ ७ ॥ तुज पुत्र होतील दोघे जण । प्रथम सविता दुजा वायुनन्दन । सविता गृहस्थाश्रमीं कुळवर्धन । दुजा ब्रह्मचारी पूर्ण जगदुद्धारा ॥ ८ ॥ श्रीराम वदे पंतासी । कां न वरिलें गुरुसंप्रदाय दीक्षेसी । पंत ह्मणती वडील अल्पकाळें वैकुंठवासी । होतां आह्मासी विन्मुखला ॥ ९ ॥ आतां आणीक श्रीगुरु काई । तूं चि माझा बाप माई । ह्मणी वोसंगेंसीं घेईं । स्तनपान करवीं दयाळे ॥ १० ॥ ऐसें वदोनि घालिती लोटांगणें । धांवधांवों धरिती दृढ चरण । तंव तो अतिकनवाळ श्रीरघुनन्दन । श्रद्धपूर्ण प्रसन्नला ॥ ११ ॥ श्रीराघवें मस्तकीं ठेविला पद्मकर । कर्णीं निवेदिला गुह्यमंत्र विचार । प्रसादमूर्ती ताम्रयुक्त सुंदर । देत श्रीरघुवीर पंतासी ॥ १२ ॥ पंत ह्मणती स्वामी दिलें मज पावलें । परी कांतेप्रती दर्शन नाहीं घडलें । क्षणएक ऐसें चि रहा बैसले । तिसी अळुमाळें घेवोनि येतो ॥ १३ ॥ रघुराज वदे भक्तराजा । तिसी अल्पावकाशें दर्शन होईल वोजा । बाप भाग्य पुण्यांश तुझा । पवित्र भाजा तुज जोडली ॥ १४ ॥ इतुकें बोलोनि गैब जाले । पंत निरखिती उघडोनि डोळे । तंव तेथ एकाकी आपणचि उरले । काळकूट भरलें चहुंकडा ॥ १५ ॥ मग मूर्ति घेवोनि आले घरीं । भानजी राणाऊ आश्चिर्य करी । श्रीरामनवमीं प्राणप्रतिष्ठिल्या देव्हारीं । अति गजरीं उत्साव केला

॥ १६ ॥ पुढें दिवस मास लोटला । तंव राणाऊसी प्रथमगर्भ राहिला । प्राप्तकाळीं पुत्रलाभ जाला । आनंद वर्तला जांबनगरीं ॥ १७ ॥ शके १५२७ सोत्तरीं । विश्वावसुनाम संवत्सरीं । मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीमाझारीं । राणाऊउदरीं पुत्ररत्न जालें ॥ १८ ॥ पुत्र जाला राणाऊस । एकचि लागला वाद्यांचा घोष । सुरांसहित सुराधीश । मंगळ घोष नभीं करिती ॥ १९ ॥ पुष्पसंभार ते अवसरीं देव वर्षू लागले जांबेवरी दुंदुभीनाद अंबरीं । अति गजरीं चालिला ॥ २० ॥ हळदी कुंकुम ताटीं भरूनी । विदोबिदीं धांवती सुवासिनी । वेगीं पावल्या राणाऊसदनीं देखती नयनीं दिव्य बाळा ॥ २१ ॥ मंगळ शब्दें एकचि नाद । घरोघरीं परमानंद । ते समईचा आनंद । मी मतिमंद काय वानूं ॥ २२ ॥ सूर्याजीपंत परम संतोषले । बहुकाळें पुत्रसौख्य देखिलें । याचकांहातीं निजकोठार लुटविलें । सुखी केलें दरिद्रां ॥ २३ ॥ वेगीं सर्वे घेवोनि ब्राह्मण । सूर्याजीपंत आनंदेंकरोन । ठाकोनि आले राणाऊभुवन । मुखावलोकन नवपुत्रा ॥ २४ ॥ पंतें करोनियां स्नान । मग केलें पुण्यहवाचन । पहावया पुत्रवदन । आनंदें पूर्ण पातले ॥ २५ ॥ देखोनि पुत्रमुख ते अवसरीं । पंता आनंद अंतरीं । मधबिंदू घालितां मुखाभीतरीं । तेणें तमारी तोषला ॥ २६ ॥ राणाऊचा नवस तरी । मज पुत्र जाहल्यां सत्वरीं । गंगे तुझा नामधारी । आनंदनिर्भरीं करीन ॥ २७ ॥ ह्मणोनि ठेविलें नाम गंगाधर । प्रथमपुत्राचें साचार । उपरी पंतें जातकविचार । करूं द्विजवर बैसविले ॥ २८ ॥ तंव चतुर जाणता वृद्ध द्विजवर । पुढें होवोन बोले सत्वर । हा बाळ नव्हेजी कुळउद्धार । प्रति निर्धार सविता कीं ॥ २९ ॥ शुद्धाचरणें

गृहस्थवृत्ति । परम भागवत परम भक्ति । आचरोनि दावील विरक्ति । यासम जगतीं अन्य नसे ॥ ३० ॥ ऐकोनि जातक सावचित्त । पंता आनंद अपरमित । द्विजवरातें षोडषोपचारें पूजित । पाय धरिती विनित भावें ॥ ३१ ॥ पुढें दिवस मास लोटतां । चिमणें बाळ क्रीडे रांगतां कंठीं लाविती उभयतां । परम विश्रामता लेंकुराचेनि ॥ ३२ ॥ श्रीएकनाथस्वामी अनुग्रहित । भानजी हरिदास परम भक्त प्रतिष्ठानीं प्रतिवर्षीं त्रिवर्ग जात । लोटांगणीं वंदिती श्रीए-कनाथसमाधी ॥ ३३ ॥ निकट येतां षष्ठी सोहळा । प्रति-ष्ठानीं जावया उल्हास सकळां । राणाऊ वदे माझिया बाळा । श्रीएकनाथचरणकमळावरी घालूं ॥ ३४ ॥ तया षष्ठीचें महिमान । भीमु ह्मणे वर्णावया मी अति दीन । जेथ मिळती महानुभाव सज्जन । करिती कथाकीर्तन हरिनाम घोषीं ॥ ३५ ॥ घनदाट वैष्णवमांदियाळी । एकचि टाळ-मृदांगधुमाळी । तये रंगीं नाचे वनमाळी । वैष्णवचरण-धुळी शिव वंदी ॥ ३६ ॥ ठाईं ठाईं निरूपणसोहळा । आ-वडीं वर्णिती गोपाळा । देह विदेह स्थिती नरनारीबाळा । प्रतिष्ठान हेळा वैकुंठ जालें ॥ ३७ ॥ दिंड्यापताकांचे भार । वैष्णव थैकारें नाचती अपार । देखोनि भया-भीत पळती यमकिंकर । कळी थर थर कापिन्नला ॥ ३८ ॥ श्रीएकनाथभक्तीं । द्वारावतीहूनि आली श्रीकृष्णमूर्ति । धरिली श्रीखंड्या नामकरण वृत्ति । दास्यत्व करिती नीचत्वें ॥ ३९ ॥ खांदीं वाहोनि कावडी गंगेसी धांवे लवडसवडीं । श्रीनाथगृहीं दास्यपरवडी । अति आवडी श्रीहरि दावी ॥ ४० ॥ असो पंत राणाऊ भानजी मिळोन । ठाकोनि आले प्रतिष्ठान । श्रद्धापूर्ण लोटांगण । श्रीनाथ-

समाधीवरी घालिती ॥ ४१ ॥ पंत राणाऊ दंपत्य । देखोनि श्रीनाथ आदरित । तुह्मा जोडला ह्मणती पुत्र विख्यात । परमभागवत जन्मला हा ॥ ४२ ॥ येथोनि जाहलें कृतकल्याण । तुह्मा तुष्टला श्रीरघुनन्दन । आणीक एक होणार रत्न । ऐसें वदोनि चुंबन घेती बाळाचें ॥ ४३ ॥ श्रीनाथरायें आग्रहोन । त्रिवर्गा बहुकाळ घेतलें ठेवोन । मग परम कष्टें बोळवण । विरहाश्रुपूर्ण करिती ॥ ४४ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ४५ ॥ इतिश्रीरामदासकथासारामृत । भिमुविरचितं । गंगाधरजन्मकथतन्नाम तृतीय प्रसंग सम्पूर्ण ॥ ७ ॥

शुभं भवतु । श्रीरामदासार्पणमस्तु ॥



॥ श्रीराम ॥

## प्रसंग ४ था

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

श्रीसद्गुरु रामदासायनमः—



य सच्चिदानंद जगदीश्वर । गुणातीत गुणगंभीर । लीलाविग्रही श्रीकर श्रीधर । श्रीसमर्थ दातार कृपाळु ॥ १ ॥ स्वामी श्रीरामदास दयाकर । पूर्णब्रह्म परात्पर । जाणूनियां हृदयस्थ विचार । ग्रंथविस्तार चालवी ॥ २ ॥ मी तरी अनधिकारी ह्मणोनी । हातीं न धरींच लेखणी । मग तो सूत्रचालक आग्रहोनी । मज ग्रंथलेखनीं प्रवर्तवी ॥ ३ ॥ आतां हांसोत विद्वज्जन । कां ते पंडित आणि व्युत्पन्न । वेदिक आणि कळावंत पूर्ण । हांसोत गुणी गायक ॥ ४ ॥ मज तंव श्रीरामदासनामामृतगोडी । उपजे नित्यनूतन चवी गाढी । एकाकी भवपार पैलथडी । चरित्र-परवडी वर्णितां पावेन ॥ ५ ॥ अहो कोण भाग्याचा कळस । श्रीरामदासनाम ये मुखास । लोटांगणीं धांवती सुरेश । शिव विरंची गुरुनामधारकांस पुजूं धांवती ॥ ६ ॥ वशिष्ठ आराधिला श्रीरामें । सांदीपन पूजिला श्रीकृष्णें संभ्रमें । श्रीनिवृत्ति पूजिला श्रीज्ञानेश्वरें उत्तमें । श्रीजनार्दनभजना नेमें श्रीएकनाथ प्रवर्तती ॥ ७ ॥ साच श्रीगुरुभजना परता । भक्ता मार्ग न सांपडे तत्वता । कायावाचामनासहिता । श्रीगुरुचित्तीं भजन कीजे ॥ ८ ॥ तो मी श्रीगुरुभजनीं प्रवर्तू ह्मणतां । मुखा प्रबंध-परवडी आली हे अवचिता । क्षणक्षणा लिहितां गातां ऐकतां । सुखसमाधान चित्ता न बोलवे ॥ ९ ॥ श्रीरामदास माझा परम कृपाळ । श्रीरामदास माझा परम दयाळ । श्रीरामदास

माझा परम स्नेहाळ । करुणाकल्लोळ श्रीरामदास माझा ॥ १० ॥ श्रीरामदास माझा जीवींचा सोइरा । श्रीरामदास माझा बाप-माय खरा । श्रीरामदास माझा आप्त बंधू पुरा । निर्विकार निदानीचा ॥ ११ ॥ श्रीरामदास वेळोवेळा । जिव्हेसी लागो हाचि चाळा । कदां न हो भाव निराळा । श्रीरामदासचरण-तळा वसती करूं ॥ १२ ॥ पाय ठेवितां धरणीं । श्रीरामदास-आठऊं हृदयभुवनीं । नेत्रपाती लवताक्षणीं । श्रीरामदास मनीं चिंतीन मी ॥ १३ ॥ श्रीरामदासीं कडकडोनि आलिंगन । कां चरणीं सप्रेमें लोटांगण । देहभाव समर्पून । करूं एकांतवन श्रीरामदासाकारणें ॥ १४ ॥ रिद्धि सिद्धि कामारी । राबती जयाचिये द्वारीं । तो श्रीसमर्थ कैवल्याधिकारी । मज सहज तरी जोडला ॥ १५ ॥ श्रीरामदासरूप डोळां भरूं । श्रीरामदास-चरण चित्तीं धरूं । श्रीरामदासनाम वाचें स्मरूं । क्षण न विसरूं श्रीरामदास माझा ॥ १६ ॥ श्रीरामदासनामाचें आवर्तन । चालो अखंडदंडायमान । कां गुणानुवाद कीर्तन । केल्याविण क्षण न जावो ॥ १७ ॥ श्रीरामदासमाहिमान । काय जाणती पंडित-जन । जेथ श्रुतिवेदादि थकित पूर्ण । नेति नेति ह्मणोन बहुडले मागें ॥ १८ ॥ श्रीरामदासचरणामृतगोडी । काय जाणती संसारिकें बापुडीं । जेथ शुकसनकादिक होतीं वेडीं । ते परात्पर जोडी अति दुर्लभ ॥ १९ ॥ आधीं श्रीगुरुचरणीं शरण रिघावें । निजनिष्ठें नाम गावें । तरी मग वर्म पडे ठावें । निजांगें व्हावें श्रीरामदास ॥ २० ॥ आहे तरी बैसल्या ठाईं । पाहों जातां न सांपडे कवणा कहीं । श्रीरामदास शुद्धभाव पाहीं । हृदयस्थ होई पढियंतया कारणें ॥ २१ ॥ श्रीरामदास-नामोच्चारीं । गजबजोनि पळती सहा वैरी । शुद्ध सात्विक-भावा उजरी । हृदयमंदिरीं विवेक जागे ॥ २२ ॥ सावचित्तें करितां श्रीसमर्थचिंतन । चिंतनासवें घडे ध्यान । ध्यानापाठीं

अनुसंधान । हृदयभुवन निर्मळ करीं ॥ २३ ॥ विवेकवैराग्य उपजलें । तेणें सर्व नाशिवंत प्रत्यया आलें । अविनाश श्रीसमर्थ-चरणयुगुळें । जीव ठकले मायामदें ॥ २४ ॥ श्रीगुरू जरी अंगिकारिती । तरी मग माया मिथ्या प्रतीति । शुद्ध सात्विक-भाव प्रगटती । श्रीरामदास जोडती अनायासें ॥ २५ ॥ श्रीरामदास माझा मी श्रीरामदासाचा । श्रीरामदासेंविण रिता ठाव कैंचा । मज हा चि गुह्योपदेश श्रीधराचा । कायावाचा-मनेंसीं ॥ २६ ॥ श्रीगुरुनाथें थोर उपकार केला । मज सुगमपंथ दाविला । बैसविलों श्रीसंतसज्जनाचे मेळा । चरित्र प्रेमळा वर्णावया ॥ २७ ॥ अबद्ध सबद्ध श्रीसमर्थकथा । पवित्र करीं गातां ऐकतां । हे श्रीधराची गुह्य वार्ता । मज एकांता शिकवण ॥ २८ ॥ श्रीसमर्थचरित्र संग्रहा आलें । तयाचें दैन्य दारिद्र्य उठोनि गेलें । हें मज श्रीधरें पढविलें । गुह्य सांगितलें एकांतीं ॥ २९ ॥ अवधारा यमदूत यमधर्मा ह्मणती । स्वामी मृत्यु-लोकीं देखों नवलख्याति । घरोघरीं श्रीरामदासचरित्र गाती ऐकती । घरटीकार फिरती श्रीमारुतिराय तेथें ॥ ३० ॥ भीम-रूपी श्रीमारुती । आह्मां धिक्कारयुक्त बोलती । श्रीरामदास-चरित्र गाती ऐकती । तेथ वसती तुह्मीं न कीजे ॥ ३१ ॥ श्रीहनुमंतधाकें चि पळालों । जीव घेवोनि स्वामीसन्निध आलों । महत्प्रयासें सुटलों । नातरी मुकलों होतों प्राणा ॥३२॥ तंव हांसोनि यमधर्म ह्मणे । दूत हो श्रीरामदासमहिमान तुह्मा नेणें । अनादि आदि सिद्ध सनातन । शिवविष्णुसम पूज्यमान तो आह्मां ॥ ३३ ॥ श्रीरामदास कई येईल आमुचिये गावा । सर्वकाळ हे चि आस आमुचे जीवा । सर्वभावें भजावा पुजावा । अत्यंत बरवा श्रीरामदास आह्मा ॥ ३४ ॥ तुह्मी सर्वथा नव-जावें तया गांवा । जेथ करिती श्रीरामदासनामघोष बरवा । कां मिळोनि नरनारी मेळावा । आवडीं राघवा पूजिती ॥३५॥

यांवेगळे असती जे चांडाळ । मजसन्निध आणा तत्काळ । त्यांसी शिक्षा करूं सबळ । आज्ञा प्रबळ भगवंताची ॥ ३६ ॥ तें हें श्रीसमर्थमहिमान । यमदूतां यमधर्मे निवेदिलें परिपूर्ण । तेथ मी काय बोलूं अज्ञान । परि श्रीधरें आपण बोलविलें ॥ ३७ ॥ प्रभू तुह्मी सर्वज्ञ जाणते । श्रीसंत श्रोते मीनले ते । मी चरित्र वर्णितसे बाळमतें । कराल सरतें हा भरंवसा ॥३८॥ आइका चतुर्थप्रसंगींचें निरूपण । होईल नारायणाचें जन्मकथन । श्रोतीं द्यावें अवधान । तें जीवन मज वक्तृत्वा ॥३९॥ श्रोता जरी दुश्चित्त । तरी मग वक्ता होय भ्रष्टचित्त । जेवि कुळंबी भूमि पेरित । परी तो पर्जन्य येत बी करपोनि गेलियां ॥ ४० ॥ यालागीं परस्परें समयोचित । श्रोता वक्ता एकचित्त । तें कथा होय रसभरित । परम पवित्र तारिणी ॥ ४१ ॥ कथाश्रवणें महादोष जाती । कथाश्रवणें नाना संकटें नासती । कथाश्रवणें नाना आघात टळती । जीव होती भगवत्स्वरूप ॥४२॥

श्रीभगवानुवाचः—

> नाहंवसामि वैकुंठ योगीनां हृदये रवौ ।
> मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद ।

श्रीभगवान ह्मणती नारदा । मी वैकुंठीं न सांपडे एकदा । ध्यान धरोनि योगींद्रा । मी योगनिद्रें न सांपडे ॥ ४३ ॥ पुसाल तरी आवडी कीर्तनाची भारी । कां नामसंकीर्तन गजरीं । प्रेमळभक्त नाचती थैकारी । मी श्रीहरि तिये रंगीं सांपडें ॥ ४४ ॥ ऐसा कथेचा महिमा । श्रीदेवदेवें सांगीतला नारदोत्तमा । जाणती शिव वाल्मीक उमा । परमभक्तोत्तमा तो कळे ॥ ४५ ॥ यालागीं श्रोतीं अवधान द्यावें । माझिया बोबडिया वचना उपहासावें । मूर्ख तरी आपुलें अपत्य ह्मणवावें । जीवेंभावें हे विनवणी ॥ ४६ ॥ बहु विस्तारें बोलतां । ग्रंथ वाढेल तत्वता । आतां श्रीसमर्थचरित्रकथा । सावधानता अव-

धारिजे ॥ ४७ ॥ श्रीसमर्थे अवतारलीला केली नाना । तें गुह्य कोण जाणे कोण आणील मना । परी अल्प स्वल्प साधारणा । भवतरणा वर्णावें ॥ ४८ ॥ मागां तृतीय प्रसंगींचें निरूपण । जाहलें गंगाधराचें जन्मकथन । इये चतुर्थ प्रसंगींचें निरूपण । श्रीहनुमान अवतरो ह्मणे ॥ ४९ ॥ अंजनीचिया गर्भोदरीं । प्रगटला जो वानरकेसरी । तोचि पुनरपि राणाऊमंदिरीं । दैत्यांतकारी प्रगटो ह्मणे ॥ ५० ॥ राणाऊ परम भाग्याची मोठी । जियेच्या प्रत्यक्ष हनुमान येऊं ह्मणे पोटीं । जन्मांतरींच्या अनंत पुण्य कोटी । येरव्ही हे गोठी न घडे ॥ ५१ ॥ पूर्वीं होते जे मारिले । ते चि पुनरपि प्रगटले । श्रीरामरायें प्रेरिलें । येणे केलें श्रीहनुमंतें ॥ ५२ ॥ अवधारा सूर्याजीपंत हरुषभरीं । डोहळे पुसों गेले राणाऊमंदिरीं । म्हणती सांग कामिनी कवण आवडी अंतरीं । मी सत्वरीं पुरवीन ते ॥५३॥ तंव ते ध्यानस्त सुंदरी । होती श्रीरामनाम गजरीं । सुखोन्मीलित अभ्यंतरीं । श्रीरघुवीरीं जडलीसे ॥५४॥ राम राम स्मरतां । रामीं रंगली ते दइता । नाठवे देह गेह चित्ता । ताटस्तता श्रीरामीं ॥५५॥ राम राम स्मरतां । रामीं रंगली ते तत्वता । नाठवे स्त्रीपुरुषभाव चित्ता । श्रीरघुनाथा वेगळे ॥५६॥ श्रीरामाविण न बोले । श्रीरामाविण न चाले । राम श्रीरामाविण न हाले । श्रीरामें वेधिलें सतीतें ॥५७॥ राम राम ध्वनी उमटे । तेथ पळों सरलीं भुतेंचेटें । कामक्रोधादिकांचीं थाटें । भय संकटें पळों सरलीं ॥५८॥ राम राम स्मरतां तरल्या शिळा । राम राम स्मरतां तरली अहिल्या बाळा । राम राम ह्मणतां गणिका वेल्हाळा । वैकुंठ हेळा पावली ॥५९॥ श्रीरामनामाचा महिमा । जाणती वाल्मिक शंकर उमा । ध्रुव प्ऱ्हाद अक्रुर अर्जुन हनुमान । महा वैष्णवभक्तोत्तमा तो कळे ॥ ६० ॥ तें चि श्रीरामनाम अंतरीं । राणाऊ न विसंबे चि क्षणभरी । मी च राम निजनिर्धारीं । हा भाव अंतरीं बाणला ॥ ६१ ॥

पंत डोहळे पुसों गेले । तेथ नवल हें देखिलें । ह्मणती श्रीराघवें बहु बरवें केलें। देहा व्यापिलें मम स्त्रियेच्या ॥ ६२ ॥ मग निकट सन्निध जाऊनी । हाकारिली कामिनी । ह्मणती कोण भाव तुझिये मनीं । मजलागुनी निवेदी ॥ ६३ ॥ तंव चमत्कारोनि बोले सती । मी तरी प्रत्यक्ष हनुमंतमूर्ती । उन्मत्त असुर वाढले क्षिती । तयां निर्दळा गती करूं आलों ॥ ६४ ॥ मज जाणे कृष्णातटा । भक्त महानुभावांचिया थाटा। अधर्म रती मोडणें चेष्टा । कळी दुष्टा निर्दळण्या ॥ ६५ ॥ मज नावडे गृह संसार । नावडे मान प्रतिष्ठाचार । एक मनीं बैसला श्रीरघुवीर। एकांगवीर एकसरा ॥ ६६ ॥ मज नावडे जनवार्ता । सेवणें गिरिकपाट—एकांता । एकनिष्ठेचिया एकनिष्ठता । तपः सिद्धता आचरणे ॥ ६७ ॥ मज करणें धर्मसंस्थापन। करणें गोब्राह्मणप्रतिपाळण । विशेष महाराष्ट्र शिवरायाकारणें । कैवार घेणें मजलागीं । ऐसी स्वयंस्फूर्ति स्वयंभोद्गार । राणाऊ वदलीसे निर्धार । पंत साश्चर्य थकीत थोर । ह्मणती श्रीरघुवीर मज तुष्टला ॥ ६८ ॥ हे भविष्यकथनाची वाणी । सार्थ चि घडेल इये मेदिनीं । धन्य वंश उजळला जनीं । त्रैलोक्यभुवनीं धन्य मी ह्मणो ॥ ६९ ॥ दशरथकौसल्येच्या कारणें। पुत्र व्हावें श्रीनारायणें । वसुदेवदेवकीकारणें । बळिभद्रकृष्णें बाळ होणें ॥७०॥ अनंत ब्रह्मांडाचा धनी । भावार्थें बाळरूपें नटतो चक्रपाणी । मायालाघवी सहजपणीं । कायएक ह्मणी न करील ॥ ७१ ॥ जें सौख्य दशरथकौसल्येनें भोगिलें । जें नन्दयशोदावसुदेवदेवकीनें अनुभविलें । अहो तें चि आह्मां निशंक जोडलें । धन्य जालों संसारीं ॥ ७२ ॥ ऐसिया धन्योद्गारीं । पंत वेगीं जावोनि मंदिरीं । श्रीरघुनाथपूजन केलें संभारीं । स्तवभारीं आदरिला ॥ ७३ ॥ ह्मणती जय जयाजी श्रीदेवदेवा । आत्मयारामा मुकुंदा श्रीमाधवा । परमपुरुषा अधोक्षजा श्रीकेशवा ।

परमभावा प्रगटतिया ॥ ७४ ॥ जय जया जी श्रीनारायणा । जय जया जी श्रीविश्वकारणा । जय जया जी श्रीविश्वतारणा । भक्तकारणा प्रगटतीया ॥ ७५ ॥ जय जया जी श्रीजगदीशा । जय जया जी श्री सुरेशा । जय जया जी श्री मुनिसंतोषा । श्री हृषीकेशा सर्वमूळा ॥७६॥ जय जया जी श्री रमारमणा । जय जया जी श्रीगोपीमनहरणा । जय जया जी श्री मुरमर्दना । दैत्यांतकारणा श्रीवल्लभा ॥ ७७ ॥ जय जया जी श्रीरामा । जय जया जी श्रीपुरुषोत्तमा । जय जया जी श्रीमेघश्यामा । अपार महिमा तुझा देवा ॥ ७८ ॥ अहो जी देवा नवल केलें । मज पामराच्या कुळा श्री हनुमान धाडिले । ऐसें ह्मणतां भूमी पडिले । भान विसरले देहाचें ॥ ७९ ॥ तेथ भानजी हरिदास येउनी । सावध करिती सूर्याजीपंतां लागुनी । नेऊनि बैसविलें हरि-कीर्तनीं । श्रीरामनवमीउत्साव जेथें ॥८०॥ परमोत्साव श्रीराम-नवमी । नरनारीं बाळें रंगलीं श्रीरामीं । नाठवे देहभाव संसार-ऊर्मी । परमविश्रामीं ते सर्व ॥ ८१ ॥ मंडप उभारिला शोभि-वंत । वैष्णव मिळाले अपरिमित । दिंड्यापताकांचे भार शोभत । घोष गर्जती श्रीरामनामीं ॥ ८२ ॥ गुढिया गरुड टकें तोरणें । चांदोवे उभविले नवमीकारणें । नगर शृंगारिलें चौगुणें । भक्तगणीं मिळोनियां ॥८३॥ नउमी नउ दिवस सोहळा । करिती कथाकीर्तन उत्साव आगळा । शेवटील श्रीरामजन्मकाळा । राणाऊ बाळा प्रसवली ॥ ८४ ॥ तंव सेवक येती धांवोनी । ह्मणती सूर्याजीपंतांलागुनी । स्वामी श्रीरामनवमीं सुदिनीं । जाला सदनीं पुत्र तुह्मां ॥ ८५ ॥ मायालाघवी श्रीहनुमान । कवणा प्रगट न दावी च निज महिमान । परि आजि राणाऊचें सदन । दिव्य प्रभेनें कोंदलें ॥ ८६ ॥ अत्यंत तेजःपुंज तें बाळ । कटीं पुच्छ रुळे अळुमाळ । कोटिसूर्यापरिस तेजाळ । कौपीन

केवळ सुवर्णाची ॥ ८७ ॥ अत्यंत रमणी चिमणी मूर्ति । सन्मुख उभी गदा हातीं । किरिट कुंडलें लखलखती । प्रभा फांकती मयुरपिच्छीं ॥ ८८ ॥ मायेनें धरिली हनुवटी । वारंवार चुंबी अति संतुष्टीं । बाप भाग्याची मीच जगतीं । ह्मणतां गोरटी गहिवरली ॥८९॥ ह्मणींच घालोनि मायाआवरण । गुप्त जाले श्रीहनुमान । सन्निध श्रवणीं पडिलें रुदन । देखिलें नयनीं बाळ तान्हें ॥ ९० ॥ शके पंधराशे ३० त्तरीं । कीलकनाम संवत्सरीं । श्रीरामनवमीं सुनक्षत्रीं । राणाऊउदरीं पुत्ररत्न जालें ॥ ९१ ॥ पुत्र जाला राणाऊस । एक चि लागला वाद्यांचा घोष । सुरांसहित सुराधीश । मंगळघोष नभीं करिती ॥ ९२ ॥ पुष्पसंभार ते अवसरीं । देव वर्षूं लागले जांबेवरी । दुंदुभीनाद अंबरीं । अति गजरीं चालिला ॥ ९३ ॥ हळदी कुंकुम ताटीं भरूनी । विदोंविदीं धावती सुवासिनी । वेगीं पातल्या राणाऊसदनीं । देखती नयनीं दिव्य बाळा ॥ ९४ ॥ मंगळशब्दें एक चि नाद । घरोघरीं परमानंद । ते समईचा आनंद । मी मतिमंद काय वानूं ॥ ९५ ॥ पंत परम हरुषले । आजि द्वितीय पुत्रसौख्य देखिलें । याचकांहातीं निजकोठार लुटविलें । सुखी केलें दरिद्र्यां ॥ ९६ ॥ मग सवें घेवोनि ब्राह्मण । पंत आनंदें करोन । वेगीं पावले राणाऊभुवन । मुखावलोकन नवपुत्रा ॥ ९७ ॥ पंतें करोनियां स्नान । मग केलें पुण्याहवाचन । पहावया पुत्रवदन । आनंदें पूर्ण पातले ॥ ९८ ॥ देखोनि पुत्रमुख ते अवसरीं । पंतां आनंद अंतरीं । मधबिंदु घालितां मुखाभीतरीं । तेणें वानरकेसरी संतोषला ॥ ९९ ॥ राणाऊचिया सदनीं । वेगीं मिळाल्या सुवासिनी । बाळमुखचंद्रमा न्याहाळुनी । विस्मित मनीं त्या जाल्या ॥ १०० ॥ ह्मणती आह्मां ही जाहलीं लेंकुरें । परी ऐसीं न देखिलीं मनोहरें । बाई राणाऊ बाप भाग्य तुझें थोर । श्रीरघुवीर तुज तुष्टला ॥ १ ॥ बाळ घालोनि

पाळणा । मग त्या आरंभिती नामकरणा । मनीं ह्मणती रे जगज्जीवना । दिला तान्हा सगुण तुवां ॥ २ ॥ पुन्हःपुन्हः अवलोकिती । पुन्हःपुन्हः विस्मित होती । परस्परें बोलती ही बाळमूर्ति । उदंड ख्याति करील नेणो ॥ ३ ॥ हा भासतो बाल-सूर्यनारायण । ह्मणोनि ह्मणा गे यासि नारायण । शर्करा वाटिती आनंदें करोन । नारायणनामाची ॥ ४ ॥ उपरी पंतें जातकविचार । करूं बैसविले द्विजवर । सभा बैसली सभोंवार । जातकविचार श्रवणातें ॥ ५ ॥ द्विजवरांमाजीं वृद्ध जाणता । हाकारोनि सांगे समस्ता । जी जन्मांतरींची बहु पुण्यता । या सूर्याजीपंता जोडली ॥ ६ ॥ कोण भाग्याचे द्विजवर आह्मी । जे हे पत्रिका देखों संभ्रमीं । जेणें निकट दास्य केलें श्रीरामीं । तो प्रत्यक्ष हनुमंतस्वामी बाळ तान्हा ॥ ७ ॥ हा हो जी उघड ययाचें महिमान । सानथोरां विदित परिपूर्ण । मुनि वाल्मिकीनें गाइलें रामायण । विशेष गुणवर्णन श्रीहनुमंतजीचें ॥ ८ ॥ जन्मतां चि बाळकरणी । धरूं गेला वासरमणी । अमर सुरवर धांवले संरक्षणीं । अतर्क्य करणी अंजनीतनयाची ॥ ९ ॥ येणें करोनि लंकेची होळी । रावण विटंबिला कुंभकर्ण जंबुमाळी । इंद्रजित असुरांची करोनि रांडोळी । जनकजा वेल्हाळी सोडविली येणें ॥ १० ॥ प्रचंड प्रतापी श्रीहनुमान । सकळ भागवतांमाजीं शिरोभूषण । नेणो देशकालपरत्वें धर्मसंस्थापन । करूं येणें श्रीहनुमंतजीसी ॥११॥ ययाची पत्रिका पाहों जातां । हा करील धर्मसंस्थापन निश्चिता । भूषणभूत संतांमहंतां । स्वराज्यसाम्राज्यता याचेनि गुणें ॥ १२ ॥ एक भूपाळ सुलक्षणी । शरण येईल या लागुनी । अघआपदा उपशमुनी । पवित्र मेदिनी याचेनि गुणें ॥ १३ ॥ संतमहंतांचे मेळऊनि भार । निश्चयें हा पृथ्वीचा उतरवील भार । सर्वी सर्वत्र मंगळ वाढवील अपरंपार । श्रीरघुवीरभजनभावें ॥ १४ ॥ द्विजवर

बोलती विचक्षण । पंत राणाऊ ऐकती लक्ष देवोन । सकळ ठेले तटस्थ सभाजन । प्रेमाश्रु पूर्ण नयनीं वाहती सकळांच्या ॥ १५ ॥ ऐकोनि जातक सावचित्त । पंत द्विज-वरां षोडशोपचारें पूजित । यथाशक्ति द्रव्य सुवर्ण अर्पित । लोटांगण घालिती विनित भावें ॥ १६ ॥ पुढें दिवस मास लोटतां । चिमणीं बाळें क्रीडती रांगतां । मातापित्या परम विश्रामता । लेंकुरां खेळतां देखोनी ॥ १७ ॥ बाळकें गुडघ्यावरी रांगती । तें कौतुक पंत राणाऊ देखती । सवें चि लीळाविनोदें कंठीं लाविती । निंबलोण उतरिती दृष्ट न हो ह्मणुनी ॥ १८ ॥ राणाऊचिया सदनीं । सुदिव्य असती पुत्र दोन्ही । त्यां पहावें खेळवावें ह्मणुनी । कामधाम सांडोनी धांवती स्त्रिया ॥१९॥ ह्मणती बाई राणाऊ नवल जालें । तुझ्या बाळकीं आमुचें चित्त चोरिलें । किती परतपरतों जाऊं ह्मणितलें । तरी चित्त राहे विगुंतलें यांचिमाजीं ॥ २० ॥ अयोध्येमाजीं श्रीराम जन्मतां । अयोध्येची पळों सरली दैन्यदरिद्रता । तिळभरी नुरली शोकचिंता । श्रीराम समस्तां सुखविश्राम जाला ॥ २१ ॥ कां गोकुळीं जन्मतां चि कान्हा । वांझ गाई फुटला पान्हा । त्याही भाकडा खडाणा । श्रीकृष्णजन्मगुणें वोळल्या ॥ २२ ॥ तैसें चि आह्मां जांबेचिया जना । देवें सुखवावया धाडिलें गंगाधर नारायणा । यांचीं श्रीमुखें न्याहाळितां जाणा । आनंद नयना नित्यनवा उपजे ॥ २३ ॥ यांचिया जन्मका-ळापासोन । आमुचें दैन्यदरिद्र गेलें पळोन । गृहीं दहींदुभतीं धनधान्य वाढलें परिपूर्ण । करंटेंपण वोखदासी नुरलें ॥ २४ ॥ यापरी परोपरीं गुणगायन । करिती बाळका कडिये घेवोन । पुन्हःपुन्हः घेती चुंबन । लाविती कडकडोन कंठासीं ॥ २५ ॥ चिमणीं बाळें लौकिक रीतीं । नाना बाळलीला दाविती । क्षणएक हांसती क्षणएक आक्रंदती । क्षणएक मागती स्तनपान

जननियें ॥ २६ ॥ दोघे ही अंशावतार खरे । परी मायबापा मोहिती मायाआवरणीं सत्वरें । जे पुत्रसौख्य वांछित होतीं वोहरें । तें साचोकारें कोड पुरविती ॥ २७ ॥ मग यथाकालेंकरोन । पडती उठती चालती टेंका धरोन । बोल बोलती बोबडे वचन । आई बाबा मामा हाकारिती ॥ २८ ॥ कई मृत्तिकेंत अंग लोळविती । कई धेनुवत्सापाठीं धांवती । कई लेंकुरांमाजीं खेळ खेळती । गाडिएकतारा आट्यापाट्या ॥ २९ ॥ खेळती लगोऱ्या विटीदाडूं भोंवरा । खो खो काढिती खेळ दुसरा । मेळऊनि सवंगडियांचा फेरा । खेळ निवडिती तिसरा सुरपारुंभ्या ॥ ३० ॥ यापरी नाना खेळ खेळतां । नाठवे भूक तहान चित्ता । माय विदोविदीं बाळें धुंडिता । खेळ खेळतां सवंगडियांमाजीं सांपडती ॥ ३१ ॥ एक बोटीं एक कडिये । घेवोनि जननी गृहासी ये । जेऊं घाली दुधभात साये । हर्ष न समाये पंतांसी ॥ ३२ ॥ जननी लटिकी च रागेजतां । पंतें लेंकुरें देखिलीं स्फुंदतां । कोण कारण शिक्षेसी पुसतां । हे गांव भटकती जननी ह्मणे ॥ ३३ ॥ यांसी तुमचा तिळभरी नाहीं धाक । तेणें चि जालीं मोकाट निःशंक । यापुढें कोणी ठेवोनि सुशिक्षक । शहाणपण कांहीं शिकवावें ॥ ३४ ॥ आइकोनि पंत हासिन्नले । ह्मणती आमुचीं नवसाचीं तान्हुलें । इहीं सहस्र अपराध ही केले । चित्तीं वहिले तुवां न आणावे ॥ ३५ ॥ मग पंतें सुमुहूर्त देखोन । उभयतांचें करविलें व्रतबंधन । उपरीं आरंभिलें वेदपठण । स्वरोक्त पूर्ण वेदविधी ॥ ३६ ॥ परी दोघांमाजीं नारायण । एकेस्थळीं न बैसे चि अर्धक्षण । मायगुरूसी चुकवोन । घेतसे अरण्य एकांत वसती ॥ ३७ ॥ क्षणीं वृक्षशिखरीं जावोनि बैसे । जेथ कवणा ही जावया रिघाव नसे । कां पाणबुडी घेतां सावकाशें । डोहामाजीं वसे दीर्घकाळ ॥ ३८ ॥ जन ह्मणती हा शुद्ध वानर ।

चेष्टा दाविती अपार । ऐसें ऐकतां चि सत्वर । नारायण अनिवार उड्डाण दावी ॥ ३९ ॥ जें न करवे कवणा ही बाळा । नारोबा तें चि करी अवलीळा । जांबचा थकित नरनारीमेळा । पुत्र आगळा देखों ह्मणती ॥ ४० ॥ गंगाधर अति शांत सत्वागळा । श्रीगुरु पढविती मुखोद्गत करी तत्काळ । अल्पकाळें च्चि विद्या सकळ । करतळामळ केल्या ॥ ४१ ॥ पंतगृहींची वृत्ति कुळकर्ण । तें लेहों लागला गंगाधर आपण । हिशेबीं कितेबीं निपुण। हुजूर तेणें संतुष्ट केलें ॥४२॥ पंतांचा गृहकारभार । पाहों लागला गंगाधर । हृदईं चिंतूनि श्रीरघुवीर । कार्यांतर पडो च्चि नेदी ॥ ४३ ॥ सूर्याजीपंतां अत्यादरें। विनऊनि प्रार्थिलें गंगाधरें । कीं अनुग्रह कीजे सत्वरें । जेणें उद्धरे हे तनु ॥ ४४ ॥ तुह्मी निशिदिनीं करिता जयाचें ध्यान । तो मज दाखवा श्रीरघुनन्दन । मी ही तयाचें देखेन श्रीचरण। होईन शरण तनुमनेंसीं ॥ ४५ ॥ तुह्मी निशिदिनीं करिता नामस्मरण । तो मज दाखवा सीतारमण । त्यासी मी होईन शरण । निजात्ममरण चुकवावया ॥ ४६ ॥ तुह्मी आठविता जयाचें रूप । तो मज दाखवा अयोध्याभूप । माझिये मनीं बैसला संकल्प । अनुग्रहा अत्यल्प अवकाश न कीजे ॥ ४७ ॥ यापरी बहुविध करुणाउत्तरें । बोलोनि पंतां विनविलें गंगाधरें । शेवटीं दंडप्राय पडिला भूमीवर । नेत्रीं अश्रुपूर चालिला ॥ ४८ ॥ पंत क्षणीं उचलूनि लाविती कंठीं । ह्मणती तान्हुल्या तुझी वयसा कीं धाकुटी । तथापि तुज पाहिजे जगजेठी । तरी उठाउठीं देवगृहीं जायें ॥ ४९ ॥ तैसा चि धाविन्नला गंगाधर । ठाकोनि आला देवघर । दंडप्राय पडिला भूमीवर । जय जय श्रीरघुवीरस्मरणेंसीं ॥ ५० ॥ ह्मणे धांव पाव गा श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा । पूर्ण परात्पर आत्मयारामा । सुखविश्रामा धांव विभो ॥ ५१ ॥ धांव धांव श्रीलक्ष्मीपते । धांव धांव श्रीजगत्पते ।

मी शरण आलों बाळमतें । अनुग्रह त्वरित दे श्रीरामा ।।५२।। अगा श्रीरामा राजीवनयना । अगा श्रीवासुदेव जगदांतकरणा । तुज मी शरण शरण दीनोद्धरणा। रमारमणा धांव विभो ।।५३।। ऐसा बाष्परोमांचित । श्रीमूर्तीतें विनवीत । परी देव दे्व्हारीं कांहीं च न बोले मात । तेणें गंगाधर विस्मित जाला ।। ५४ ।। मग ह्मणे श्रीरामा सामोपचारीं । आज प्रगट व्हावें मजसामोरीं । ऐसें तुज करणें नसेल निर्धारीं। तरी मी निर्धारीं देह ठेवीन तुजपुढें ।। ५५ ।। तुवां त्या नामदेवासाठीं । नैवेद्य सेविला उठाउठीं । दासी जनाईच्या पाठोपाठीं । शेणी वेचितां कष्टी नव्हसी कसा ।। ५६ ।। तुवां महार चोख्यासंगें । ढोरें वोढावीत निजांगें । कां कबीरकमालसंगें । त्यांच्या मागें शेले विणवी तुवां ।।५७।। ऐशा कां एक दोन आयणी । मी बोलूनि दाऊं बाळवाणीं । देवा ऐकिली ऐसी साच करणी । मज अनुग्रह देउनी संतोषविजे ।।५८।। श्रीएकनाथभक्तीकारणें । तुवां गंगेच्या कावडी वाहणें । पूजा उपकरण सामुग्री गंध उगाळणें । चोपदार होणें श्रीनाथगृहीं तुवां ।। ५९ ।। तेथ तुवां नीच दास्यत्वें वर्तावें । आणि येथ आह्मासवें अक्षर ही न बोलावें। तरी मग कासया देह ठेवावें । ह्मणतां गंगाधर नावेक देहभाव विसरला ।। ६० ।। ऐसा गंगाधराचा निर्धार। देखोनि प्रसन्नला श्रीरघुवीर । कुरवाळोनि मुखकमळ सत्वर। गुह्य मंत्रविचार निवेदिला ।। ६१ ।। श्रीरामें मस्तकीं ठेविला पद्मकर। समाधिशेजे गेला गंगाधर। पुनरपि आणोनि वृत्तीवर। श्रीरघुवीर कुरवाळी तया ।। ६२ ।। श्रीराम ह्मणे बाळा। तुवां संसार करावा अवलीळा । माझिये भजनीं लाऊनि नरनारीबाळा । वैकुंठीं हेळा तुवां यावें ।। ६३ ।। तुज दिधलें गंगातीर। उद्धरावया निजनिर्धार । भक्तिरहस्यादि ग्रंथ अपार । करोनि सत्वर जग उद्धरीं ।। ६४ ।। होतां श्रीरामाचा प्रसाद। गंगाधर लोटांगण घालित । तत्काळ प्रगटले श्रीहनुमंत ।

ह्मणती सांगाती तुज मी यापुढें ॥६५॥ हे अनुग्रहाची वार्ता । पंतां परमोल्हास ऐकतां । सकळ भाग्यश्री सुमंगळता । राणाऊ पंत उपभोगिती ॥ ६६ ॥ अधिकारयुक्त पुत्र सुलक्षणी । वार्ता पसरली कर्णोपकर्णीं । तवं अंबडकर देशमुखानीं । केली मनीं विचारणा ॥ ६७ ॥ जे आपुली कन्या सुलक्षणी । द्यावी ज्येष्ठ गंगाधरा लागुनी । ह्मणीं च आले जांबे ठाकोनी । करिती विनवणी पंतांतें ॥ ६८ ॥ पंत अत्यंत सात्विक । न घेती आढओढ कांहींएक । सती राणाऊ सकौतुक । देत भाक स्वानंदें ॥ ६९ ॥ प्राप्तकाळीं समारंभें विवाह जाला । मिरऊनि आणिलें वधुवराला । राणाऊ वाखाणी स्नुषेला । लक्ष्मी घराला आली ह्मणे ॥७०॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संत श्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ७१ ॥

इति श्रीरामदासकथासारामृत । भीमुविरचितम् नारायणजन्म । गंगाधरअनुग्रह कथनन्नाम चतुर्थ प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥



॥ श्रीराम ॥

## प्रसंग ५ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

श्रीसद्गुरु रामदासाय नमः ॥



ये वढा श्रीसमर्थस्वामी शिरीं । असतां भय कोण अंतरीं । निर्भयें वर्तणूक संसारीं । श्रीरामदास अंतरीं चिंतोनि कीजे ॥ १ ॥ बाप स्वामी श्रीसमर्थ । याचें महिमान काय बोलूं जी येथ । न चले तुळणेसी उपमा सार्थ । जे यथार्थ साजेल ॥ २ ॥ तो नमस्कारिजे

ब्रह्मादिकीं । आदरें पूजिजे शुकसनकादिकीं । तो गौरऊनि मिरविजे त्रैलोक्यीं । शिवविष्णुलोकीं पूज्यमान तो ॥ ३ ॥ श्रीरामदासनामाक्षरें । स्मरतां चि त्रैलोक्य उद्धरे । मंगळ यशाची गुढी उभारे । हर्षातिभरें गंधर्व किन्नर गुणगान करिती ॥४॥ श्रीरामदासनामाक्षर वाणीं । अखंड गर्जे जयाची वाणी । तयाच्या पापा तापा जाली धुणी । वैकुंठभुवनीं घर त्यासी ॥ ५ ॥ श्रीरामदासगुणगान । नारद तुंबर करिती आपण । तेथ मानव बापुडे कोण । श्रीरामदासचिंतन न करावया ॥ ६ ॥ श्रीरामदासरूप डोळां । आवडीं न्याहाळील एकी वेळा । त्यावरी तुष्टला तमाळनीळ सावळा । अति शीघ्र काळें चि उद्धारिजे ॥७॥ श्रीरामदासचरणाचें पूजन । जया घडलें अखंडदंडायमान । त्यासी परमपद प्राप्त जाण । येविषीं अनुमान न धरिजे ॥ ८ ॥ इये मृत्यलोकींचिये नगरीं । एक वर्णावी श्रीरामदासथोरी । येर इतर संसारधारी । वार्ता दूरी सारावी ॥ ९ ॥ हा चि मियां धरोनि भावार्थ । प्रवर्तलों श्रीसमर्थभजनार्थ । सकळ येणें चि पुरती मनोरथ । श्रीसंतवचनार्थ ऐसा चि असे ॥ १० ॥ बाप स्वामी श्रीसमर्थ दयाळ । अवलीळा उद्धरिलें भूमंडळ । सुखरूप केले जीव सकळ । शेखीं आपण अळुमाळ गुप्त ठेला ॥ ११ ॥ गुप्त परी चहुंकडे । ध्यानीं ध्यातां प्रत्यक्ष पुढें । पुरे अवघें चि कोडें सांकडें । समूळ कुडें मावळोनि ॥ १२ ॥ त्या श्रीगोसावियाचिया भजना । तनुमनेंसीं लागावें जाणा । समूळ देहाची विसरतां भावना । तें आपेंआप जाणा श्रीसमर्थ रामदासभेटी ॥ १३ ॥ जाहल्यां श्रीरामदासभेटी । कैंचें द्वंद्व संसारगोष्टी । खुंटली मीतूंपणाची रहाटी । परब्रह्मीं सृष्टि समसाम्य ॥१४॥ जी हा चि अनुग्रहो चिंतोन । वंदूनि श्रीगुरुचरण । हरुषभरें श्रीसमर्थगुणगान । भक्तिपूर्ण करूं ह्मणतों ॥१५॥ तरी तुह्मीं संतश्रोतेजनीं । अवधान द्यावें

मजलागुनी । ह्मणे भीमु हे बाळवाणी । बोबडी बोलणी मान्य करा ॥ १६ ॥ मागां चतुर्थप्रसंगींचें निरूपण । जाहलें नारायणाचें जन्मकथन । उपरी गंगाधरासी अनुग्रह जाण । देतां आपण श्रीरामचंद्रप्रभु ॥ १७ ॥ नारायणाची बाळलीळा । कांहीं बोलिलों अवलीळा । पुनरपि तो चि अभिनव प्रसंग वाहिला । श्रोतीं आणिला पाहिजे चित्तीं ॥ १८ ॥ कोण नवलाचें लेंकरूं । क्रीडे राणाऊचिये मंदिरीं । त्यासवें क्रीडावया लेंकुरांचा परिवारु । अति सत्वर धांवतसे ॥ १९ ॥ नारायणासी घेवोनि भीतरीं । हमामा खेळती हुंबरी । वाजविती पोंवा बासरी मधुरस्वरीं । एकांत निर्जरीं आनंदें क्रीडती ॥ २० ॥ नारायणाविण त्यां लेंकुरां । युगांत जाये क्षण जरा । विसरोनियां मातापितरां । चित्तीं पुरा नारायण त्यांच्या ॥ २१ ॥ नारायणाचा छंद । लेंकुरां लागलासे निर्द्वंद्व । स्वप्नीं बोभाटती अति सद्गद । नारायणा अति सन्निध राहीं रे ह्मणती ॥ २२ ॥ लेंकुरें मेळऊनि सत्वरीं । नारायण दूरी जाये पर्वतदरीं । ध्रुवप्रऱ्हादभक्तमहिमा थोरी । अति निर्धारीं पढवी तयां ॥ २३ ॥ नारोबा वदे त्यां लेंकुरां । बाप हो हा मृत्यलोकींचा नश्वर पसारा । याळागीं सावध होऊनि अति सत्वरा । सारंगधरा स्मरा गड्यांनो ॥ २४ ॥ ते लटिका चि उभविती देव्हारा । लटिका चि कथाकीर्तनपसारा । लटिका चि अन्नसंतर्पण हाकारा । तृप्तिढेंकरा लटिके चि देती ॥२५॥ लटिक्या चि उभविती पताका गुढिया । लटिक्या चि श्रीरामरथमिरवणिया । लटिक्या चि हावभाव श्लोक सवाया । परस्परें या या ह्मणोनि निरोप देती ॥ २६ ॥ तुळसीमाळा मुद्रांकित ठसे । नटोनि लेंकुरें थैकारें नाचती सावकाशें । ऐसें बाळचेष्टा सौरसें । नारायणें पिसें लेंकुरां लाविलें ॥ २७ ॥ नारायणाचेनि संगतीं । लेंकुरें देहभाव विसरती । सर्वकाळ भगवद्ध्यान करिती । संतो-

पती भजनभावें ॥ २८ ॥ लेंकुरें नारायणाचेनि संगतीं । सर्वकाळ श्रीरामनाम स्मरती । मातापित्या स्मरा ह्मणती । नातरी अंतीं श्रम बहू ॥ २९ ॥ नारायण चालतां पाउलीं । सवेग धांवती लेंकुरांच्या पौळी । प्रेमभरें श्रीरामनामावळी । गदारोळीं आनंदें गर्जती ॥ ३० ॥ श्रीरामनामाचा टाहो । लेंकुरें फोडो लागलीं पहा हो । खेळामाजीं प्रत्यक्ष देवाधिदेवो । लक्ष्मीनाहो रंगतसे ॥ ३१ ॥ नारायणाची वयसा थोडी । परि विरक्तता अति गाढी । गिरिकपाटीं पर्वतपाठीं । ध्यानीं दृष्टि लावोनि बैसे ॥ ३२ ॥ त्यासी नावडे गृहींचें राहणें । नावडे कुळकर्ण लिहिणें । त्यासी नावडे संसार पाहणें । जनांत बैसणें नावडे त्यासी ॥ ३३ ॥ देखोनि नारायणाची विरक्तवृत्ति । जन विस्मयाचित्त होती । कोण हा योगिराज ह्मणती । आह्मांमधीं उदेला ॥ ३४ ॥ नारायणाची विरक्तवृत्ति । देखोनि पंत परम संतोषती । धन्य उजळला वंश ह्मणती । पुत्र निवडती हरिभक्त ॥ ३५ ॥ आइका एके दिनीं । नारायण लेंकुरां घेवोनि । भजनक्रीडार्थ जनीं । अति त्वरेंनि पातला ॥ ३६ ॥ मध्यें घेवोनि नारायण । लेंकुरें फेर घेती अति सत्राण । शिणल्या भागल्या सकळ मिळोन । नारायणासन्निध हितगुज करिती ॥ ३७ ॥ इतुकियांत नवल वर्तलें । अकस्मात दिव्य वानर आलें । त्या देखतां लेंकुरें गजबजिले । भयाभीत जाले रुदन करिती ॥ ३८ ॥ रुदन करितां धांवती सैरा । दिशा धुंद सुटला वारा । मेघगड गर्जना वर्षती धारा । पळती बारा वाटा लेंकुरें ॥ ३९ ॥ ते पळतपळतां भागती । वरी पर्जन्यधारा वर्षती । कोणी कवणा न पुसती । जवळ करिती गृह आपुलें ॥ ४० ॥ लेंकुरें सुखरूप आलीं देखोनि । मातापिता हर्षलीं मनीं । परि त्या नारायणावांचोनि । लेंकुरें मनीं तळमळती ॥ ४१ ॥ ते ह्मणती नारायणा । भयानक वानरें वेढिलें जाणा ।

आह्मांसी भेवाविलें विचकोनि वदना । भयानक गर्जना भुभुःकार करुनी ॥ ४२ ॥ नेणो नारायणाची कोण असेल गति । ऐसें लेंकुरें स्फुंदस्फुंदोनि सांगती । ह्मणीच नारायणा-लागीं तळमळती । आक्रंदती दीर्घस्वरें ॥ ४३ ॥ हे वानरव्य-थेची कहाणी । गेली पंतांचिये कर्णी । जे नारायणालागुनी । वानरें वेहुनी दुरंतरा नेलें ॥ ४४ ॥ माय राणाऊ गजबजली । धाय मोकलोनि आक्रंदली । अश्रुपूरें धरा भिजविली । अंग घाली धरणीये ॥ ४५ ॥ माझ्या तान्हुल्या नारायणा । कासया गेलासि वा दूरी वना । कैसा दिससील आतां नयना । कैसा सदना येसील पुन्हा ॥ ४६ ॥ कोण अद्भुत वानरु । माझें झडपूनि नेलें लेंकरूं । आतां कोण उपाव करूं । कोण्या स्मरूं संकटीं देवा ॥ ४७ ॥ ये रे ये रे नारायणा । पाजूं स्तनीं दाटला पान्हा । तुजवीण मज कर-मेना । अत्यंत वेदना हृदय फुटे ॥ ४८ ॥ देखोनि राणाऊचें रुदन । पंत गंगाधर सांतवन करिती आपण । जे क्षणमात्रें चि आह्मी जाऊन । नारायणा शोधोन आणितों ॥ ४९ ॥ येरी-कडे त्या वानरें । नारायणा करोनि घाबिरें । ओलांडूनि पर्वत-शिखरें । अति सत्वरें ब्रह्मारण्यांत आणिलें ॥ ५० ॥ नारायण जंव ब्रह्मारण्यांत पातला । तंव तेथ अकस्मात नवलाव देखिला । महासिद्धांचा समुदाव ठाकला । दिव्यपुरुष शिरोभागीं ॥ ५१ ॥ छत्रचामरें लखलखित । दिव्य सिंहासन शोभत । गळा वैज-यंती झळकत । प्रभा लखलखित कोटिरवीऐसी ॥ ५२ ॥ तो श्रीरघुनाथ कोदंडपाणी । पाठीं भरतशत्रुघ्न दोन्ही । वामांकीं ते जगज्जननी । बंधु लक्षुमण सन्निध उभा ॥ ५३ ॥ हो तें वान्नर पालटलें अकस्मात । तो चि श्रीहनुमंत साक्षात । नारायणासी हातीं धरित । ना भी ह्मणत हास्यवदनें ॥५४॥ राघवें नारायणा पाचारिलें । पिता कोठें ह्मणोनि पुसिलें । दिव्यभाषा पत्र लिहिलें ।

हातीं दिधलें नारायणाच्या ॥ ५५ ॥ मुद्रांकित पत्र लाधतां । अवस्था पालटली तत्वता । अंगें रोमांच थरथर कांपतां । नारोबा देहभाव आतां विसरों पाहे ॥ ५६ ॥ श्रीरामें नारायणा घेवोनि जवळ । उपदेश दिधला महामंत्र तत्काळ । तुझा पाठिराखा हनुमंत केवळ । ऐसें रघुकुळटिळक बोलिला ॥५७॥ ते समई दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें । ह्मणे काय ब्रह्मांड कोसळलें । विचित्र घडलें नवल आजि ॥ ५८ ॥ ह्मणोनि थरथरा असे कांपत । तेणें दांतखिळी बैसों पहात । भवतें टकमका अवलोकित । तंव श्रवणीं आदळत घुधुकार भारी ॥ ५९ ॥ इतुकियामाजीं अकस्मात । विज्जुसारिखें लखलखित । निजांगें दिव्य वस्त्र वेष्टित । सीत निवारणार्थ देखिलें ॥ ६० ॥ वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभा मंडित सुंदर । हुरमुजीसारिखें सपरिकर । अति अरुवार दिव्यतेजें विलसतसे ॥ ६१ ॥ सव्यकरीं पत्र श्रीराममुद्रांकित । वामकरीं अर्धचंद्र बाण श्रीराम देत । इतुकियामाजीं तत्काळ जाली गुप्त । निजांगें श्रीरामचंद्रमूर्ति ॥ ६२ ॥ इतुकें जंव क्षणमात्र हो न सरे । तंव नारायणासी पडिलें अंधारें। वाचा स्तब्ध होऊनि एक संवत्सरें । निजसमाधिनिर्भरें तटस्थवृत्ति ॥ ६३ ॥ येरीकडे पंत गंगाधर धाविन्नले । बाह्यप्रदेशीं पहात गेले । तंव अकस्मात एकाकी देखिलें । ब्रह्मारण्यांत एकलें नारायणा ॥ ६४ ॥ पाहती तंव चकित मानसीं । वाचा कुंठित निश्चयेंसीं । बोलवितां नाना प्रयत्नेंसीं । परि तो निश्चयेंसीं बोलेना ॥६५॥ तंव नागरिक लोक पातले। कित्येकीं कित्तेक तर्क केले। ह्मणती यासी निश्चयें झडपिलें । भूत लागलें बाहेरबाधा ॥ ६६ ॥ कोणी ह्मणती ब्रह्मराक्षस । कीं लागली झोटिंगाची टापस । कोणी ह्मणती अहो यास । मुंज्या निश्चयेंसीं झोंबला ॥ ६७ ॥ एक ह्मणती लागली मायराणी । कीं ते असेल सटवीची झड-

पणी । यासी पंचाक्षरी आणोनी । रक्षा त्वरेंनि करा यासी ॥ ६८ ॥ ऐसे बहुतांचे बहु तर्क झाले । बहुतीं बहु उपाव केले । परंतु तितुके ही व्यर्थ गेले । एक ही केलें चालेना ॥ ६९ ॥ मग सर्वही होवोनि निवांत । उचलूनि निजगृहांत आणित । तंव वस्त्र देखिलें अवचित । अर्धचंद्र आणि पत्र करीं ॥ ७० ॥ मग सकळ लोकांसी आज्ञा दिधली । पितयानें मूठ उकलूनि पाहिली । तंव पत्रावरी मुद्रा झळकली । अक्षरावली श्रीराम-नामांकित ॥ ७१ ॥ पुढें पत्रार्थासी जंव वाचिती । तंव दोघांसी समाधि अवचिती । प्राप्त होवोनि तटस्थ होती । सुख लाधती स्वात्मानुभवें ॥ ७२ ॥ पिता निजसमाधिसुख लाधोनि । देह ठेवोनि तत्क्षणीं । साम्राज्यपदसुखासनीं । निजवैकुंठभुवनीं वास्तव्य केलें ॥ ७३ ॥ ज्येष्ठ बंधु जो कां गंगाधर । त्यासी पत्र वाचितां समाधि साचार । तेणें ही लेखणी वाहोनि सत्वर । श्रीरघुवीर आराधिला ॥७४॥ हे अनुग्रहाची सांगतां वार्ता । मज ही हर्षरोमांच पुलकिता । क्षणएक निवांत बैसतां । श्रीगुरु चित्ता आठवतो ॥ ७५ ॥ तो आठवतो श्रीधरू । जो पराचा ही परु । जेणें माझा केला अंगिकारु । समूळ अहंकारु घालऊनियां ॥ ७६ ॥ श्रीगुरु श्रीधरु श्री समर्थांचा । मी ही एकनिष्ठ श्रीधराचा । तेणें चि श्रीधरश्रीसमर्थभजनाचा । काया वाचा छंद मज ॥ ७७ ॥ हे अनुग्रहाची कहाणी । काय बोलावी म्यां बाळवाणीं । स्मरण होतां चि थरथरोनी । कम्प रोमांच स्फुरोनि स्मरण घडे ॥ ७८ ॥ हे अनुग्रहाची जाणीव । सिद्ध जाणती महानुभाव । मी कांहीं बोलिलों गौरव । यथा-नुभव श्रीसमर्थकृपें ॥ ७९ ॥ आइका कठिण काळ आला । देश आवर्षणीं पीडिला । तेणें लोक अत्यंत जाजावला । न मिळे कंदमूळ पाला भक्षणार्थ ॥ ८० ॥ गाई गुरें मरती पटपटा । लेंकुरें विकिती तटतटा । चोहोंकडे दुःखकल्लोळ मोठा ।

काळ खोटा वोढवला ॥ ८१ ॥ काळांतरें देवें बरें केलें । पूर्वील दिवस पालटले । लोक आनंदें वर्तों लागले । परि नारायणगंगाधरा पूर्वील दिवस असती ॥ ८२ ॥ पंतें केला वैकुंठवास। वडील गंगाधर तो ही उदास । गृहांत पडों लागले उपवास। जननी चित्तास उबगली भारी ॥ ८३ ॥ जननी रागेजोनि ह्मणों लागली । जे कारटीं उगी च भूभार जन्मलीं। याहूनि जन्मतां चि असतीं मेलीं । तरी मी भली ह्मणते कीं ॥ ८४ ॥ जननी ऐसें वदतां । तें न साहवे चि नारायणचित्ता । तैसा चि धाविन्नला शेता । जाला उचलिता गोणिये ॥ ८५ ॥ उचलोनि घेवोनि नारायण घराला । येतांचि कुळंबी माग घेत आला । वहु रागेजोनि वदला । चोर गवसला ह्मणे आमुचा ॥८६॥ नसतीं भाषणें बोलोन । विस्तार वाढविला तेणें । तंव जन ह्मणती इतुकिया काय कारण । आपुली गोणी उचलोन मार्ग धरीं ॥ ८७ ॥ मग तो उचलोनि गोणी । पाउलें चालिला दोनी । तंव चमत्कार देखिला जनीं । जे पुनरपि गोणी तैसी च तेथें ॥ ८८ ॥ तंव धावत चि मुरडला शेतधनी। ह्मणे हे ही माझी च कीं गोणी । पूर्वील नसती गोणी । तरी मग कोठोनि हे दिसती ॥ ८९ ॥ कुळंबियाचे बोला जन हांसती। ह्मणती तुझ्या गोण्या आणिल्या किती । तितुक्या उचलीं सावचित्तीं । यथानिगुती सत्यपणें ॥ ९० ॥ कुळंबी गोणिया उचलउचलों भागला । गोणियांचा पर्वत जाला । राणाऊसदनीं विस्मय दाटला । नवलाव वर्तला जांबनगरीं ॥ ९१ ॥ तेथ लेंकुरें धाविन्नलीं सैरा । जन चमत्कार पाहों येती खरा। स्त्रिया धावोनि येती न वोढितां दारा । कुळंबी पुरा जाजावला ॥ ९२ ॥ तंव सूज्ञजन पुढें होवोन । निवाडा करिती तत्समान। ह्मणती हे देवलीला पूर्ण । एक चि गोणी उचलोन मार्ग धरीं ॥ ९३ ॥ जरी अधिक करिसील उत्तर । तुजला दिव

पाठऊं सत्वर । यालागीं सामोपचार । तुज उत्तरीं बोलतसों ॥ ९४ ॥ तंव कुळंबी लाजिन्नला मनीं । ह्मणे जी माझी एक चि गोणी । करा जी अपराध क्षमा धनी । म्यां ते ही दिधली गोणी या बाळका ॥ ९५ ॥ इतुकें कुळंबी जंव बोलों सरला । तंव अकस्मात गोणियांचा पर्वत गुप्तजाला । जन विस्मयाचित्त ठेला । जननीये वाटला नवलाव भारी ॥ ९६ ॥ जननी नाराय-णासी घेवोनी पोटीं । कडकडोनि लावी कंठीं । ह्मणे मीच चांडाळीण खोटी । धान्यासाठीं लेंकुरा शिणविलें ॥ ९७ ॥ मग त्या दिवसापासोन । राणाऊ लेंकुरा न दुखवी च बोलेन । सर्वकाळ श्रीरामचिंतन । काळक्रमण आनंदें चालिलें ॥ ९८ ॥ गंगाधरपंताचें सत्वधीर वर्तन । त्यासी जन भेटी येती आद-रोन । जाणूनि अयाचित वृत्ति कारण । सामुग्री धांवधांवोनि पुरविती ॥ ९९ ॥ हरिभक्त आणि हरिभजन । तेथ काय हो पडेल न्यून । अष्टमहासिद्धि झाडिती अंगण । लक्ष्मी आपण नीच दास्यत्व करी ॥ १०० ॥

अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

श्री. भ. गी. अ. ९-२२.

तया अभेदभक्ताचिया भक्तिभावा । देवा प्रतिपाळ करणें पांडवा । न मिळतां प्राप्त करणें ठेवा । उणयापुरयाचा न पडावा दुकाळ तेथें ॥ १ ॥ भक्त आणि दरिद्रता । हे तंव बोलों चि नये वार्ता । पांडव लाखगृहीं जळतां । श्रीकृष्णें अव-चिता प्रतिपाळ केला ॥ २ ॥ सती द्रौपदीच्या सत्वहरणा । कौरवेशें दुर्वास अवकाळीं धाडिला भोजना । तेथ ही प्रगटला श्रीकृष्ण त्रैलोक्यराणा । द्रौपदीमनकामना पुरविली ॥ ३ ॥ तो प्रऱ्हाद दैत्यकुळीं । भजन करितां पिता छळी । तेथ ही नृसिं-हरूप प्रगटलें तत्काळीं । दैत्य चांडाळ मर्दिला ॥ ४ ॥ त्यासी

भक्ताचें उणेंपण । कल्पांतीं न साहवे चि जाण । सुदामजीचे मुष्टि पोहे भक्षून । केली सम्पूर्ण सुवर्णनगरी ॥५॥ ह्या काइशा पौराणीक कथा । आबालवृद्धा श्रुत नरसीमेहता । त्याचिया हुंडीतें पटविता । प्रगटला अवचिता द्वारावतींत श्रीभगवान ॥ ६ ॥ त्या दुष्काळपीडितया जना । दामाजीपंतें कोठार लुट-विलें जाणा । ते काळीं रसीद भरावया कारणा । श्रीविठ्ठलें महार होणें नवल कीं ॥ ७ ॥ येथ ही नारायणासाठीं । देवें नवल केलें उठाउठी । गोणियांची न पडे चि तुटी । निजांगें जगजेठी गोणिया जाला ॥ ८ ॥ आइका नारायण गंगाधर । वर्तती नवलकवतुकाचार । उभयता बंधु परस्पर । प्रीति अपार सख्यपणीं ॥९॥ ज्येष्ठ बंधु गंगाधर । त्यासी धाकुला नारायण अति तत्पर । परस्परीं विरोधोत्तर । कल्पांतीं साचार नाडळे कीं ॥११०॥ गंगाधरपंत अति शांत । नारायण चपळपणीं अति विख्यात । वानरचेष्टा आचरित । नाडळे स्वस्थचित्त क्षणएक ॥ ११ ॥ बहुतीं बहु उपदेशिलें । परी ययाचें ऐसें चि केलें चाले । संवत्सर एक मौनमात्र गेलें । आरंभिलें भजन पुन्हां ॥ १२ ॥ नारायणाची वर्तणूक । वान्नराऐसी च निःशंक । चपल चंचलता अत्यंतिक । जन विस्मयें कौतुक कारितातीं ॥ १३ ॥ गांवचीं लेंकुरें मिळोन । नगराबाहेर करिती क्रीडाभुवन । नारोबा वृक्ष-शिखरीं वळंघोन । भुभुःकारोन उडिया घेत अनिवार ॥ १४ ॥ उडिया घेत वृक्षावरी । उडिया घेत भिंतीवरी । उसंत नेघे चि क्षणभरी । लीला सारी विचित्र करी ॥ १५ ॥ नारायणाची विचित्रता देखोनि । जननी वदे नारायणालागुनी । बाळा धरीं कांहीं सोय मनीं । संसार ध्यानीं आण कांहीं ॥ १६ ॥ ऐसें हें जननीचें आइकोनि वचन । तत्काळ उतरंडीं गेला नारा-यण । गुप्त अंधारीं रिघोन । ध्यान धरोन बैसला ॥ १७ ॥ स्मरण होतां जननी ह्मणे । आजि कोणीकडे गमन केलें नारा-

यणें । बहु काळ झाला अझुनी येणें । नारायणें कां न केलें ॥ १८ ॥ ह्मणोनि निघाली नारोबाशोधार्थ । बिदोबिदीं शोधिलें बहुत । रानींवनीं धुंडिलें आडविहिरींत । शोध निश्चितार्थ नलगे चि कोठें ॥ १९ ॥ मग कांहीं गृहकृत्याकारणीं । जननी प्रवेशली अंतरसदनीं । अंधारीं अडखळतां दचकली मनीं । तंव अचुक नारोबा आढळला ॥ १२० ॥ जननीयें काय रे बा करिसी पुसतां । नारोबा वदे करितों विश्वाची चिंता । किती श्रमी जालें तुज धुंडितां । येथ अंधारीं अवचिता दडोनि राहसी ॥ २१ ॥ देखोनि नारायणाची विरक्तवृत्ति । जननी बहु चिंता करी चित्तीं । ह्मणे ययाचीं लक्षणें विपरीत दिसती । जाईल अवचितीं निघोनि कोठें ॥ २२ ॥ कोण्ह्या विरक्त साधूच्या संगतीं । हा निघोन जाईल निश्चितीं । यालागीं विवाह केल्यां त्वरितगतीं । तरी च यथानिगुतीं आकळेल हा ॥ २३ ॥ पंतगृहींचे कुळोपाध्ये । नारायणा पाचारोनि सन्निध । उपदेश करिती नानाविध । सद्वोध सूज्ञ चालीं ॥ २४ ॥ कुळगुरु वदे नारोबा तूं अनर्थ करिसी । वृक्षशिखरीं लेंकुरा नेवोन बैसविसी । कां वरी पाषाण ही मारिसी । तेणें कासाविसी जीव त्यांचा ॥ २५ ॥ पंत निवर्तल्यापासोन । तुह्मा धाक चि नुरला अणुप्रमाण । हे आह्मांसी नावडती तुमचे गुण । या गुणें भलेपणा न मिळे तुह्मा ॥ २६ ॥ दों दिसा तुमचा विवाह करणें । तुमचें तंव हें विपरीत वर्तणें । या गुणें संतुष्ट न होती कीं सज्जनें । तुमचें वर्तणें आह्मासी न रुचे ॥ २७ ॥ विवाहाची निघतां वार्ता । नारोबा पळोनि गेला सत्वरता । वृक्षशिखरीं बैसला निवांता । दृष्टीपरौता सकळांसी जाला ॥ २८ ॥ तंव सकळीं सकळ शोधिलें । शोधितां वृक्षशिखरीं देखिलें । गृहीं यावयासी विनविलें । तंव नारोबानें केलें विपरीत तेथें ॥ २९ ॥ हे गृहासी नेतील । आग्रहें विवाह मां-

डितील । ह्मणीं संसारीं गोंवितील । श्रीरघुनाथ अंतरेल निश्च-
येंसीं ॥ ३० ॥ वरून ऐसें विचारूनि मनीं । नारोबा क्रोधें
उडी घेत वृक्षावरून । तेणें डोहांत शरीरपीडा अति दारुण ।
आलें आवाळु भृकुटीमध्यभागीं ॥ ३१ ॥ नारोबा डोहांत बु-
डाला । सर्वत्र हा चि शब्द उठिला । नागरिकांचा पोवा
धाविन्नला । राणाऊनें मांडिला आकांत भारी ॥ ३२ ॥ जांबेचे
जन घाबिरे जाले । सकळीं रुदन आरंभिलें । सकळीं अन्न-
पाणी वर्जिलें । दुःखीकष्टीं बैसले डोहाभोंवतीं ॥ ३३ ॥ तेथें
येवोनि गंगाधर । शांत केलें लाहानथोर । मी नारोबासी बो-
लावितों सत्वर । ह्मणोनि सादरें सरसावला ॥ ३४ ॥ डोहा-
सन्निध उभा राहोन । गंगाधर हाक देत आपण । तों चि
नारायण ह्मणीं वो देवोन । वरी येवोन सकळां भेटला ॥ ३५ ॥
नारायणप्रकृतिमान अस्वस्थ जालें । नारायणा गृहीं घेवोनि
आले । सकळ ही भिवोनि वर्तों लागले । बोलो विसरले
विवाहवार्ता ॥ ३६ ॥ या उडीयोगें नारायण । बहुकाळ रा-
हिला अंथरुणा खिळोन । बंधु माता अति भिवोन । नाराय-
णासीं वर्तती ॥ ३७ ॥ पुढें नारोबाशरीरीं उपचार जाला ।
पुनरपि जननीमनीं विचार भरला । वडील पुत्रासी निवेदिला ।
जे विवाह जाला पाहिजे नारोबाचा ॥ ३८ ॥ कैसे ही करोन ।
विवाहीं राजी करावा नारायण । हे माझिये मनींचे
मनोरथ पूर्ण । करणें तुजकडे गंगाधरा ॥ ३९ ॥ तंव
गंगाधर ह्मणती जननीये । हें तंव कल्पांतीं घडों नये । मी-
करूं पाहतों उपाये । परि निश्चयें भाक न देववे ॥ १४० ॥ मग
जननी च घेवोन नारायण । एकांतीं ह्मणे तुज माझें वचन कीं
प्रमाण । नारोबा वदे तुजवेगळें दैवत न देखों आन । आज्ञा
प्रमाण मज तुझी ॥ ४१ ॥ तुजपुढें काढितां विवाहगोष्टी । तंव

तूं करिसी नाना चाउटी । थोर विघ्न आणि आटाटी । तेणें दुःखी कष्टी आह्मी होतसों ॥ ४२ ॥ तरी तुझें हें करणें उचित नोहे । तुज माझी च कीं आण आहे । अंतरपाट धरी तों लग्न-मंडपीं राहें । माझी आवडी हे पुरवीं तूं ॥ ४३ ॥ तंव नारोबा-मनीं विचार पडिला । जननीशब्द तरी पाहिजे राखिला । पूर्वसंकेत हि पाहिजे पाळिला । विचारूनि जननी बोला बरें ह्मणे ॥ ४४ ॥ इतुकी च भाक घेवोन । जननी संतुष्टली पूर्ण । अंतरपाटीं उभा राहिला नारायण । मंगळअक्षता पडणें कठिण नोहे ॥ ४५ ॥ भानजीपंतांची सुस्वरूप कन्या पाहिली । पत्रि-का ही छत्तीस गुणीं उतरली । सदनीं विवाहसाहित्याची गर्दी जाली । निमंत्रणपत्रिका लिहिल्या गंगाधरपंतें ॥ ४६ ॥ श्री-रामदासकथासारामृत । सावधान संत श्रोते परिसोत । श्रीधर-चरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ १४७ ॥ पंचमोध्याय संपूर्णमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ६ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

श्रीसद्गुरु रामदासाय नमः ॥


म राजीवलोचन । राम निजात्मसुखैकघन । राम विधी विश्वंभर सनातन । सकळ कल्याण श्रीराम-संगतीं ॥ १ ॥ श्रीरामचंद्रकृपानेटें । समूळ आधि-व्याधि दुःख निवटे । जन्ममरणाचा पांग फिटे । होय तळपट कळिकाळाचें ॥ २ ॥ बाप वाल्मि-काचें भजन फळलें । लिहिलें भजन साच घडलें । न भूतो न भविष्यति चरित्र जालें । नवल वर्तलें त्रिभुवनीं ॥ ३ ॥ श्री-

रामचंद्रसहजचाळीं । शिळा अहिल्या उद्धरली । जनकसभे धनुर्भंगीं ख्याति लाविली । आदिशक्ति पर्णिली जनकात्मजा ।।४।। श्रीराम अयोध्येचा राजा । त्यासी शरण हनुमंत सहजा । बिभीषण जांबुवंत अंगद सुग्रीवराजा । अनन्य फौजा जुत्पतींच्या ।। ५ ।। मारिले त्रिशिर खर दूषण । मुख्य करून रावण कुंभकर्ण । अखया अतिकाय प्रहस्त प्रधान । मुख्य मुखरण इंद्रजित निवटिला ।। ६ ।। हे मूळ रामायणींची कहाणी । कलीमाजीं देखिली सज्जनीं । श्रीएकनाथ भावार्थरामायणीं । भावार्थ वाणी बोलिले ।।७।। मुनि वाल्मिकीनें भविष्य वर्तविलें । तें तिहीं लोकीं साच घडलें । श्रीएकनाथ भावार्थ बोलिले । अवतारा आले श्रीहनुमंतस्वामी ।। ८ ।। हा श्रीज्ञानियाचा अंशावतारी । मुनी वाल्मिकीचा कलत्र भारी । बोलोनि गेला वैखरी । तें तें साचपरी देखिलें ।। ९ ।। श्रीभावार्थरामायणींचा हनुमा । तो चि श्रीसमर्थ परमात्मा । भूभार उतरावया प्लवंगमा । श्रीराम परमात्मा नियोजी ।। १० ।। कठिण विषमकाळीं । सहाय्य सखा श्रीहनुमा बळी । श्रीरामभद्रसम्मेळीं । वानरपौळी उपतिष्ठती ।। ११ ।। श्रीरामप्रभूचें मनीचें करी । श्रीरामप्रभूचें अनुसंधान वरी । श्रीरामचंद्रमहिमा विस्तारवी भारी । तो हा अविश्रम निर्धारीं श्रीसमर्थस्वामी ।। १२ ।। भीम भयानक प्रसंग पाही । प्रसंगाऐसी वर्तणूक देहीं । सामर्थ्य बळेंसी तुळणा नाहीं । हे सांगूं मी काई श्रीसमर्थमहिमा ।। १३ ।। फोडिलें रावणाचें धैर्यमडकें । सिताशुध्यर्थ धरधांडोळी घेतली लंके । भंगिलीं रावणाचीं असंख्य कटकें । जंबुमाळी अचुके धुळीं मेळविला ।।१४।। ह्या श्रीहनुमंतजीच्या आचरिल्या चेष्टा । श्रीनाथरायें भावार्थीं वर्णिल्या स्पष्टा। सज्जनीं अवकाश करूनि मोठा । ग्रंथ अदटा श्रवण कीजे ।। १५ ।। अदट दाडगा श्रीहनुमा वीर । श्रीरघुनाथसेवें अति तत्पर । कपीकुळींचा

कटकसंभार । शरण निरंतर ज्यासी सदा ॥ १६ ॥ अदट दाट्गा महाबळी । हनुमा तळपे श्रीरामदळीं । सर्वे चि असुरांची फोडोनि फळी । असुररवंदळी मांडिली येणें ॥१७॥ श्रीहनुमंतस्वामी श्रीसमर्थस्वामी । प्रतापतेजें सुरवर पडिले भ्रमीं । महिमा वर्णितां । थकित श्रीएकनाथस्वामी । तेथें किती मी बापुडा ॥ १८ ॥ धन्य श्रीएकनाथभावार्थलेखा । भावार्थीं भविष्य दाविलें देखा । जयाचा ठाव नकळे श्रुतिवेदांदिकां । तो प्रसंग चोखा वर्णिला ॥ १९ ॥ लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला । आमुचा हनुमंत कैवारी पावला । चळीकांप सुटला असुरांसी ॥ २० ॥ स्वधामा जातां याचि कारणा । प्रभू श्रीरामचंद्रप्रेरणा । भक्तसंकट निवारणा । ठेविला हनुमंत कंदना असुरांच्या ॥ २१ ॥ हे कहीं करितील प्रळयो । अथवा गोब्राह्मणभक्तक्षयो । तो झणी जाणूनि कठिण समयो । प्रभूनें हनुमा पहा हो नियोजिला ॥ २२ ॥ तो चि श्रीहनुमंत शुद्ध मानवी वेषें । जांवेंत प्रगटला निरावकाशें । नानापरीच्या बाळलीला सौरसें । भीमु ह्मणे संतोषें हा लीलाविग्रही ॥२३॥ आइका पंचम प्रसंगींचें निरूपण । जननीये भाक देत नारायण । जे अंतरपाट धरीं तों उभा टाकेन । एविषीं अनुमान न धरावा ॥ २४ ॥ नारायणाची अनुकूळ वाणी । पडतां जननीयेचे श्रवणीं । अत्यंत दाटला हरिख मनीं । ह्मणे त्रिभुवनीं धन्य मी जालों ॥ २५ ॥ माझिया नारोबाचा विव्हाव । मी सरता करीन ठावोठाव । समारंभें पूजीन कुळदेव । विघ्ना वाव न पडावया ॥ २६ ॥ मज नारोबाचा अत्यंत हरिख । देखावें तयाचें विवाहकवतुक । विघ्न नासो विघ्नविनायक । चतुर्थी निष्टंक धरिली मियां ॥२७॥ कृपा करो दाशरथी । सुमंगल साधो लग्नतिथी । सहाय्य असावे श्रीउमापति । शतधा चित्तीं शरण मी त्यासी ॥२८॥ यापरीं सोल्हसित वृत्तीं । राणाऊ गंगाधरा नेऊनि

एकांतीं । ह्मणे तुवां आजि जावें त्वरान्वित गती । निज मातुळाप्रती आणावया ॥ २९ ॥ तेथ भानजी बैसला असेल भोजना । तुवां येथ आणावें हस्तप्रक्षाळणा । न करावे वेळ-वेवधाना । सीमांतपूजना ह्मणी अवकाश होय ॥ ३० ॥ देखोनि मायेचा हरिख । मनीं गंगाधर साशंक देखे । ह्मणे नारोबा एकाकी एक । निज भविष्य चोख विसरला ॥ ३१ ॥ भविष्य कैसें विसरला । जननीप्रति काय बोलिला । हें चि पुसों पां जननीला । ह्मणोनि वहिला सरसावला ॥ ३२ ॥ माये मज तुझी आज्ञा कीं प्रमाण । परी तुजप्रति काय बोलिला नारायण । तें तुवां कृपा करोन । एकवार श्रवण करवावें ॥ ३३ ॥ तंव जननी तया बोलिली । जे म्यां नारोबाची भाक घेतली । ' अंतरपाट धरे तों बोहलीं ' । तुमच्या बोलीं अनुसरेन ऐसी ॥ ३४ ॥ यालागीं धरिलिया अंतरपाट । नारोबा सांपडेल स्पष्ट । टाळी वाजऊं कडकडाट । वाजंत्री घडघ-डाट लग्नमंडपीं ॥ ३५ ॥ तरी तुवां आतां । ह्मणी अवकाश करितां । कहीं विघ्न वोढवेल अवचिता । जाईल परता नारोबा हातींचा ॥ ३६ ॥ तंव मनीं चमत्कारला गंगाधर । ह्मणे नारोबा अत्यंत चतुर । माय भोळी शब्दांतर । भाक अरुवार नेणे ते ॥३७॥ सवे चि जननीसी वंदोन । निज मातुळा चालिला त्वरा करोन । तंव एकांत मार्गीं भेटला नारायण । ह्मणे निज भविष्याचरण रक्षावें बंधू ॥ ३८ ॥ तुह्मी सर्वज्ञ सर्व जाणता । आणि आह्मां नाथिलें चि गोंविता । तरी मग पुढील भवि-ष्याची भविष्यकथा । कोण सरता करील सांगा ॥ ३९ ॥ काय नेणा मुळींच्या स्वरूपा । धर्मसंस्थापना करितसा खेपा । जाळि-तसा त्रिभुवनींच्या तापा । सुपंथ सोपा तुमचेनि जगा ॥ ४० ॥ भागा आला कार्यभाग । तो सिद्धी न्यावा जी निर्व्यंग । विवेक करावा सांगोपांग । मी एकाकी एकांग ब्रह्मचारी ॥ ४१ ॥

हां हो जी वडील तुह्मी । जें जें करूं सांगाल स्वामी । तें तें श्रद्धापूर्ण आचरूं आह्मी । परी विवाहसंभ्रमीं नातळों जी ॥ ४२ ॥ माय जननीयेच्या आग्रहा । कांहीं भाक बोलिलों पहा । परी निधडा शब्द राखेन हा । जे अंतरपाट धरी तों राहेन ऐसा ॥ ४३ ॥ नारोबा इतुकें बोलों सरतां । तंव मिठी पडिली उभयतां । गंगाधर वदे धन्य नारोबा तुझी वाग्देवता । कलीमाजीं सरता तूं एक ॥ ४४ ॥ मज तुझा कीं भरवंसा । तुज कल्पांतीं नातळे मायेचा फांसा । तूं निःशंक आचरे बोला ऐसा । अपराध सहसा न गणूं आह्मी ॥ ४५ ॥ आतां लौकिक रीतीं । मी जातों मायामातुळाप्रती । जननीबोला लग्न तिथी । सोयरीक निश्चितीं तुज आणितों ॥ ४६ ॥ तें निज मातुळ बोद्लापुर । क्षणीं ठाकोनि आले गंगाधर । आप्त इष्ट आलिंगन वंदन परस्पर । कुशळोत्तरीं क्षेम पावती ॥ ४७ ॥ ते भानजी हरिदास परम भक्त । श्रीएकनाथस्वामी अनुग्रहित । हरिकीर्तनीं परम विख्यात । पुण्य अद्भुत पूर्वार्जित जयांचे ॥ ४८ ॥ श्रीएकनाथ भानुदासकुळीं । प्रत्यक्ष महाविष्णु माहितळीं । धर्मसंस्थापनेची पहाट फुटली । साधकें लाविलीं भजनपंथा ॥ ४९ ॥ ‘ एका जनार्दनी ’ नाम श्रवणीं पडे । त्यासी वैकुंठींचे दारवंटे उघडे । कळिकाळ गजबजोनि परता दडे । ऐसे चोखडे श्रीएकाजनार्दनस्वामी ॥ ५० ॥ श्रीएकनाथस्वामींचे द्वारीं । श्रीहरि उभे अष्टौ प्रहरीं । न्यून पडों चि न देती अणुभरी । धन्य थोरी नाथांची ॥ ५१ ॥ श्रीएकनाथस्वामींचे घरीं । निजांगें राबतसे श्रीमुरारी । कावडी खांदीं पाणी भरी । सेवातत्परीं राहिला ॥ ५२ ॥ भानुदास एकनाथ नाम । ऐकतां चळीं कांपे यमधर्म । अधम ते ही केले भक्तोत्तम । ऐसे उत्तमोत्तम श्रीएकनाथस्वामी ॥ ५३ ॥ धन्य श्रीजनार्दनाची कृपा । उजळिलें

एकादशस्कंध भागवतदीपा । जाळियलें संसारअघतापा । पुरुषोत्तम सोपा जयाचेनि भजनें ॥ ५४ ॥ धन्य श्रीदत्तात्रयांचा साक्षात्कार । धन्य तो देव गिरीवर । धन्य तें प्रतिष्ठाणक्षेत्र सुंदर । धन्य धन्य तें तीर गोदेचें ॥ ५५ ॥ धन्य श्रीएकनाथपादुका । धन्य त्या 'षष्ठी' तील भाविकां । धन्य असो त्या क्रिमीकीटकां । सन्निध वास निका श्रीएकाजनार्दनस्वामी ॥५६॥ भानुदास एकनाथ । येणें वाचा सनाथ । निश्चयेंसीं पुरती मनोरथ । ख्याति अद्भुत अद्यापवरी ॥ ५७ ॥ श्रीएकनाथमहिमान । बोलावया समर्थ कोण । जेथ श्रुतिवेदां पडिलें मौन । तें वदावया वदन मज नाहीं ॥ ५८ ॥ यालागीं नमस्ते नमस्ते स्वामिया । जैसे असाल तैसिया । वाचा कुंठित बोलावया । आर्त भेटावया वळु लागले ॥५९॥ हां हो जी श्रीएकाजनार्दनीं । मी अनन्यभावें लोटांगणीं । पदरीं घ्यावें निज तान्हयालागुनी । चित्तीं न गणूनि अपराधा ॥ ६० ॥ तंव श्रोते ह्मणती नवल जालें । तुवां माजीं हें काय आदरिलें । श्रीएकनाथस्तवन विस्तारविलें । मुख्य निरूपण ठेलें ठाईंच्या ठाईं ॥ ६१ ॥ तेथ भीमु ह्मणे क्षमा करा स्वामी । प्रसंगें आठवले श्रीएकनाथस्वामी । श्रीसमर्थ श्रीएकनाथस्वामी । मज तंव संभ्रमीं एकरूप जाले ॥ ६२ ॥ तरी आतां भलें केलें । स्वामींनीं सेवका जागविलें । श्रीएकनाथप्रेमें वाहाविले । आतां आठवीन वहिलें मुख्य निरूपण ॥ ६३ ॥ आइका तरी श्रीनाथस्वामीअनुग्रहित । गंगाधरमातुळ परमभक्त । गंगाधरा गौरऊनि आलिंगित । कुशळ पुसती सन्निध बैसउनी ॥ ६४ ॥ बाळ गंगाधरा भला आला । आह्मां परम संतोष जाहला । पुनरपि कडकडोनि कंठीं लाविला । गहिंवर दाटला उभयता ॥ ६५ ॥ काय भगिनी सुखी पूर्ण । तो बाळ रवी सुखी नारायण । बाप हो कांहीं पडिल्यां न्यून । मज अवश्य जाण कळवावें ॥ ६६ ॥ बाळ नारायणाची लीला । आह्मी ऐकतसों

वेळोंवेळा । तेणें आह्मां संतोष सकळां । धन्य उजळला राणाऊ-कुसुवा ॥ ६७ ॥ नारोबाची वानरी लीला। ऐकतां आह्मा आश्चिर्य सकळा । एक विशेष नवलाव आइकिला । जांबेंत गोणियांचा लाविला ढीग येणें ॥ ६८ ॥ बाप हो धन्य तुमचें बंधूपण । धन्य तुमचें परस्पर वर्तन । धन्य तुमचें मातृआर्चन । वंशउद्धरण तुह्मीं च केलें ॥ ६९ ॥ तरी बापा गंगाधरा । आमुचे मनीं बैसला भाव पुरा । आह्मीं स्वकन्येसी निवडिला नोवरा । सगुण साचोकारा नारायण एक चि ॥ ७० ॥ त्याचिया स्वरूपलक्षणीं । तुळणा नाहीं त्रिभुवनीं । तुवां पुरवावी हे आमुची आयणी । भीड खर्चूनि गंगाधरा ॥ ७१ ॥ तुवां ह्मणितल्यां तो आइके । यरव्हीं कवणाहि नाइके । आह्मी सकळीं मिळोनि कौतुकें । जावई अचुक निवडिला नारायण ॥ ७२ ॥ तयाचें तें गुणलक्षण । अंग-काठी ठाणमाण । ब्रह्मतेज परिपूर्ण । असाधारण दिसतसे ॥ ७३ ॥ तयाची जन्मपत्रिका । पंतें आम्हा दाविली सकौतुका । हा होईल महापुरुष नेटका । शब्द लटिका न म्हणावा ॥ ७४ ॥ यालागीं बापा तुवां । आमुचा शब्द सिद्धी न्यावा । नोवरा गजरें मिरवीत आणावा । विव्हाव व्हावा समारंभेंसीं ॥ ७५ ॥ तंव स्मित हास्यें बोलिला गंगाधर । वडिलीं केला जो विचार । तो चि जननींचित्तीं आदर । भेटीसी सत्वर वाहतसे आपणा ॥ ७६ ॥ नारोबाचें वर्तणें । आम्हां सकळां नवलवाणें । त्याचें किती करावें गुणगाणें । अत्यंत साजणें तेणेंसीं आम्हा ॥ ७७ ॥ तो तंव शुद्ध रुद्रावतारी । मानवी तनु नव्हे निर्धारीं । पूर्ण ब्रह्म सचराचरीं । लौकिकाचारीं नातळे तो ॥ ७८ ॥ तो बालधर्मसूर्य संमती । उदय पावला येईल प्रचीती । भक्तिपेठ दुमदुमेल संतीं । अयोध्याधीश श्रीरघुपतिचेनि धर्में ॥ ७९ ॥ नारायण आमुचा विसावा । नारायण आमुचा जीवा-भावा । नारायण आमुचा निज निधान ठेवा । अत्यंत बरवा

नारायण आमुचा ॥ ८० ॥ नारायणें सुमंगळ केलें । नारायणें निजभजन फळलें । नारायणें निजवंशा भूषविलें । नारायणें जोडले श्रीरामचंद्रप्रभु ॥ ८१ ॥ श्रीरघुनाथजीच्या सेवें । नारायणें विकिलें जीवेंभावें । नवल कलियुगीं जें न व्हावें । तें चि स्वयमेव नारायण आचरूनि दावी ॥८२॥ त्याचें किती करावें गुणगाणें । तो आमुचा जीव कीं प्राण । त्याविण आह्मां न गमे पळ क्षण । ऐसा नारायण प्रिय आह्मां ॥ ८३ ॥ त्यासी विवाहाची वार्ता पुसतां । तो उठोनि धांवें अरण्यपंथा । त्यासी अतिप्रसंग करूं जातां । घेतली डोहांत उडी तेणें ॥ ८४ ॥ ते-काळीं जांबेंतील जन । बाल स्त्री वृक्ष पाषाण । दुःखार्णवीं बुडा-लीं सम्पूर्ण । कोणें सांतवन कोणेसीं कीजे ॥ ८५ ॥ मायेनें थोर मांडिला आकांत । नारोबासीं दाखवारे ह्मणत । तंव मी धांविन्नलों निभ्रांत । नारोबा वरी ये ह्मणतां वरी आला॥८६॥ त्यासी तईंपासोनी । विवाहवार्ता न काढीच कोण्ही । मग मायेनें हळु एकांतीं नेउनी । निज भाकवचनीं बद्ध केला ॥ ८७ ॥ तें जननीचें वचन ऐसें । जें अंतरपाट धरीं तों असावें सावकाशें । यालागीं मामाजी तुह्मी सौरसें । विवाहसंतोषें सुखी व्हाल वाटतें ॥ ८८ ॥ यापरी गंगाधराचें आइकोनि वचन । हरुषभरें टाळी पिटिती सकळ मिळोन । ह्मणती नारोबा अंतरपाटीं सांप-डल्या जाण । विवाह पूर्ण सिद्धीस नेऊं ॥ ८९ ॥ मग गंगा-धर भानजी रथीं बैसोन । ठाकोनि आले जांबभुवन । भानजी राणाऊ एकांतीं बैसोन । विवाह पूर्ण निश्चीत केला ॥ ९० ॥ तें विवाहप्रसंगीचें निरूपण । करूं जातां परिपूर्ण । ग्रंथ वाढेल असाधारण । यालागीं अल्पसाधारण बोलिजेल ॥ ९१ ॥ भानजीपंत बोदलापुरा जावोन । साहित्य करविती अतित्वरेनें । उभयपक्षीचें अधिक उणें । अणुप्रमाण उरोंचि न देती ॥ ९२ ॥ येरीकडे राणाऊ गंगाधर । साहित्य करविती अतिसत्वर ।

आप्तवर्ग दूरस्थ दूरवर । मिळाले सपरिवार विवाहप्रसंगीं ॥ ९३ ॥ नारायणा लागली हळद । वाजंत्री वाजती अति सन्नद । करवल्या ओंव्या गाती नानाविध । परमानंद जननियें ॥ ९४ ॥ कुळींचा कुळधर्म केला । नोवरा देवालयीं बसविला लग्नसमारंभ नगरा बाहेरी आला । समारंभें चालिला बोदला-पुरा ॥ ९५ ॥ निकट येतांचि बोदलापूर । सामोरे धांवती सान-थोर । नोवरा देखोनि संतुष्ट नारीनर । भाग्य अपार कन्येचें ह्मणती ॥९६॥ मग भानजीपंतें प्रशांत निर्मळ । जानवशा दिधलें सुस्थळ । सीमांत पूजनाची आली वेळ । वेध सकळां सीमांत-पूजनीं ॥ ९७ ॥ नगराबाहेरी भीममंदिरीं । नारोबा बैसला लौकिकाचारीं । अति शांत प्रकृतिभेद न करी । वेध अंतरीं न कळवीच कवणा ॥ ९८ ॥ तो दिसतसे शांतस्वरूप । परी अंतरीं खडतरला प्रखरतर ताप । त्यासी लेवविलीं अलंकारभूषणें अमूप । उपजे अनुताप तेणेंचि त्यासी ॥ ९९ ॥ तो ह्मणे हे कोण देहविटंबना । मज काइसी जोडिती अंगना । मी झणीं निघेन पुरश्चरणा । यांचिया मना येइल तें येवो ॥ १०० ॥ स्त्रीसंगती सुख कोण । स्त्रीसंगती काम दारुण । स्त्रीसंगतीं देहबंधन । अवश्य मरण स्त्रीसंगती ॥ १ ॥ स्त्रीसंगती ममता वाढे । स्त्रीसंगती अपराध जोडे । स्त्रीसंगती परमार्थ बुडे । नव्हे धडफुडें स्त्रीसंगती ॥ २ ॥ स्त्रीकामें प्राणी नागविला । स्त्रीकामें प्राणी बंध पावला । स्त्रीकामें संसार वाढला । मुख्य विसरला भजन भगवंताचें ॥ ३ ॥ स्त्रीकामाची आंदणी दासी । नागऊं जाणें पुरुषासीं । हटें तटें नेतसे पतनासी । हें पुरुषांसीं नेणवे ॥ ४ ॥ स्त्रीकामाची सोलीव कांकडी । पुरुषातें भुलवी घडी-घडी । नेत्रकटाक्ष बाण सोडी । केलीं वेडीं भाविकें ॥ ५ ॥ स्त्री केवळ पतनाचें मूळ । स्त्रीदेह अमंगळां अमंगळ । घडतां

स्त्री संग एकांत पळ । मरणा मूळ तें त्यासी ॥६॥ यापरी स्त्री-संगती । पुरुष नागवले नेणों किती । मागें नागविलें पुढें नागवती । मुख्य अधोगती स्त्रीसंगती ॥७॥ अनित्य येथील वसती । लोक भुलोनि गेले स्त्रीसंगतीं । वृथाभिमानें भरीं भरती । शेखीं जाती मरोनियां ॥८॥ यांसी मरणभयाचि नाहीं । कोण भरंवसा धरिती देहीं । काळ पाठीं उभा अवकाश नाहीं । यापरी अनिश्चित पाहीं हा लोक ॥ ९ ॥ येथील वस्तुजात पाहणें । तें नाहींचि ऐसें जाणणें । एका राघवावीण सर्व सुणें । उदास वर्तणें श्री-रामभक्तीं ॥ १० ॥ जन्मा आलियाचें कारण । मुख्य करावें भगवद्भजन । त्याचें सर्वभावें पूजनअर्चन । देहपतन होईतों कीजे ॥ ११ ॥ पाय ठेवितां धरणी । राघवा आठवीजे अंतःकरणी । नेत्रपातीं लवतांक्षणीं । श्रीरघुनाथ मनीं स्मरावा ॥१२॥ श्रीराम आदिअवसानीं । मध्येंचि माया बुडवणी । सूज्ञ गेले भवपार तरुनी । मूर्ख मनीं नेघे हें ॥ १३ ॥ जननीच्या गर्भोदरीं । मूत्रनरकाच्या अधणाभीतरीं । अस्थिमांसाच्या दाथरीं । नउमासवरी उकाडिजे ॥ १४ ॥ तेथील व्यथा कवणा नेणें । नाहीं मायदाईचें पुसणें । संकटीं बापुडें हिंवसवाणें । सुटका नेणें गजबजिला ॥ १५ ॥ तें होतां दारुण व्यथा । मग आठविलें श्रीरघुनाथा । ह्मणे सोडवीं सोडवीं भगवंता । मागुती परता न ये ऐसियां ठायां ॥ १६ ॥ मज कळों आला भाव । तूंचि देवा आदिदेव । तूं चतुर अगम्य तुझी माव । मज स्वयमेव कळों आली ॥ १७ ॥ देवा येथोनि सोडविसी । तरी आठवीन चरणासी । न करीं अन्य उदिमासी । अष्टौ प्रहरासीं भजन तुझें ॥ १८ ॥ ऐसिया स्तुतिपाठयोगें । कृपाळुवें सोडविलें सानुरागें । जीव बाहेरी येतांचि कोहं जागें । सोहं प्रसंगें विसरला ॥ १९ ॥ तें सोहं मूळस्वरूप विसरोनी । जो तो मोहिला मायागुणीं । असा ऐसा भाव धरुनी ।

भगवंता लागुनी वचनभ्रष्ट जाले ॥ २० ॥ मी नव्हे या जना ऐसा । मज नाहीं पापधिंवसा । भक्तप्रतिपाळ श्रीरघुनाथकोंवसा । त्याचा दासानुदास जगीं मिरवेन ॥ २१ ॥ त्याची आवडीं कथा करीन । मुखें श्रीरामनामस्मरण । चरणीं तीर्थयात्रागमन । करीन पूजन श्रीगुरूचें ॥ २२ ॥ मज नलगे हें भूषण । अळंकार वस्त्र मळवटलेपन । मी सेवीन एकाकीं निर्जनवन । श्रीरघुनन्दन सेवावया ॥ २३ ॥ श्रीराम जाला वनवासी । मीही जाईन पंचवटीसीं । श्रीरामें मारिलें रावण-कुंभकर्णासीं । मी षड्रिपूसीं दंडीन ॥ २४ ॥ श्रीरामें ताटिका मारिली । आह्मां ममता मारणें भली । श्रीरामें तिहींलोकीं कीर्ती केली । आह्मां करणें आली धर्मसंस्थापना ॥ २५ ॥ यापरी नानाविध विचारतरंग । नारोबामनीं उठताती अनेग । इतरां नेणवेचि गुह्यांतरंग । गंगाधर सांग जाणतसे ॥ २६ ॥ वृद्ध-ह्मणती करवावें वरपूजन । वरमाय करवल्या पाचारा निवडून । न करावें वेळ वेवधान । सत्वर जाणें वरपूजनीं ॥ २७ ॥ वाजं-त्री वाजवा रे ह्मणती । हवाया भुईनळे उडविती । वारू चहूं पायांवरी नाचविंती । भाट गर्जती यशकीर्ती ॥ २८ ॥ गजरें भीम मंदिरीं आले । गौरवें वरपूजन केलें । वरा वधुमंडपा स्पर्शविलें । भोजन करविलें दुधभात ॥ २९ ॥ प्राप्त जाली लग्नघटिका । वधुमंडप शोभविला नेटका । आरंभ जाला मंगळ आष्टकां । बधुवरांसी नेटका अंतर्पाट धरियला ॥ ३० ॥ सभा बैसली घनदाट । कीर्ती गर्जताती भाट । मंगळआष्टकें गर्जती उद्भट । ते नारोबा स्पष्ट श्रवण करी ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ आरंभीं वदती महागणपती हे शारदे सुंदरी ।
वाणीशूभ वदे सुवेळ विलसे तूं मंगळे माधुरी ।
रामा जानकि माळ घेउनि करीं ऊभी असे सुंदरी ।
तों ते सादर वैखरी शुभ वदे सीतावरं मंगळम् ॥ १ ॥

टीकाः—येवंविध मंगळाष्टकें । द्विज गर्जती अनेकें । साव-धान सावधान ह्मणती कौतुकें । तेणें नारोबा अत्यंतिक साव-धान जाला ॥ ३२ ॥ सावधान सावधान । भिक्षुक बोलती गर्जगर्जून । नारोबा ह्मणे मी असतां सावधान । वृथा शिकवण हे काइसी ॥ ३३ ॥ जननीचा बोल राखिला । हा अंतरपाट फेडिला । मी जालों चहूं देहा मोकळा । विवाहसोहळा मज काइसा ॥ ३४ ॥ द्विज हो तुह्मीं ह्मणतां सावधान । तोंचि मीं जालों सावधान । सुखें सेवीन श्रीरघुनन्दन । विवाहबंधन ( देह ) मजकाइसें ॥ ३५ ॥ ऐसा आवेशें गर्जोन । नारोबा उसळला अतिसत्राण । नावेरेचि कवणा अणुप्रमाण । घेतलें रान क्षणार्धें ॥ ३६ ॥ मंडप गजबजिला एकसरा । पळाला पळाला ह्मणती नोवरा । जो तो धरूं धांवला सत्वरा । त्यासीं पाठलाग पुरा न घडला ॥ ३७ ॥ एकचि हलकल्लोळ जाला । नारोबा हातोहातीं पळाला । सावधान अक्षरीं स्वरूपीं जागला । मुक्त जाला मायेंतुनी ॥ ३८ ॥ पूर्वी नाहीं आइकिलें । रामकृष्णादि अवतार जाले । कलीमाजीं अघटीत घडलें । देवऋषी शंकले चरित्र देखुनी ॥३९॥ हें न भूतो न भविष्यती जालें। नारायणें अतर्क्य केलें। विधीइंद्रादि थकीत ठेले । मनीं दचकले सदाशिव ॥४०॥ ते माया मोहिनी । शंकरा भुलवी मोहुनी । नारदी जाले नारद मुनी । असंख्य पुत्रांलागुनी प्रसवले ॥४१॥ ब्रह्मा सृष्टीकर्ता भला । तो स्वकन्येसीं रत जाला । मूळ स्वरुप विसरला । पतन पावला मोहुनी ॥ ४२ ॥ तो चंद्रमा भुलोनी सेऊं गेला गुरूपत्नी । कलंक जडला न निघे अझुनी । अधःपतनीं पडि_यला ॥ ४३ ॥ अमरेंद्राचें काय सांगूं । गेला सती अहिल्या भोगूं । जाला स्वशरीरभंगू । तो प्रसंगू अति दारुण ॥ ४४ ॥ विश्वामित्र सकळीं आइकिला । त्यासीं भदेरा उर्वशीनें लाविला। समूळ पुण्यठेवा लुटिला । शेखीं नागाविला लौकिकीं ॥ ४५ ॥

यापरी थोरथोर । पतन पावले यतीश्वर । एक निवाडिला शुक शुनिवर । ब्रह्मचर्य प्रखरतम जयाचें ॥४६॥ त्या श्रीशुकमुनींद्रा ऐसें । व्रत पाळिलें श्रीरामदासें । कलियुगामाजीं विशेषें । पुण्य-पुरुषीं श्रीरामदास स्तवियला ॥ ४७ ॥ असो नोवरा पळाला । हाचि सर्वतोमुखीं शब्द उठला । जननीचित्तीं उभड भरला । देह टाकिला धरणीये ॥ ४८ ॥ माय गडबडां लोळे । अश्रुपूरें वाहती डोळे । हृदय अत्यंत तळमळा । माझ्या कपाळा हें काय आलें ॥४९॥ माझा जीव कीं प्राण । कोणी दाखवा रे नारायण । ऐसी अत्यंत अक्रोशें हांक फोडोन । ज्यात्या लागोन पुसतसे ॥ ५० ॥ अरे कोणी धांवा धांवा । माझा नारायण आणावा । सर्वेचि वदे काय करूं रे देवा । काय हें दैवा ओढवलें ॥ ५१ ॥ लोळे गडबडां धरणी । सांवरूं धांवतीं चार सहा-जणी । सर्वेचि देहभान विसरुनी । मूर्छापणीं बुडाली ॥ ५२ ॥ क्षणींच सावध होउनी ह्मणे । कोणीकडे गमन केलें नारायणें । माझें मज भेटवा हो तान्हें । अत्यंत पेखणें तेणेंसि मज ॥ ५३ ॥ त्यासी म्यां नाहीं नहाणिलें । नाहीं पोटभरीं जेवविलें । त्यासी पुरतें नाहीं न्याहाळिलें । नाहीं खेळविलें कवतुकेंसी ॥ ५४ ॥ कवण्या पापिणीची दृष्ट लागली । कां लेंकुरासीं झड-पणी आली । मज अभागिणीची संपत्ती गेली । हानी जाली काय करूं ॥ ५५ ॥ नवस नाहीं चुकलें । देवें कां पा विरुद्ध केलें । ऐसें ह्मणतां हृदय पिटिलें । भूमी आपटिलें कपाळा ॥ ५६ ॥ देवा किती अंत पाहसी । भेटवी मज माझ्या तान्हु-ल्यासीं । मज नलगे त्या विवाहसौख्यासीं । ह्मणौनि उकसा-बुकसीं स्फुंदत ॥ ५७ ॥ सर्वेचि उठोनि धांवली सैरा । बाहेरी आली वोलांडूनि पुरा । ज्यात्या पुसे लेंकुरा । नारोबाचा पुरा शोध सांगा ॥ ५८ ॥ तुह्मीं नारोबाचे सवंगडे । तुह्मांस वाटीन साखरपेढे । धांवा धांवा धडफुडे । नारोबा मजपुढें आणावा

॥ ५९ ॥ यापरी राणाऊ वारंवार । विलपतसे करुणोत्तर । तेथ ह्मणीं येऊनि गंगाधर । जननीचा कर धरोनि नेली ॥६०॥ तूं सूज्ञ चतुर माउली । आह्मां अनाथांची साउली । तुंवा शोक न करावा येकाळीं । चित्त अळुमाळ शांत कीजे ॥६१॥ श्रीरघुनाथ वना गेला । उदंड वैभवें अयोध्ये प्रवेशला । नारोबा येणें काळेंसी पळोनि गेला । येईल वहिला यश कीर्ति भाग्यें ॥ ६२ ॥ ईश्वरीं सूत्र जैसें । संसारीं रहाटिजे तैसें । नारोबा उदंड वैभवसंपन्नदशे । अल्पावकाशें येईल भेटी ॥ ६३ ॥ संप्रती अधर्म बहू जाला । लोक अत्यंत जाजावला । श्रीराघवें नारोबा प्रेरिला । देखाल डोळां कवतूक तुह्मी ॥ ६४ ॥ आतां त्वरीत येथोनी । जाऊं निजनगरा लागुनी । सर्वकाळ श्रीरामभजनीं । अनुदिनींकाळ सारूं ॥ ६५ ॥ तो श्रीदाशरथी । नारोबासी रक्षील निश्चिती ।तुह्मीं कांहीं न आणावें चित्तीं । सुफळित होतील वासना ॥ ६६ ॥ हा बोल सत्य जाणा । शिवतों तुमच्या चरणा । भय नाहीं नारायणा । होईल शहाणा गुणवंत ॥ ६७ ॥ यापरी विनवोनी गंगाधरें नेली जननी । येवोनि राहिले जांबभुवनीं । अनुदिनीं श्रीरामचिंतन ॥ ६८ ॥ येरीकडे नारायणें । मंडपांतूनि केलें पलायन । जांबेनिकट वटवृक्षीं वळंघोन । त्रिरात्र अनशन निजसमाधि वसती ॥ ६९ ॥ त्रिरात्र समाधिकाळ क्रमिला । मग पंचवटीमार्ग धरिला । गोदेतटीं रहिवास नेमिला । नेम नेमिला द्वादश वरुषें ॥ ७० ॥ यापरी स्वानंदभरें । नारोबा एकाकीं एकला विचरे । श्रीरामनामस्मरण करी गजरें । काळा भेदरें मानसीं ॥ ७१ ॥ श्रीरामनामाचा गजर । नारोबा करी आष्टौ-प्रहर । विश्रांति नेघेचि पळभर । चालिला गजर श्रीरामनामीं ॥ ७२ ॥ यापरी श्रीरामनामचिंतन । करितां नारोबा विसरला देहभान । नाठवे देहीं भूकतहान । दिवसनिशी वोळखण विस-रला ॥ ७३ ॥ नारोबा करील पंचवटीं गमन । तें पुढील प्रसं-

गीचें निरूपण । स्वानंदसाम्राज्य जीवन । साधक सज्जन परिसोत ॥ ७४ ॥ मज नसतां अधिकार । श्रीरामदासें करविला ग्रंथाविस्तार । मी तंव मतिमंद पामर । कनिष्ठ किंकर संतांचा ॥ ७५ ॥ मज तंव न कळे कांहीं । अत्यंत मूर्खता देहीं । श्री-रामदासें कांहीं । वचनें हीं बोलविलीं ॥ ७६ ॥ श्रीरामदास कथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत श्रीधरचरणीं । भिमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ७७ ॥ इति श्री रामदास-कथासारामृत । भिमूविरचित नारायणविवाहाख्यान निरूपणं नाम षष्ठम प्रसंग सम्पूर्ण ॥ ७ ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ७ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरुरामदासायनमः ॥



महद्भाग्याची परवडी । श्रीरामदासस्मरण होत घडी-घडी । परमानन्दीं मन देत बुडी । चवी गाढी न बोलवे ॥ १ ॥ सहज भाव उपजला । श्रीसमर्थप्रभू विलोकिला । माझा देहभाव हरपला । छंद लाग-ला निशिदिनीं ॥ २ ॥ श्रीरामदासेंविण । मज नगमे पळक्षण । जरी शोधिलें त्रिभुवन । श्रीरामदासेंविण शुन्य जालें ॥ ३ ॥ पदार्थमात्र दृश्यभूत । नाना कळा कुशळ भासत । आब्रह्मभुवनीं विचरत । तें तें समस्त श्रीरामदासशक्ती॥ ४ ॥ सूर्य उजळे । चंद्र मावळे । समुद्र खळाळे । हे केवळ श्रीसमर्थआज्ञा ॥ ५ ॥ विधी सृष्टी करूं बैसविला । सदाशिव संहारू नेमिला । आपण प्रतिपळिता भला । करुनी मोकळा कर्मातीत ॥ ६ ॥ श्रीसमर्थ

रामदाससेवा । आहे कवणाचिये दैवा । असेल जन्मांतरींचा पुण्यठेवा । तिहींच घ्यावा अनुभव हा ॥ ७ ॥ देशकाळवर्तमानें । वाढलीं बुद्धिवाद अनुमानें । नाना टवाळी कुतर्क दुणें । देखती उणें आपणाऐसें ॥ ८ ॥ नवल या जनांचें । ह्मणती श्रीसमर्थ अवतारी कैंचे । मी नाइके हें वचन ययांचें । अत्यंत काचें भक्तिभावा ॥ ९ ॥ भाविकीं तो पथचि टाकावा । संतसंग साक्षेपें धरावा । आपुला स्वानुभव वाढवावा । भगवंत वोळखावा दृढभक्तीं ॥ १० ॥ पूर्वीं थोर भक्त जाले । भक्ति-सामर्थ्यें गाजले । कीर्ति करूनि अमर जाले । शेखीं मिळाले भगवंतीं ॥ ११ ॥ तैसेचि वारकरी संप्रदाई । दुराग्रहो रूढला कांहीं । श्रीसमर्थीं भिन्नत्व पाही । तो परमार्थिकही शुद्ध न ह्मणों ॥१२॥ निवृत्तिप्रमुख श्रीज्ञानदेवें । भूतमात्रीं भगवंत भावावे । तेचि सांप्रदाईकीं श्रीसमर्थकाव्या वोळावें । वरी ह्मणवावें हरिभक्त ॥ १३ ॥ नसता संशय उभविती । श्रीसमर्थीं लोभ भाविती । हा हो जी धिग् धिग् ते वदंती । पतन पावती विपरीत बुद्धी ॥१४॥ श्रीसमर्थांचें प्रतापसामर्थ्य । निश्चयें जाणें श्रीरघुनाथ । श्रीरघुनाथआज्ञेचा संकेत । शिरसा पाळिती श्रीसमर्थप्रभू ॥ १५ ॥ जीवभूत जाजावला । तो कैवार श्रीसमर्थ रामदासें घेतला । प्रतापसामर्थ्यें श्रीरघुनाथ तुष्टला । श्रीराममय केला भूगोळ आघवा ॥ १६ ॥ श्रीसमर्थरामदासचरित्र गुह्य । हें गुह्य गुह्या-तीत परम गुह्य । तें कवणा वैखरीं बोलों ये । ब्रह्मादिकां नये बोलतां वाचे ॥ १७ ॥ अगम्य अतर्क्य नाना नाटकी । श्रीरा-मदास नकळे लौकिकीं । नेति नेति वचन वेदादिकीं । श्रुती घोकी याचि परी ॥ १८ ॥ संतपुरुषीं श्रीरामदास पुजिला । श्रीसंतपुरुषीं श्रीरामदास गौरविला । श्रीसंतपुरुषीं स्तवियला । हृदईं धरियला सर्वकाळ ॥ १९ ॥ संतपुरुषीं श्रीरामदासीं सख्य । श्रीसंतपुरुषीं श्रीरामदासीं समाधान निष्कंटक । संतपुरुषीं

श्रीरामदासीं समाधान एक । द्वैताचा कलंक वोखदासि नाहीं ॥ २० ॥ महद्भाग्याची थोरी । श्रीसमर्थ आले हृदयमंदिरीं । तें सुख न बोलवे वैखरीं । रिता अणुभरी नुरवी च ठाव ॥ २१ ॥ संसार सुखमय जाला । श्रीरामदास जिवलग भेटला । इतरां सुलभ असोनि दुर्लभ जाला । त्यांचिया बोला मी नेघे ॥२२॥ आइका पूर्वानुसंधान । लग्नमंडपींहूनि पळाला नारायण । जांबे-निकट वटवृक्षीं वळंघोन । त्रिरात्र अनशन निजसमाधि वसती ॥ २३ ॥ वयोमर्यादा केतुली । केवळ द्वादश वरुषें नेमें बोलिली । अल्पकाळेंचि वैराग्यता वरिली । तपा आगळी पुरुषार्थ सिद्धी ॥ २४ ॥ कृतत्रेतद्वापारीं । भक्त विख्यात जाले भारी । ते ते युगमान सहज सत्वधारी । कलीची भरोवरी तैसी नव्हे ॥ २५ ॥ कली पापाचा वोतिला । कली विषयाचा आथिला । कली दुःख दाहो भरिला । कलीनें केला अनर्थ बहू ॥२६॥ यया कलीचें महिमान । नेणती थोरथोर सज्ञान । जो तो अधर्मरती निपूण । पापपुण्य वोळखण विसरले ॥ २७ ॥ कलीमाजीं स्त्रीपुरुष मेळा । पापरतीं निखिळ खिळिला । शुद्ध-भाव उठोनि पळाला । कलिचा केला प्रताप ऐसा ॥ २८ ॥ पुरुषांची पापवासना । स्त्रिया रूढल्या परद्वारपतना । स्वप्नीं नाठवे दोष मना । कलीची नाना विटंबना हे ॥ २९ ॥ यया कलीचें महिमान । असत्यवादी मिनले जन । अधर्मरतीं प्रोत्सा-हन । निःशंक हेळण संतपुरुषीं करिती ॥ ३० ॥ यया कलीचें बळ । लोक झकाविले सकळ । धर्म केलासे निर्मूळ । प्रळयकाळ कलीचेनि धर्में ॥ ३१ ॥ यया कलीचा बडिवार । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडूं लागले द्विजवर । अनाचार प्रवर्तला ॥३२॥ यापरी यथार्थाचे अनर्थ । बुडों टेकला परमार्थ । हा कलि-युगाचा पुरुषार्थ हाहाभूत मेदिनी ॥ ३३ ॥ शांतीक्षमादयामाया । नाहीं सद्भावसत्क्रिया । ठाव नाहीं बोलावया । सत्व धैर्य

गुण गेले ॥ ३४ ॥ कैंचा वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म । मुखीं ह्मणावया रामराम । अत्यंत श्रम वाटती ॥ ३५ ॥ पाप थोरावलें उचंबळ । उत्तमाचि न ह्मणती चांडाळ । अभक्ष भक्षितां विटाळ । कदाकाळीं न ह्मणती॥३६॥ पुण्यकर्मा न दे कवडी । पापकर्मी वेंची कोडी । अतीत अभ्यागतां दवडी । बुद्धि कुडी कलिप्रतापें ॥ ३७ ॥ अधर्म तोचि धर्म जाला । धर्म तोचि अधर्म नेमिला । यया कलीचा हा प्रताप सगळा । प्रळयकाळ कलिचेनि धर्में ॥ ३८ ॥ नाहीं मर्यादेचें भाषण । नाहीं श्रद्धा हरिभक्तिनिरूपण । नावडे देवालया गमन । नाहीं भजन श्रद्धायुक्त ॥ ३९ ॥ नाहीं विश्वास नाहीं भाव । नाहीं सत्संग नाठवे देव । नाहीं परमार्थासीं वाव । कलि स्वयमेव प्रतापगाजी ॥ ४० ॥ उत्तमवर्ण ब्राह्मण । जाहले मद्यपी निपूण । करिती श्रृंगारकळा नर्तन । ऐकती गायन वेश्येचें ॥ ४१ ॥ स्वगृहीं सांडोनि उत्तम कांता । एक रातले वारांगना देखतां । वित्त शरीर समूळ भंगतां । तरी ही चित्ता विराग नोहे ॥ ४२ ॥ कुळवंत स्त्रिया श्रृंघार करिती । वारांगने ऐशाचि सजती । सौभाग्य मंगळ हेळासिती । ताठा चालती उपराउपरी ॥ ४३ ॥ सून सासवे न गणी । पुत्र पित्या अवमानी । वडील मर्यादा न राखे कोण्ही । कलीची करणी हे ऐसी ॥४४॥ कलीची अनर्थ थोरी । विश्वास नुरला परस्परीं । मृत्यपीडा घरोघरीं । सुख तिळभरी नसेचि कोण्हा ॥ ४५ ॥ यया कलीचें माहिमान । सांगों जातां असाधारण । कलियुगीं भगवद्भजन । अत्यंत कठिण जग बोले ॥ ४६ ॥ न करवे भजन न करवे तप । न कळे सत्कर्म सत्क्रिया साटोप । न कळे सद्वृत्ति सद्वासना आपेआप । संतप्रदीप यालागीं येती ॥ ४७ ॥ अत्यंत कळवळोन । संत धांवती वैकुंठीहून । निजांगें सन्मार्ग आचरून । हातीं धरोन जग उद्धारिती ॥४८॥ ते नित्य-

मुक्त परी जनांकारणें । करूनि दाविती तपपुरश्चरणें । भजन उपासना हरिजागरणें । गीताभागवत रामायणें पढविती ॥ ४९ ॥ कलीचें महिमान विचित्र । मी बोलिलों स्वल्प-मात्र । आतां अवधारा श्रीसमर्थचरित्र । परम पवित्र मंगळ-धाम ॥ ५० ॥ या कलियुगामाजीं । एक निवडला नारोबा गाजी । कामक्रोधलोभमोहसमाजीं । विरक्त सहजीं एकाकि जाला ॥ ५१ ॥ नारायणें ध्यान धरोनी । एक आठविला श्रीहनुमंत ध्यानीं । ह्मणे येइजे दयाळा त्वरा करुनी । नव्हे कोणी तुजविण मज ॥ ५२ ॥ जयजयाजी वायुतनया । जय-जयाजी लोकप्राणेश सुऱ्हदया । जयजयाजी वानरवेश प्रभुवर्या । धांव सदया कपिवर्या ॥ ५३ ॥ संकल्प विक-ल्प चित्तीं उठती । काम क्रोध लोभ धांवती । आशा मनीषा चित्तीं बैसती । नव्हे उसंत क्षणभरीं ॥ ५४ ॥ बहुविध सोइरे सज्जन । अलोट करिती प्रेमसंभाषण । परी न मिळे तेथ रघु-नंदन । तोचि दावी कपिवर्या ॥ ५५ ॥ तुमची यशकीर्ती ति-हीं लोकीं । अंतरात्मा श्रीरामाचा कीं । संकटसमईं जाऊनि लंकीं । मायसीता सोडविली तुह्मी ॥ ५६ ॥ लक्ष्मण पडतां धरणीवरी । तुह्मीच धांवलांत वानरकेसरी । क्षणीं आणोनि द्रोणागिरी । रणसंगरीं सौमित्र वांचविला ॥ ५७ ॥ अहीमही श्रीरामलक्ष्मण । नेतां पाताळीं धांवलां वायुनन्दना । थोर सा-मर्थ्य आणि गर्जना । श्रीरामलक्ष्मणा सोडविलें तुह्मीं ॥ ५८ ॥ ऐशा कां एकदोन वार्ता । किती आठवाव्या समर्था । धन्य जगज्जननीशोकहर्ता । भेटावें आतां निज तान्हयासी ॥ ५९ ॥ हीनदीन एकनिष्ठ किंकर । स्वामी कीजो जी अंगिकार । ठेविजे शिरीं पद्मकर । निर्भर होईन त्रिभुवनीं ॥ ६० ॥ नाहीं माता नाहीं पिता । कोणहीच नाहीं शोकहर्ता । ह्मणोनि चित्ता उभड

भरला ॥६१॥ तुमचा भरवंसा मुळीं पासोनी। हिंडों कां जनीं वि-
जनीं। तुह्मी आह्मचे चिंतामणी। चिंताहरणीं धांव घ्याजी ॥६२॥
मज ऐसा पतीत । कोणी न भेटेल त्रिजगतांत। मी बाळक
तुह्मी मायतात। घ्यावें पदरांत स्वामिराया ॥ ६३ ॥ जनीं
दिसती नानारंग। कोण कोणाचा धरिजे संग। कोण चित्सखा
अभंग। सांगा अंतरंग दयाळा ॥ ६४ ॥ आधीं दर्शन तुह्मी
दीजे। उपरी श्रीरामराया भेटवीजे। देहबंधनातें तोडविजे।
विनंती सहजें बाळमती ॥ ६५ ॥ दीनबंधू श्रीमारुती। धन्यधन्य
तुमची यशकीर्ती। माया अविद्या सन्मुख युवती। श्रीरघुपती
अंतरवी ॥ ६६ ॥ तिचा नघडो मजलागीं वारा। चांडाळीण
बुडवितसे मोहपुरा। श्रीरघुवीर दाता पूर्ण सोयरा। श्रीवायु-
कुमरा मज अंतरवी ॥ ६७ ॥ तुह्मी मजलागीं हातीं धरा।
आधीव्याधी पासूनि दूर करा। मग स्वस्त असा कीं दूर करा।
कीजे विचारा येईल तें ॥ ६८ ॥ एकवार धरिलिया हातीं।
थोरथोरांची होईल सम्मती। दारीं उभा मी दीन अतिथी।
एकनिष्ठ निश्चिती प्रेमभीक घाला ॥ ६९ ॥ तुह्मा ऐसा
दाता। मिळालिया काइसी संसार चिंता। सर्वभावें
चरणीं ठेविला माथा। कृपावंता कृपा करीं ॥ ७० ॥
श्रीहनुमंतमाय कुठें गेली। नेत्र शिणले पहात वाटुली। क्षुधा-
तृष्णा मज लागली। पाजी दयाळें प्रेमपान्हा ॥ ७१ ॥ कंठ
शोषला आळवितां। कुठें गेली वो दीनमाता। चिंता तुजला
दूर जातां। कैसी नाहीं आली वो ॥ ७२ ॥ कामक्रोध तस्क-
रांच्या मेळीं। विवेक पैका गेला काया शिणली। परमार्थाची
वाट धरिली। दावा वाटुली श्रीहनुमंतस्वामी ॥ ७३ ॥ उठीं
येई माये श्रीहनुमंते। घेई तान्हया कडीवरते। कुरवाळुनियां
मुखकमळातें। करवीं स्तनपानातें दयाळें ॥ ७४ ॥ तंव श्रीह-
नुमंत माय कृपाळुभली। भाळीं सिंदुर मळवट ल्याली। भिमु

ह्मणें धाउनी आली । केली साउली नारायणा ॥ ७५ ॥ यापरी नारायण । करितां श्रीहनुमंत स्तवन । प्रगट जाले न लावितां क्षण । सांगीतली खूण अभय बरें ॥७६॥ श्रीहनुमंतें धरोनि नारायणहनुवटी । सांगती बापा जाई रे तूं पंचवटीं । न व्हावें कहीं दुःखकष्टी । श्रीरघुनाथ भेटी होईल तुज ॥ ७७ ॥ करीं गायत्रीं पुरश्चरण । आणि उदंड रामनामाचें गर्जन । येणें अल्पकाळेंचि श्रीरघुनंदन । तुजलागूनि भेटतील ॥ ७८ ॥ तुंवां न सांडावा धीर । चालवीं श्रीरामनामीं गजर । रामनामें गर्जावें अंबर । रामनामें निर्भर पुनीत होइजे ॥ ७९ ॥ श्रीरामनामें कोंदावें नभ । श्रीरामनाम स्वरूप स्वयंभ । नामासरसा फोडिला स्तंभ । दैत्य उभा श्रीनृहरें चिरियला ॥८०॥ श्रीराम खातां श्रीराम पितां । श्रीराम बोलतां श्रीराम निवांता । श्रीराम आठवी मार्गक्रमतां । श्रीराम स्मरतां शयन कीजे ॥ ८१ ॥ श्रीरामनामाचा महिमा । जाणती सदाशिव आणि उमा । धृव उपमन्यु अजामिळ जाणती महिमा । प्र्‍हाद गरिमा श्रीरामनामें ॥ ८२ ॥ एकवार उच्चारितां श्रीरामनाम । तेणें चळिकांपे यमधर्म । नामापाशीं पुरुषोत्तम मेघःशाम सर्वकाळ तिष्ठे ॥ ८३ ॥ श्रीरामनामीं कृतकल्याण । श्रीरामनामीं कैवल्य परिपूर्ण । श्रीरामनामीं सहजीं उद्धरण । पक्षी गृध्रादि जाण । नामेंचि उद्धरिले ॥ ८४ ॥ महापातकी वाल्ह्याकोळी । गर्जिन्नला श्रीरामनाम कल्लोळीं । क्षणीं पातकांची होवोनि होळी । ऋषिसम्मेळीं गुरुत्व पावला ॥ ८५ ॥ सतीअहिल्या घोर शाप पावली । शापें पाषाणशिळा जाली । तिसीं श्रीरामचरणधुळी स्पर्शली । नामें उद्धरिली तिहीं लोकीं ॥ ८६ ॥ श्रीरामनामाच्या कल्लोळीं । गणिका वैकुंठ चढली । श्रीरामनामाची प्रताप नव्हाळी । मर्कटें उद्धरिलीं पालेखाइरें ॥८७॥ श्रीरामनामाच्या प्रतापा भेणें । आह्मी मर्कटीं रावणा भेडसावणें । म्यां हनुम्यानें

समुद्र तरणें। श्रीरामनाममहिमानें सामर्थ्य पावलों ॥ ८८ ॥
आह्मीं लंकागडदुर्गामाझारीं। श्रीरामनाम गर्जिन्नलों भारी।
तेणें अंगीं प्रताप सामर्थ्य थोरी। केली बोहरी असुरांची ॥८९॥
आह्मां मर्कटां श्रीरामनाम आवडे। तेणें बळें चढिन्नलों लंका-
दुर्गकडे। मंगळमय चहुंकडे। विघ्न धडफुडें स्वप्नीं ही नेणों॥९०॥
आह्मा वानरांचें गुह्यवर्म। मुखें भुभुःकार गर्जावें श्रीरामनाम।
हेंचि आमुचें गुह्य गुह्यातीत परम। तुज संभ्रमें गुप्त सांगों
॥ ९१ ॥ तुंवा येथोनि निःशंकपणें। पंचवटी करावें गमन।
गोदेतटीं मांडावें पुरश्चरण। श्रीरघुनन्दन स्वयमेव भेटेल ॥९२॥
ऐसी अत्यंत हितगुजवार्ता। ऐकतां नारायणा हर्षरोमांचता।
सर्वेचि होय साष्टांगें नमिता। पुढती पुढती नमनाचि केलें ॥९३॥
तंव अंतर्धान पावले श्रीहनुमान। नारायणें केलें पंचवटीं गमन।
साष्टांगें श्रीरघुपतीसीं लोटांगण। आणि केलें वंदन गोदेतें॥९४॥
तें परमपवित्र गोदातीर। उगमीं वसती श्रीत्र्यंबकेश्वर। निकट
राहिले श्रीनिवृत्तिदातार। सिद्ध थोर श्रीज्ञानराजबंधू ॥ ९५ ॥
धन्य धन्य पंचवटीक्षेत्र। धन्य तेथील सृष्टिशोभा विचित्र।
धन्यधन्य त्र्यंबकगिरिराज पवित्र। होती सुपात्र वसतीसीं
जातां ॥ ९६ ॥ धन्य पंचवटींतील पुष्पतरुवर। धन्य तेथील
पक्षियांचें संभार। श्रीरामनाम स्मरती निरंतर। सहजीं उ-
द्धार पंचवटी देखतां ॥ ९७ ॥ श्रीरामचंद्रें पंचवटीसीं वस्ती
केली बहुकाळेंसीं। तेणेंचि ते भूमी पवित्र अनायासीं। नाराय-
णासीं आनंद तेथें ॥ ९८ ॥ तें देखतां गोदेचें मनोहरतीर।
नारायणा आनंद अपार। गर्जत उठिला जय जय श्रीरघुवीर।
हाक दूर नभीं गेली ॥ ९९ ॥ विशेष लोक वसतीसीं न रा-
हतां। नारायणें निवाडिलें एकांतां। त्यासी संबोधिती टाकळी
आतां। तपःसिद्धता त्याठाईं ॥ १०० ॥ नारायणाचा उपक्रम।
सर्वकाळ गर्जावें श्रीरामनाम। हेंचि तप उत्तमोत्तम। धरिला

नेम दृढ रामनामीं ॥ १ ॥ नारायणाचें नामस्मरण । जातसे गगन भेदोन । जळचरें स्थळचरें सम्पूर्ण । नारायणेसीं रामनाम स्मरती ॥ २ ॥ नारायणाचें नामस्मरण । रामराम स्मरती वृक्षपाषाण । क्रिमी कीटकादि जाण । नारायणेसीं रामराम स्मरती ॥ ३ ॥ श्रीरामनाम स्मरतां । नाठवे भूकतान चित्ता । श्रीरामगुणीं नाचतां । स्वेद रोमांचित देहभाव विसरे ॥ ४ ॥ नारायण श्रीरामगुणसम्मेळीं । नाचत बोले बिरुदावळी । प्रेमाश्रुपूर लोटती नेत्रकमळीं । श्रीरामनामें धुळीं लोटांगणीं जातसे ॥ ५ ॥ नारायणाचें पुरश्चरण । कलियुगीं विशेष जाण । अत्यंत निर्धार दाविला आचरून । सिद्ध चाकाटून आश्चर्य मानिती ॥६॥ जगीं तोचि परमधर्म । जे बुद्धि भावी पुरुषोत्तम । न देखे द्वैतविषय । सर्वकाळ नेम रामकृष्णगोविंद ॥ ७ ॥ आवडे श्रीगुरू पुजावा । डोळां श्रीरामचि पहावा । नाना गुणीं परमेश्वरु गावा । लोटांगणीं जावें साधुसंतमेळीं ॥ ८ ॥ आपुलें जें जें ह्मणावें । तें तें भगवंतीं समर्पावें । हरिभक्त ह्मणविती जिवेंभावें । त्यांचिया जावें वसतीसीं ॥ ९ ॥ त्याची मनोभावें करितां पूजा । ते श्रीहरीसी पावें वोजा । त्यांचिया वंदितां चरणरजा । उद्धार सहजा तत्क्षणीं ॥ १० ॥ भगवंताचे नानागुण । आवडीं गावे करावें कीर्तन । अविश्रामता नामस्मरण । करितां श्रीचरण जोडती ॥ ११ ॥ सर्वांभूतीं भगवंत । येणें शुद्धभावें वर्तत । अत्यंत आदरें जगा वंदीत । तो बुद्धिवंत हें श्रीनारदवचन ॥ १२ ॥ जे कामक्रोधातें दमविती । मनोइंद्रियातें आकळिती । निष्कामभावें भगवंत भजती । त्यासीं गती भगवंत आदिअवसानीं ॥१३॥ तोचि भक्त देवां पढिये । त्यासीच भगवंत भेटों ये । तयाचें महिमान सांगों काये । तो निजांगें होये चतुर्भुज ॥ १४ ॥ तो भक्तु हरिकथा करी । तिये रंगीं नाचे श्रीहरी । त्यातें वंदूं येती श्रीत्रिपुरारी । तीर्थें निरंतरीं तयाची

आस करिती ॥ १५ ॥ भक्त भक्तिमदें देहभाव विसरे । येणें नेमें श्रीरामनामगजरें । कळिकाळामानसीं भेदरे । पाप नुरे वोखदेसीं ॥ १६ ॥ नवल यया भक्तांचें महिमान । नामें पुनीत करिती त्रिभुवन । देव आणिती आकळोन । सहजीं उद्धरण श्रीरामभक्तसंगें ॥ १७ ॥ श्रीरामनाम शुद्धतप । श्रीरामनाम शुद्धजप । श्रीरामनामें पुण्यप्रताप । अत्यंत साक्षेप श्रीरामनामीं कीजे ॥ १८ ॥ श्रीरामनामापरतें । तप नाहीं अनुसरतें । तेंचि नारायणें सावधानचित्तें । अत्यंत प्रतापें गाजविलें ॥ १९ ॥ भक्त बहुविध असती । उत्तम अल्पमात्र निवडती । जयाचिया दर्शनप्राप्ती । देवां खंती निरंतर ॥ २० ॥ हाचि देवाघरीं दुकाळ । भक्त न भेटती निर्मळ । जयांचिये वाणीं रामनामकल्लोळ । श्रद्धानिखीळ भगवंत भूतमात्रीं ॥ २१ ॥ तो भक्त गाये नाचे । अंगीं दर्दरीत उठती रोमांच । नेत्रीं पूर वाहती प्रेमाश्रूचे । ऱ्हदईं भगवंताचें ध्यान लागलें ॥२२॥ भगवंतें केली लीला । तो तेचि करूं लागला । येणें जग बोले झडपिला । निखीळ निवाडिला वेडिवेमाजीं ॥ २३ ॥ तो क्षणा हांसे क्षणा रडे । क्षणा शांत क्षणा ओरडे । क्षणा टाळिया वाजऊनि उडे । क्षणा पडे निचेष्टित ॥ २४ ॥ त्यासीं एका भगवंताविण । वोस जाहलें त्रिभुवन । कोण हांसे रडे कोण । हे वोळखण विसरला ॥ २५ ॥ ऐसिया अवस्थेप्रती । भक्तशिरोमणी प्रवेशती । त्यांची अज्ञानजन्यबुंथी । तत्काळ तुटती नवल कोण ॥ २६ ॥ जन्ममरण फेरा तुटे । भगवंत प्रत्यक्ष भेटे । देहबंधाचा पांग फिटे । अत्यंत वरिष्ट भक्तचूडामणी ॥ २७ ॥ नारायणाचें भजन । याचि अवस्थे मिनलें जाण । सिद्धी पावलें पुरश्चरण । देवगण पुष्पवृष्टी करिती ॥ २८ ॥ जाहलें षष्टम वर्षाचें पुरश्चरण । तोंचि प्रसन्नले श्रीरघुनन्दन । नारायणासन्निध प्रगटोन । मधुरा वचन बोलती

॥ २९ ॥ बापा धन्य तुझें तपाचरण । धन्य तुझें नामस्मरण । तुंवां अत्यंत अल्पवयीं आराधून । मी रघुनन्दन प्रसन्न केला ॥ ३० ॥ आतां आवरीं आपुल्या तपा । येथोनि तुज मी रघुनाथ सोपा । दिगंतीं वाढवीन तुझिया पुण्यप्रतापा । जगा सौख्य अमूप तुझेनि धर्मे ॥ ३१ ॥ यथोनि जावें कृष्णातटा- कासीं । राजशककर्ता आला जन्मासीं । तुंवा ह्मणीं व्हावें सहाय्य त्यासी । अनायासीं भूभार हरेल ॥ ३२ ॥ धर्म बुडाला ये काळीं । गोब्राह्मण अत्यंत तळमळी । तुवां विलंब न कीजे अळुमाळी । महीमंडळीं धर्मसंस्थापिजे ॥ ३३ ॥ तेथ पडेल जें जें उणें । तें तें ह्मणीं निवारीन मी रघुनन्दन । तुज पाठिराखा वायुनन्दन । दिधला आंदण सेवेसाठीं ॥ ३४ ॥ ऐसा अत्यंत कृपाळू श्रीरघुनन्दन । नारा- यणा सांगे कळवळोन । तंव नारायणाचें दृढ तपाचरण । ह्मणे नेम पूर्ण झाल्याविण न घडे स्वामी ॥ ३५ ॥ स्वामी तुह्मी आज्ञापितां । तैसेंचि मी आचरतां । कलीमाजीं होईल नवलकथा । नेम संकल्पितां सांडोनि जातील ॥ ३६ ॥ द्वादश वरुषांचा नेम । केला सिद्धि पावो उत्तम । उपरी चतुर्धामदर्शन संभ्रम । म्यां रघुत्तमा केला जी ॥ ३७ ॥ त्याही वरी जननीदर्शन । तिसीं भेटिगांठी आलिंगन । जेष्ठबंधूचरणसंवाहन । करीन अर्चन आदरेंसी ॥ ३८ ॥ इतुकें निर्विघ्न घडल्याउपरी । सुखें निघेन कृष्णातिरीं । यालागीं स्वामी कृपा करी । आग्रह न धरीं याविण दुजा ॥ ३९ ॥ इतुकें आइकोनि अयोध्याधीश । ह्मणती भला शोभसी आमुचा दास । तुज यापुढें ह्मणती रामदास समर्थ । संतांस सामर्थ्य तुझें ॥ ४० ॥ नारायणें तेच क्षणीं । लोटांगण घातिलें दृढ चरणीं । गडबडां लोळे धरणी । तंव श्रीरघुनाथ मनीं सुखावले ॥ ४१ ॥ श्रीरामें नारायण उच-

लोनि बाहीं । ह्मणती तुज या पुढें असमर्थ नाहीं । सकळ सामर्थ्य दिलें तुझ्याठाईं । देवदेवांही आगळें सामर्थ्य तुज ॥ ४२ ॥ नारायणा असीर्वाद दिधला । श्रीरामप्रभू अतंर्धान पावला । नारायणें उपक्रम चालविला । तपलीला परिसावी ॥ ४३ ॥ मधुकरीकारणें । रामदासा पंचवटी येणें । लोक भ्रमती पिसाटपणें । महिमा नेणें कवणासीं ॥ ४४ ॥ कटीं कौपीन मेखळा । शिरीं जटाजूट मोकळा । श्रीरामजयराम देत आरोळ्या । गोष्टी सगळ्या पिसाट करी ॥ ४५ ॥ श्रीरामदासांचें चिन्ह । कवणा नेणवे अणुप्रमाण । तयाचें तंव पिसाट वर्तणें । विरुद्ध भासणें सांसारियां ॥ ४६ ॥ तो आत्मारामीं तल्लीन । त्यासीं नाठवे वस्त्र प्रावर्ण । त्यासीं नेणवे भूकतहान । दिवसनिशी वोळखण तो विसरला ॥ ४७ ॥ पंचवटींत आल्या मधुकरी । त्यासी स्त्रिया देखोनि लुब्ध अंतरीं । लेंकुरांची पाठीं भीड भारी । श्रीरामदास डोळांभरी पुरतें न देखेचि कवणासी ॥ ४८ ॥ अंगकाठी ठाणमान । अत्यंत सुस्वरूप लावण्य । तेज पहातां रविशशी दिपोन । क्षणएक लाजोन लपों ह्मणती ॥ ४९ ॥ गौरवर्णकाया । धर्धरीत नासिक सरळ भंवया । अत्यंतसुकुमार काया । जो तो पहावया लोधोनि पडे ॥ ५० ॥ कंठावरी भली । शोभतसे त्रिवळी । वक्षस्थळ विशाळ भाळीं । शोभलें अवाळु भृकुटि । मध्यभागीं ॥ ५१ ॥ केशपाश कुरुळे । मस्तकीं सुटले मोकळे । इतस्ततः विखुरले । तेणें शोभला यतिराज ऐसा ॥ ५२ ॥ तपःसामर्थ्य शरीरीं । तेणेंचि कांति चढिन्नली भारी । विरुळा साधू महीवरी । लोक घरोघरीं बोलती ॥ ५३ ॥ न करीं कवणाशीं संभाषण । नाहीं कवणेसीं वोळखण । एका श्रीरामजयरामाविण । नव्हे भाषण निर्धारेशीं ॥ ५४ ॥ ऐसें चालतां तपाचरण । तंव टाकळींत वर्तलें नवलविंदान । एक सुपात्र ब्राह्मण । अकस्मात मरण पावला ॥५५॥

त्याकाळींच्या स्त्रिया । एकनिष्ठ पति सेवावया । धारिष्ठ अंगीं सहगमन करावया । पुनीत व्हावया स्त्रीदेहो ॥ ५६ ॥ पति ह्मणिजे जीव कीं प्राण । पति हेंचि निज सुखायतन । पति प्रत्यक्ष नारायण । अंतरीं परिपूर्ण हे भावना ॥ ५७ ॥ पती सेवेहून । वैकुंठ मानिती ठेंगणें । पतीआज्ञा प्रतिपाळण । प्राणांतीं जाण न चुकती ॥ ५८ ॥ एकनिष्ठ पतिसेवा । तियेचा धाक देवदेवां । ऐसिया पतिव्रतेचिया दैवा । कवण आणावें उपमेसीं ॥ ५९ ॥ असो ते काळीं टांकळी संनिध । दशपंचक ग्राम प्रसिद्ध । तेथील कुळकर्णी क्षयरोग असाध्य । होतां प्राणांत जाहला ॥ ६० ॥ तंव तयाच्या सुशीळ भार्येनें । आदरिलेंसें सहगमन । आली प्रेतयात्रा गंगातट ठाकोन । टांकळीहून निकट जे ॥ ६१ ॥ प्रेतयात्रा मिळाली । अत्यंत शोकें हळहळली । कोणी एक पर्णकुटी अवलोकिली । साध्वी धाडिली यतिदर्शनास ॥ ६२ ॥ जन बोले जासील सहगमनीं । तरी वंदूनि येई हा पवित्र मुनी । कांहीं कृपा करील कोदंडपाणी । यमपाशबंधनीं निर्मुक्त होसील ॥ ६३ ॥ जनवचन मानलें साध्वीसीं । नमन करूं आली यतिवरासी । नमनें पावली असीर्वचनासी । अष्टपुत्रा होसील सुभद्रे ॥ ६४ ॥ तंव ते साध्वी लाजिन्नली । स्वामी वरदोक्ति कीं पावली । येणें काळेंसी वृथा गमली । ह्मणोनि केलें पुनरपी नमन ॥ ६५ ॥ तंव तेथ मिळाले सकळ लोक । पाहती यती असीर्वाद कवतूक । श्रीरामदास खुणेनें पुसती एकेक । दुःखशोका कोण कारण ॥ ६६ ॥ जन सांगती स्वामी । इये साध्वीचा भर्ता गेला परंधामीं । हे सिद्ध निघाली सहगमनसंभ्रमीं । तो विधी आह्मी करूं आलों ॥ ६७ ॥ तंव बोलिले श्रीरामदास । आजि संकट आलें श्रीराघवास । इतुकें बोलोन सावकाश । सन्निध प्रेतास आणविलें ॥ ६८ ॥ निरखोनि प्रेत न्याहाळिलें । उपरी श्रीरघुवीरनाम गर्जिन्नले । प्रेतावरी

श्रीरघुनाथतीर्थ प्रक्षाळिलें । तत्काळ उठविलें मृतासीं ॥ ६९ ॥ थोर नवलाव जाला । लोकीं चमत्कार देखिला । कहीं नाहीं आइकिला । नाहीं पाहिला कवणें कहीं ॥ ७० ॥ मेलें मनुष्य उठविणें । हें सामर्थ्य नाहीं मनुष्यपणें । न भूतो न भविष्यती करणें । सामर्थ्य वाहणें समर्थपुरुषीं ॥ ७१ ॥ थोर लौकिक गाजला । जनीं सिद्धपुरुष वोळखिला । मागील बोल सार्थ जाला । जे श्रीज्ञानराजें उठविले सच्चिदानंदबाबा ॥ ७२ ॥ सकळीं श्रीरामदास पूजिला । सकळीं श्रीरामदास वंदिला । सकळीं श्रीरामदास गौरविला । आघवियांचा जाला जीव कीं प्राण ॥ ७३ ॥ तें मेलें प्रेत हडबडोनि उठिलें । अति आवेशें बोलों लागलें । ह्मणे मज यमपाशीं सोडविलें । यमधर्में वंदिलें याचि पुरुषा ॥ ७४ ॥ जंई आले यमपुरीं । तंई यमधर्म अत्यंत थरारी । पूजा केली अत्यंत गजरीं । मज सत्वरी बंधमुक्त केलें ॥ ७५ ॥ तोचि हा यती महापुरुष । मज सोडविता परेश । आतां याचीच धरिजे कांस । सांडूनि आस लौकिकाची ॥ ७६ ॥ तंव सकळीं घातलें लोटांगण । सकळीं केल्या प्रद-क्षिणा । वारंवार करिती स्तुती पठण । ह्मणती नाहीं वोळखण आजवरी स्वामी ॥ ७७ ॥ मागील अपराध क्षमाकरा । येथोनि आपण आह्मांसीं आसरा । षोडशोपचारें श्रीरघुवीरा । अत्यादरें पूजूं जी ॥ ७८ ॥ मग ते साध्वी पुढें होवोन । करी अनन्य-भावें वंदन । करी नानापरी स्तुतीस्तवन । ह्मणे धन्य धन्य चरण देखिले स्वामी ॥७९॥ तंव हांसोनि बोलिले श्रीरामदास । अष्टपुत्र असती तुह्मांस । आणीक दोघांचा संतोष । तुह्मां अयोध्याधीश देईल ॥ ८० ॥ आतां सुखें गृहीं संसार कीजे । होईल प्रथम पुत्र श्रीराघवा आर्पिजे । श्रीरघुनाथसेवा न विसं-बिजे । उद्धार सहजें येथोनि तुह्मा ॥ ८१ ॥ मग तो सकळ लोकमेळा । आला स्वनगराला । प्रेत उठविलें बोल पसरला ।

बोभाट जाला सिद्धपुरुष श्रीरामदास ॥ ८२ ॥ शके १५४५ सोत्तरीं । रुधिरोद्गार नाम संवत्सरीं । वैशाखमास शुद्ध दशमी माझारीं । गोदेतिरीं चरित्र जालें ॥ ८३ ॥ तीं उभयतां वोहरें । श्रीरामसेवें मिनलीं निर्धारें । नित्य श्रीरामदास पूजन वंदन आदरें । करिती श्रीरघुवीर स्मरणेंसीं ॥ ८४ ॥ पुढें लोटिला काळांतर । साध्वी राहिली गरोदर । पुत्र प्रसवली सुंदर । अत्यंत थोर भक्तराज ॥ ८५ ॥ थोर आनंद मानिला । श्रीसमर्थरामदासा आर्पिला । प्राप्तकाळीं व्रतबंध केला । सर्वकाळ विकिला श्रीरामदाससेवें ॥ ८६ ॥ तेचि पुढें श्रीउद्धवगोसावी । श्रीसमर्थसंप्रदाई थोर पदवी । त्यांची उपमा कवणासि द्यावी । थोर गोसावी श्रीउद्धवस्वामी ॥ ८७ ॥ उद्धवा पढविलें श्रीरामनाम । उद्धवा पढविलें अनुष्ठान धर्म । उद्धवा पढविला उपासनानेम । अत्यंत उत्तम श्रीउद्धवस्वामी ॥ ८८ ॥ श्रीसमर्थ रामदास संप्रदाय । आद्यप्रवर्तक श्रीउद्धवस्वामीच होय । तयांचें महिमान वर्णूं काय । जन्मतांचि प्राप्त होय श्रीसमर्थसेवा ॥ ८९ ॥ पुढें प्रसंगानुसार । येईल श्रीउद्धवस्वामीचें चरित्र । सांप्रत काय वर्तला प्रकार । श्रोतीं सादर अवधारिजे ॥ ९० ॥ श्रीसमर्थांचें पुरश्चरण । चालतां वारंवार भेटती श्रीहनुमान । तंव एकदां जालें नवलविंदान । सादरें करोन श्रोतीं अवधारिजे ॥ ९१ ॥ हनुमत सांगती श्रीरामदासा । तूं तरी भक्तिभाग्याचा धिंवसा । तुझेनिमुखें श्रीरामपरेशा । रामायणीं उल्हासा ऐकावें वाटतें ॥ ९२ ॥ संप्रती आहे उत्साव । पंचवटींत श्रीरामनवमी गौरव । तुझिया निरूपणशैलीचें वैभव । मी स्वयमेव श्रवण करूं इच्छी ॥ ९३ ॥ आधींच तूं श्रीरामभक्त । वरी अत्यंत विरक्त । त्या तुझेनि मुखें श्रीरामचरित्र । श्रवण करितां पवित्र श्रवण होती ॥ ९४ ॥ तंव अत्यंत विनीत भावें श्रीरामदास ह्मणती । स्वामी हे कोण वदंती । समर्थांपुढें मी अत्यंत अल्पमती । अत्यंत चित्तीं संकोच

स्वामी ॥ ९५ ॥ तंव आग्रहें वारिती श्रीहनुमंत । ह्मणती न आणावें आणीक चित्तांत । मी येतों बटुवेषांत । ह्मणतां पंचवटींत प्रविष्टले दोघे ॥ ९६ ॥ श्रीरामदास पुजारिया विनाविती । आजि रामायण आह्मी सांगूं ह्मणती । तंव तो चमत्कारला चित्तीं । ह्मणे नव्हे मिती भाग्यासीं आमुच्या ॥ ९७ ॥ तुह्मी स्वामी पुण्यमूर्ती । दर्शनें पुनीत केलें दीन रंकाप्रती । तुमचे मुखें श्रीरघुनाथकीर्ती । अती निगुती श्रवण करूं स्वामी ॥ ९८ ॥ मग गौरवें बैसविलें व्यासपीठीं । पुराण आरंभिलें सुंदर पाठीं । नानाप्रसंग चमत्कृती । श्रोते चित्तीं दंग होती ॥ ९९ ॥ वक्ता पाहिजे अनुभवाचा । तो अधिकार अंगीं साचा । न निघे अर्थबोध शब्द काचा । काया वाचामनेंसीं ॥ २०० ॥ यापरी नऊरात्र रामायण । श्रीसमर्थ सांगती अधिकारपूर्ण । श्रोतयां आनंद थोरावें उचंबळोन । जो तो गहिंवरोन लोटांगणीं येतसे ॥ १ ॥ ऐसा कथाप्रसंग चालतां । बटुश्रीसमर्थी प्रसंग निघाला अवचिता । श्रीहनुमंतें पुष्पवाटिके जातां । कण्हेरी वृक्षा आतौतें बैसले ॥ २ ॥ कण्हेरी वृक्षीं बैसोन । हनुमंतें सुमनें देखिलीं शुभ्रवर्ण । तंव तेथ बटू वदे हे कोण प्रमाण । सिंदुरवर्ण पुष्पें होतीं ॥ ३ ॥ श्रीभावार्थ रामायणीचें निरूपण । अश्वत्थ वृक्षीं बैसला हनुमान । श्रीसमर्थ ह्मणती उभय वृक्ष निकट प्रमाण । परी पुष्पवर्ण निर्धारेंसीं शुभ्रचि होता ॥ ४ ॥ ऐसा जाला प्रष्ण उपास्थित । तंव श्रोते ह्मणती हा बटु कां वितंडत । श्रीसमर्थ ह्मणती व्हावें स्वस्त चित्त । हा बटु अत्यंत जाणता ॥ ५ ॥ श्रीसमर्थ निरूपणीं पुष्पें शुभ्र । बटूचित्तीं राहिला भ्रम विषम । श्रीसमर्थें पुराण संपाविलें संभ्रमें । श्रीहनुमंतें लंकादुर्ग आक्रमिलें ॥ ६ ॥ तंव त्या पुष्पवाटिकेमाजीं । सहजें प्रविष्टले बिभीषणजी । अक-

स्मात न्याहाळिले हनुमंतजी । ह्मणती अहो जी स्वामी कैसेनि येणें ॥ ७ ॥ आह्मां कवणा न भेटतां । दिसतसां पुष्पवाटिकेंत अवचितां । कैसें येणें केलें समर्था । आह्मुचे चित्ता नवल जालें ॥ ८ ॥ तंव श्रीहनुमंत बोलिले वचन । जे मदांशें रामदासभक्त जाले निर्माण । त्यांचेनि मुखें श्रवण करितां रामायण । पुष्प-वर्ण शुभ्र आइकिला ॥ ९ ॥ तो निरसावया भ्रम । ह्मणोनि केला उपक्रम । भ्रम जाला निर्भ्रम । रामदास उत्तम साचची बोलिला ॥ १० ॥ लंकापती करोन श्रीहनुमंतपूजन । विनऊनि बोलिले वचन । जे त्या महानुभागाचें दरुशन । आह्मांलागून कैसेनि घडेल ॥ ११ ॥ तंव बोलिले श्रीहनुमान । रामदास करितील पृथ्वीपर्यटण । तेणें काळेंसीं तुह्मां दरुशन । निर्धारून होईल ॥ १२ ॥ सर्वेंचि आले पंचवटीं । सांगती पुष्पवाटिकें-तील गोष्टी । श्रीसमर्थ ह्मणती ऐकावें जगजेठी । पुष्पवाटींतील पुष्पवार्ता ॥ १३ ॥ आपण गढलंका दुर्गांतरीं । रावणक्रोधें हिंडलां भारी । अग्नी प्रदीप्त केला घरोघरीं । लंका सारी सिंदु-रवर्ण केली ॥ १४ ॥ तोचि भास पुष्पावरी । स्वामीनीं केला निर्धारीं । संप्रती निष्क्रोध अंतरीं । पुष्पें बरीं शुभ्रवर्ण भासलीं ॥ १५ ॥ यापरी नाना चरित्रें । श्रीसमर्थ करिती परमपवित्रें । श्रीरामचंद्र हालविती सूत्रें । श्रीहनुमंत सर्वां सर्वत्र निजविजया मूळ ॥१६॥ आलें पुरश्चरण समाप्तीं । श्रीरघुनाथ परिवारें प्रगटती । तंव श्रीसमर्थ त्यासीं सोल्हासें पूजिती । कौतुक देखती अमर-गण ॥ १७ ॥ पुरश्चरणाचा संकल्प । सिद्धी गेला निर्विघ्न निर्वि-कल्प । कृपाकटाक्षें बोळला अयोध्याभूप । हा पुण्यप्रताप श्रीसमर्थ भजनाचा ॥ १८ ॥ तेणें काळें श्रीरामदास । लोटांगणीं जाती श्रीराघवास। सुरसिद्ध करिती पुष्पवृष्टीस । अप्सरानर्तनास थैका-रती ॥ १९ ॥ ब्रह्मा सदाशिव अमरेश । वर्णिती श्रीरामदास-यश । शुक सनकादि आले पूजनास । पंचवटीस परमोत्साव

गाजला ॥ २० ॥ गंधर्वीं मांडिलें गायन । अप्सरीं मांडिलें नर्तन । वसिष्ठ विश्वामित्र देती असीर्वचन । वालिमकी गौरऊनि आलिंगिती ॥ २१ ॥ तेथ निवृत्तीप्रमुख श्रीज्ञानदेव । जनार्दन एकनाथ श्रीनामदेव । मुनी पुंडलीक आले स्वयमेव । पूजा गौरव विलोकिती ॥ २२ ॥ थोर उत्साव जाला । सुरसिद्धीं श्रीरामदास गौरविला । श्रीरामचंद्रें अंकीं बैसविला । दुंदुभी गर्जिन्नल्या नभमंडळीं ॥ २३ ॥ सकळी दिधलें असीर्वचन । ह्मणती तुझेनि धरा पुण्यपावन । तुझेनि कळियुगीं धर्मसंस्थापन । तूं वायुनन्दन मानवी तनू ॥ २४ ॥ तुझेनि श्रीरामउपासना । तूं निधाड कलिमलभंजना । तुझें तप आणितां मना । आह्मां अमरगणां नवल जालें ॥ २५ ॥ तेथ श्रीरामदासें सुरवरा पूजिलें । सर्वभावें लोटांगण घातिलें । असीर्वचनीं सकळ अंतर्धान पावले । श्रीसमर्थें आदरिलें पृथ्वीपर्यटन ॥ २६ ॥ उद्धवें सवें यावया घेतली अळी । तंव त्यासीं संबोखूनि दिधला हनुमंत[1] बळी । टाकळी आश्रमींच राहवोनि अळुमाळी । प्रयाण सुवेळीं आदरिलें ॥ २७ ॥ आतां येथोनि पृथ्वीप्रदक्षिणा । श्रीरामदास निघतील जाणा । नानाचरित्र ध्यानीं आणा । वैकुंठराणा अंकित जयांचा ॥ २८ ॥ साचची माझियेमनीं श्रीसमर्थ रामदास बैसले येउनी । हातीं धरोन चालविती लेखणी । नवल निशिदिनीं मज वाटतें ॥ २९ ॥ कोण पुण्याची परवडी । प्राप्त परात्पर जोडी । श्रीरामदाससखा कडोविकडीं । माझिये कुडीं प्रविष्टला ॥ ३० ॥ कैसेनि आवडलें देवा । कोण पुण्याचा ठेवा । जो मी प्राप्त जालों ह्या दैवा । सर्वस्वेसीं देहभावा विसराविलें ॥ ३१ ॥ माझी मती जाली वेडी । प्राप्त श्रीसमर्थचरित्र परवडी । वचनें प्रबंध होती तांतडी । ती

---

१ पंचवटीजवळ टाकळीस उपरिनिर्दिष्ट श्रीहनुमंताचें संस्थान प्रसिद्ध आहे. श्रीहनुमंताची मूर्ति दिव्य आहे. व्यवस्था उत्कृष्ट आहे. गादीवर ब्रह्मचारी पुरुष परंपरागत आहे.

घडीघडी मी लिहीतसें ॥ ३२ ॥ मज तंव न सुचे कांहीं । आणीक उद्दीम नावडे देहीं । देवें दैवें चरित्रलेखनप्रवाहीं । निःसंदेहीं आकळिले ॥ ३३ ॥ असो हें परिहारवचन । परिहारमिसें होईल अभिमान । तें सांडोनियां सावधान । श्रीरामदास पर्यटन विचारूं ॥ ३४ ॥ श्रीसमर्थ करितील पर्यटन । तें पुढील प्रसंगींचें निरूपण । श्रोतीं द्यावें जी अवधान । सावधान भिमू ह्मणे ॥ ३५ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भिमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ३६ ॥ इतिश्रीरामदासकथासारामृत भिमूविरचितं श्रीसमर्थतपाचरणं नाम सप्तम प्रसंग ॥

॥ सम्पूर्ण शुभं भवतु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ८ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



जगजीवन मेघश्याम । राजीवनयन आत्माराम । हृदईं आठऊं मंगळधाम । सकळ भ्रम निरास करी ॥ १ ॥ श्रीरामचंद्र चरण कमळें । हृदईं साठऊं सर्वकाळ । येणें मनोरथ पुरती तात्काळ । प्रतापशीळ श्रीरामचंद्रप्रभू ॥ २ ॥ श्रीरामचंद्र सगुण ध्यान । हृदयसम्पुटीं ठेविजे सांठऊन । येणें होइजे कृतकल्याण । सुख परिपूर्ण श्रीरामाचिंतनें ॥ ३ ॥ श्रीरामसेवा हातीं आली । तयाची अज्ञाननिशी सरली । यज्ञ दान तपें तयासींच घडली । पवित्र केली मेदिनी तेणें ॥ ४ ॥ श्रीराम-आदि अवसानीं । श्रीराम स्मरिजे निशिदिनीं । श्रीराम व्यापक जनीं विजनीं । सृष्टिप्रताप करणी श्रीरामरायाची ॥५॥ श्रीराम

विधिजनिता । लोकालोक निर्मिता । अनादि आदि अविश्रमता । प्रतिपाळिता जीवभूतां ॥ ६ ॥ तेणें ब्रह्मांड रचिलें । लोकालोक निर्मिलें । त्याचिया सत्तेविण पर्ण न हाले । लोकालोक ठेले अंकित जयाचे ॥ ७ ॥ श्रीराममंगळां सुमंगळ । श्रीराम भक्तांकित पुरवी लडिवाळ । श्रीराम भक्तप्रतिपाळ । निवे तळमळ श्रीरामचिंतनें ॥ ८ ॥ शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुशीतळ । तोचि श्रीराम असुरांतकाळ । उद्धार केवळ श्रीरघुराजसंगतीं ॥ ९ ॥ श्रीराम स्मरिला प्रऱ्हादबाळ । तेणें गुणें पिता कोपलासे प्रबळ । पर्वतपात लाविला अग्निज्वाळ । विष अळुमाळ सेवविलें ॥१०॥ हस्तिपायीं चिराडिलें । अग्निस्तंभा कवटाळविलें । नाना छळप्रकार आदरिले । एकही केलें चालेना ॥ ११ ॥ हांक देतां स्तंभ कडाडिला । भक्त प्रऱ्हाद संरक्षिला । दैत्य नखेंचि विदारिला । ब्रीद गाजलें भक्तकैवारी श्रीरामचंद्रप्रभू ॥ १२ ॥ तो पापी अजामेळ । पापरतीं खिळिला निखीळ । पुत्रमिसें उद्धार तत्काळ । नवल केवळ श्रीरामरायाचें ॥ १३ ॥ पुत्रनाम नारायण । अजामेळ स्मरे आपण । प्राणांत अवस्था प्राप्त होतां दारुण । अजामेळ गहिंवरोन नारायणा हांकारी ॥ १४ ॥ तेणें काळें यमधर्मराजदूत । जाले कम्पायमान भयाभीत । विष्णुदूतीं विमान आणिलें त्वरीत । उत्साव करीत वैकुंठीं नेला ॥ १५ ॥ गणिका शुद्ध पापमूर्ति । श्रीराम पढवी शुकामती । तेणें छंदें सहज त्रिजगतीं । उद्धरागती पावली ॥१६॥ भिक्षुपुत्र तो उपमन्यू । दुग्ध मिसें शरण्यू । त्यासीं दिधला क्षीरसागर आंदणू । उदार करणी श्रीरामरायाची ॥ १७ ॥ दशावतार लीला । हे केवळ श्रीरामचि नटला । भक्तां प्रतिपाळ दैत्यांतकाळ जाला । श्रीरामलीला उभयभागीं सुखकारी ॥ १८ ॥ दशकंठें विरोध मांडिला । बिभीषण शरणागत जाला । शेवीं दोहोंचाही उद्धार केला । विरुद्ध बोला रिगमू नाहीं ॥ १९ ॥ भलत्याही

परी । श्रीरामनाम पडो श्रवणांतरी । श्रीराम तयाचें पापताप संहारी । तो अधिकारी मोक्षाचा ॥ २० ॥ यालागीं श्रीरामनाम । दासीं स्मरिजे उत्तम । जगीं हाचि एक परम धर्म । सकळ नेमांही नेम श्रीरामनाम वाचे ॥ २१ ॥ श्रीरामनाम । स्मरतां निरसे दोष भ्रम । असंख्य तरले स्मरतां रामराम । पुढें ही भविष्यमान तरतील ॥ २२ ॥ आइका सप्तम प्रसंगींचा विचार । पृथ्वीपर्यटणीं श्रीरामदास निर्धार । करोनि निघाले सत्वर । श्रोतीं सादर अवधान दीजे ॥ २३ ॥ श्रीरामदास पथीं चालती । जडमूढामती उद्धरिती । श्रीरामउपासनीं विश्व मोहविती । पवित्र त्रिजगतीं श्रीरामदासभेटी ॥ २४ ॥ श्रीरामदासअंत न कळे कवणा । नेणती साधु रामदासखुणा । शहाणे विचारिती आणूनि मना । तरी ही ऊणखुणा न कळती ॥ २५ ॥ श्रीरामदास तीर्थ क्षेत्रा निघाले ( चालिले ) । श्रीप्रयागराज ठाकोनि आले । त्रिवेणीसंगमीं स्नान वंदन केलें । दर्शना आले श्रीविश्वेश्वराच्या ॥ २६ ॥ ते काळीं विद्वांस ब्राह्मण । मंदिरीं करूं बैसले अनुष्टान । कोणी क्षुद्रयाती ह्मणोन । श्रीसमर्था आंत न यावें ह्मणती ॥ २७ ॥ श्रीसमर्थें द्विजशब्द राखिला । श्रीविश्वनाथा दुरूनि प्राणिपात केला । दूरस्थळीं रहिवास नेमिला । तंव मंदिरीं वर्तला नवलाव भारी ॥ २८ ॥ अनुष्टानीं द्विजवर । त्यांसीं दृष्टीं नाढळेचि श्रीविश्वेश्वर । सकळ जाले भयाभीत थोर । करिती विचार कोण पुण्यपुरुष अवमानिला ॥ २९ ॥ आला होता जटाधारी । आपण अव्हेरिला दुरी । नेणों अधिकार सामर्थ्य भारी । तेणेंचि श्रीविश्वेश्वरा वश केलें ॥ ३० ॥ तंव सकळही द्विजवर धाविन्नले । श्रीसमर्थचरण दृढ धरिले । अत्यंत आदरें मंदिरीं आणिलें । तत्काळ प्रगटले श्रीविश्वेश्वर ॥ ३१ ॥ थोर ख्याती जाली । श्रीसमर्थमहंती प्रग-

टली । समूळ काशीपुर दर्शना धांवली । जगदुद्धार मांडती श्रीसमर्थ रामदास ॥ ३२ ॥ जन बोलती महंत देखिला ना ऐकिला । श्रीविश्वनाथेंचि पाठविला । आह्मां सकळांचा उद्धार केला । श्रीविश्वनाथ दाविला साक्षित्वें ॥३३॥ सकळीं श्रीरामदास पूजिला । सकळीं श्रीरामदास गौरविला । सकळीं श्रीरामदास स्तवियला । आघवियांचा जाला जीव कीं प्राण ॥३४॥ श्रीहनुमंत घाटावरी । केवळ नाममात्र उरली उरी । तेथ श्रीहनुमंतरायाची साजिरी । मूर्ति बरी संस्थापिली ॥३५॥ मग आदरिलें प्रयाण । ठाकोनि आले अयोध्याभुवन । घातिलें श्रीरघुपतीसीं लोटांगण । साष्टांगें वंदन श्रीहनुमंतजीसीं ॥ ३६ ॥ अवलोकितां अयोध्यापुरी । श्रीसमर्थां आनंद लहरी । ह्मणती माझ्या स्वामीची हे नगरी । डोळांभरी देखिली आजी ॥ ३७ ॥ येथ श्रीरामचंद्रप्रभू अवतरला । येथ श्रीरामचंद्रप्रभू क्रीडला । येथेंचि दशरथ भूपाळ शोभला । श्रीवसिष्ठें केला रहिवास येथें ॥ ३८॥ श्रीदशरथ पुण्यशीळ । तो येथील भूपाळ । ज्यासी अनुकूळ ऐश्वर्य सकळ । श्रीरघुकुळटिळक लेंकरू ज्यासी ॥ ३९ ॥ दशरथें पुत्रकामेष्टीयज्ञ केला । तो श्रृंगऋशीश्वरें सकळ सिद्धी नेला । येथोनि पिंड घारीनें झडपिला । तोचि वहिला श्रीहनुमंतस्वामी ॥ ४० ॥ श्रीरामप्रभूचें हें निवासस्थान । येथें आले होते अमरगण । सकळ सुरसिद्ध मिळोन । श्रीरघुनन्दन येथेंचि पूजिला ॥ ४१ ॥ यापरी नानाविध तरंग । श्रीसमर्थां उठताती अंतरंग । आनंदलहरी उचंबळती अनेग । सर्वभावें सांग श्रीरामचंद्र पूजिला ॥ ४२ ॥ श्रीसमर्थें आयोध्येंत बहुकाळ क्रमिलें । अयोध्यामहात्म्य श्रवण केलें । उपरी प्रयाण आदरिलें । ठाकोनि आले मथुरा गोकुळ वृंदावनीं ॥ ४३ ॥ डोळाभरीं मथुरा पाहिली । माडिया गोपुरीं सुवर्णकळसीं शोभली । यमुना

मंदगामिनी न्याहाळिली। शोभा शोभली अतिरम्य शोभा ॥ ४४ ॥ यमुनेंत स्नानवंदन केलें। श्रीकृष्णजीसीं साष्टांगें वंदिलें। उपरी वृंदावन विलोकिलें। चरित्र स्मरलें श्रीकृष्णजीचे ॥ ४५ ॥ गोप गोपांगना। धेनु वत्स वेष्टीत जाणा। क्रीडला येथें यश्वदेचा कान्हा। श्रीसमर्थ मनीं स्मरण करिती ॥ ४६ ॥ अघबकादि मर्दिले। पूतनेसी स्तनपानींच शोषिलें। विघ्न तें तें निर्विघ्न जालें। श्रीकृष्णें लीलें नवल केलें ॥ ४७ ॥ कंसें बहु धाक लाविला। श्रीकृष्णें तितुकाही तृणावारीं नेला। दुष्ट दमोनि भूभार उतरिला। त्रिभुवनीं रोंविला कीर्तिध्वज ॥४८॥ श्रीकृष्णप्रभूची लीला। अगम्य अतर्क्य सकळांला। राधिकेचा उद्धार केला। गोपाळकाला यमुनेतिरीं ॥ ४९ ॥ कर्मठ द्विजवरांसी। प्रीति नाहीं श्रीकृष्णासी। कर्मकांडीं गोंउनी त्यांसीं। आबाळ साबाळ भक्तांसीं श्रीकृष्ण उद्धरी ॥ ५० ॥ तेथूनि श्रीरामदास। मग आले गोकुळास। वंदिलें त्या पुण्य-भूमीस। जेथें बंदिवास श्रीकृष्णबळिभद्रां ॥ ५१ ॥ जेथोनि गाई गोधनें। घेवोनि वना जाइजे श्रीकृष्णें। मुरली पोवा वाजविणें। खेळ खेळणें गोपमेळीं ॥ ५२ ॥ ते बळीभद्र श्रीकृष्ण। गोकुळींचे जीव कीं प्राण। यश्वदा माता करवी दहीं-भात भोजन। आणि निंबलोण उतरवी नित्य ॥ ५३ ॥ येथोनि अक्रुरें नेला। श्रीकृष्णबळिभद्र मथुरेला। गोपींनीं देहधरणी टाकिला। शोक मांडिला अनिवार ॥ ५४ ॥ श्री-देवदेवें देवकार्या लागीं। अक्रुराकरवीं रथ पेलिला लगबगीं। कंस मर्दिला एकांगीं। कीर्ति त्रिजगीं श्रीकृष्णजीची ॥ ५५ ॥ यापरी वेळोवेळां। श्रीसमर्थ आठविती गोकुळाला। उपरी मार्ग क्रमिला। चित्रकूट देखिला पवित्रगिरी ॥५६॥ उपरी द्वारावतीसीं आले। क्षेत्रराजा साष्टांगेसीं वंदिलें। श्रीकृष्णलीलाचरित्रीं रंगले। तीर्थविधी केले यथाविधी ॥ ५७ ॥ प्रभासापिंडार्क

क्षेत्र । श्रीरामदासें विलोकिलें सुपात्र । द्वारावतींत संस्थापिले श्रीरामचंद्र । तेथें अभंग पवित्र गाइला ॥ ५८ ॥

अंतरीं गुरुवचन । बाह्य नापीत वपन ॥ १ ॥
अंतर्बाह्य शुद्ध जालों । रामदर्शनें निवालों ॥ २ ॥
मन मुंडिल्या उन्मन जालें । शिर मुंडिल्या काय गेलें ॥ ३ ॥
रामदासें तीर्थविधी केला । रामीं पिंड समर्पिला ॥ ४ ॥

प्रभास क्षेत्रीं मठ संस्थापिला । शिष्यसमुदाय थोर वाढला । तेथूनि आले श्रीनगराला । श्रीनानकपंथीं भेटले भक्त बहू ॥ ५९ ॥ श्रीनानकपंथीं समुदाव भारी । श्रीसमर्था पूजूं धांवले सत्वरी । नाना निरूपण वाक्य थोरी । सकळां अंतरीं समाधान जालें ॥ ६० ॥ श्रीसमर्थदर्शनें प्रेम दुणावलें । कितीएकीं अनुग्रह मागीतले । श्रीरामदासीं श्रीनानकीं भिन्नत्व नाहीं ह्मणतिलें । विख्यात जाले श्रीनानकप्रभू ॥ ६१ ॥ तयांचा मी अंकीत । तुह्मी सकळ तयांचे निष्ठावंत । अन्यथा न करावा विचार संकेत । उपासनापंथ थोर श्रीनानकस्वामी ॥ ६२ ॥ यापरी प्रीति संभाषणें । नाना उद्गार करुणा वचनें । निववि‍लीं तयांचीं अंतःकरणें । उपरी आदरिलें गमन हिमालयीं ॥ ६३ ॥ श्रीबद्रिकेदार बद्रिनारायण । श्रीसमर्थकालीं मार्ग अत्यंत कठीण । संप्रती सुखमय साधारण । विश्वजन पाहोनि येती ॥ ६४ ॥ श्रीसमर्थकाळीं हिमालययात्रा । अत्यंत कठिण सकळ गात्रा । विरुळिया घडे सुपात्रा । परम पवित्रा भाग्यवंता ॥ ६५ ॥ प्रथम हरिद्वार देखिलें । श्रीगंगास्नानवंदन केलें । निकट हिमालया न्याहाळिलें । कौतुक जाहलें सृष्टिसौंदर्य देखोनी ॥ ६६ ॥ तेथोनि गंगोत्रीपंथ क्रमिला । गंगाउगम अवलोकिला । संप्रती न देखवेचि कवणाला । देह पतनाला पावती ॥ ६७ ॥ तेथोनि परतले श्रीरामदास । साष्टांगें नमिती श्रीत्रिजुगी नारायणास । जेथें श्रीशंकरास । हिमकन्येसीं विवाह जाला ॥ ६८ ॥ श्रीसदाशिव निंदेवरी । देह सांडिला दक्षकु-

मरी । ते जन्मली हिमालया उदरीं । श्रीशंकरें गौरी अंगिकारिली ॥ ६९ ॥ तो लग्नविधीं जाला । तेथें श्रीत्रिजुगी नारायण ह्मणितला । अद्यापवरी होम नाहीं विसर्जिला । देखती डोळां सानथोर ॥ ७० ॥ तेथें श्रीसमर्थें वंदोनी । तेथील तीर्थविधी पाळोनी । ठाकोनि आले श्रीकेदारस्थानीं । गगनचुंबित हिमशिखरें देखती ॥ ७१ ॥ श्रीकेदारेश्वर प्रदेश । हिममय पीडी शरीरास । तो कवणा न साहवेचि त्रास । कितीएक देहास सांडिती ॥७२॥ श्रीसमर्थां श्रीरामभजन चांग । तेणें कळिकाळांही नव्हेचि रीग । तेथ हिम किती पीडील अंग । सर्वी सर्वांग श्रीराममय जालें ॥७३॥ तो तीर्थविधी केला । श्रीकेदारेश्वर साष्टांगें वंदिला । पुढती बद्रिनारायणपंथ आक्रमिला । तो पंथ आक्रमिला अत्यंत कठीण ॥७४॥ ठाकोनि आले श्रीबद्रिनारायण तेथ । साष्टांगेंसी केलें वंदन । पुढती केलें वसुधारागमन । नवलविंदान सृष्टिशोभा देखिली ॥ ७५ ॥ श्रीअलकनन्दा मन्दाकिनी । विष्णुप्रयाग नन्दप्रयाग वैतरणी । बहुविधा देखिल्या तीर्थश्रेणी । मानस सरोवराहूनि परतले ॥ ७६ ॥ मनुष्यमात्रां न जाववें । तेथ तेथ श्रीसमर्थें रिघावें । तेथील वस्तुजात अती सूक्ष्मत्वें निरीक्षावी । जडमूढ लावावे भजनपंथा ॥७७॥ हिमालयपर्वतीं । श्रीसमर्थ अत्यंत संतोष पावती । नाना सृष्टिशोभा विलोकिती । सिद्धमुनी भेटती गुप्तपंथीं ॥ ७८ ॥ श्रीबद्रीकेदार आश्रमीं । श्रीसमर्थां भेटले श्रीव्यासस्वामी । भेटों आले श्रीउद्धव परम संभ्रमी । असीर्वाद प्रेमा परम धन्य धन्य ॥ ७९ ॥ श्रीसमर्थां हिमताप किंचित वाटला । तो क्षणीं श्रीहनुमंता जाणवला । आणोनि दिधली हुर्मुजी वस्त्रें मेखळा । टोप दिधला भव्य विराजीत शिरीं ॥८०॥ तेकाळीं श्रीसमर्थ ध्यान । वस्त्रें मेखळा वल्कलांवर परिधान । पायीं पादुका कटीं कौपीन । तुंबा कुबडी करीं घेवोन विचरती ॥ ८१ ॥ श्रीहनुमंतें दिधली तुळशी-

माळा । ते श्रीसमर्थ लेइले गळां । हिमालयीं चतुर्मास क्रमिला । मग उतरले हृषीकेशासी ॥ ८२ ॥ उपरी श्रीजगदीशदर्शन घेतलें । तेथील तीर्थविधी आचरले । उपरी प्रयाण आदरिलें । ठाकोनि आले श्रीसेतुबंधरामेश्वरीं ॥ ८३ ॥ श्रीसेतुबंधरामेश्वर । पाहोनि येती सानथोर । जयाचा महिमा सांगतां अपार । धन्य महीवर श्रीसेतुबंधरामेश्वर ॥ ८४ ॥ नानातीर्थें देखिलीं । नाना देवालयें विलोकिलीं । परंतु ते सरी नाहीं आली । सेतुबंध नव्हाळी विशेष भारी ॥ ८५ ॥ विख्यात नृपवर महिवरी । जयांची दृढश्रद्धा श्रीसेतुबंधावरी । अगणित सम्पत्ति अर्पिली । शोभा वाढविली श्रीसेतुबंधाची ॥ ८६ ॥ गगनचुंबित गोपुरें । अत्यंत विशाळ प्राकारें । एकेका नगरा ऐसीं थोर । भव्य मंदिरें श्रीसेतुबंधमार्गीं ॥ ८७ ॥ श्रीसमर्थ आले मदुरेप्रती । घातिलें दंडवत श्रीसुंदरेश्वरपार्वती । जडमूढ जे शरण येती । त्यांतें उद्धरिती कृपाळूपणें ॥ ८८ ॥ उपरीं आले श्रीरामेश्वरीं । साष्टांगेंसीं वंदिला श्रीत्रिपुरारी । क्षेत्रराज देखतां उल्हास भारी । वसती बरी आवडली ॥ ८९ ॥ भोंवता समुद्राचा फेर । मध्यें श्रीसेतुबंधरामेश्वर । नित्य महा-यात्रा लोटे अपरंपार । कीर्ति थोर श्रीसेतुबंधाची ॥ ९० ॥ श्री-सेतुबंधीं श्रीहनुमंत राहिले । ते श्रीसमर्थां भेटों आले । आग्रहें लंकागमन बोलिले । बिभीषणरायासी वहिलें भेटावया ॥ ९१ ॥ श्रीहनुमंत ह्मणती श्रीरामदासा । तुमचे भेटी बिभीषणा थोर आशा । क्षणीं जाऊं न लागतां अवकाशा । माझिये बैसावें स्कंधावरी ॥ ९२ ॥ श्रीसमर्थें हनुमंतराया वंदिलें । ह्मणती स्वामी अत्यंत सनाथ केलें । वरी लंकेप्रती नेऊं आदरिलें । धन्य फळलें भाग्य स्वामी ॥ ९३ ॥ क्षणींच सवेग लंकेप्रती । श्रीहनुमंत उड्डाणें आले त्वरित गती । बिभीषणरायासीं दूत जाणविती । स्वामी अव-

चिती थोर पुरुष आले ॥ ९४ ॥ श्रीहनुमंत आम्ही वोळखिले । दुजें कोण हें न कळे । श्रीहनुमंतस्वामीचे लडिवाळे । अत्यंत प्रेमळे दिसतात जी ॥ ९५ ॥ ते दूतवार्ता ऐकतां । धीर न धरवेचि बिभीषणचित्ता । सामोरे धांवले सत्वरता । नगरीं आतौता गजरेसीं आणिलें ॥ ९६ ॥ श्रीसमर्थें बिभीषणा घातिलें लोटांगण । तंव येरें झणींच घेतलें उचलोन । अत्यंत आदरें हातीं धरोन । सुवर्ण आसनीं बैसविलें ॥ ९७ ॥ सभा बैसली पृथक् पृथक् । श्रीहनुमंता दिधलें सिंहासन चोख । श्रीसमर्थपूजन करिती एकेक । नगरीं कौतुक घरोघरीं ॥ ९८ ॥ मंगळवाद्यें वाजविलीं । घरोघरीं मंगळें केलीं । लंका श्रीसमर्थचरणीं लागली । कीर्ति वर्णिली श्रीसमर्थजीची ॥ ९९ ॥ नित्य कथाकीर्तन गजर । श्रीरामनामीं उच्छाव थोर । लोटांगणीं धांवती नारीनर । भाग्य अपार लंकेचें ॥१००॥ लंकेंत बहुकाळ रहिवास केला । नित्य कथाकीर्तन सोहळा । मग परतावया निरोप घेतला । विरह दाटला बिभीषणराया ॥ १ ॥ परस्परीं लोटांगण । परस्परीं प्रीतिसंभाषण । परस्परीं प्रीतिवंदन । प्रेमाश्रु नयनीं परस्परीं चालिले ॥ २ ॥ लंकेहूनि प्रयाण प्रसंगीं । श्रीसमर्थें बिभीषण स्तुति केली अभंगीं । तेचि वक्ता श्रोतयांलागीं । अति लागवेगीं सादर करीतसे ॥ ३ ॥

धन्य हें नगर धन्य बिभीषण । धन्य वरदान समर्थांचें ॥ १ ॥
समर्थांचे कृपें वर हा पावला । चिरंजीव जाला कल्पवरी ॥ २ ॥
कल्प एक वस्ती लंकेमाजी जाणा । मारुति रक्षणा जयालागीं ॥३॥
जयालागीं कृपा समर्थ हनुमंत । उपासना पंथ राघोबाचा ॥ ४ ॥
राघवाचे कृपें भेटि याची जाली । लंकादेवी आली भेटावया ॥ ५ ॥
भेटीचा हा लाभ मारुतिच्या संगें । पुष्पाचिया योगें येणेंकरितां ॥६॥
येणें जालें येथें प्रदक्षिणा योगें । समर्थांचा संग ह्मणोनियां ॥ ७ ॥
ह्मणोनिया विनंती ऐका लंकापती । लोभ फार चित्तीं असों द्यावा ॥८॥
असों द्यावी आतां कृपा दासावरी । दास हा निर्धारीं मनीं चिंती ॥९॥
मनीं हा लोभ फार असों द्यावा । लोभयोगें सेवा घडो मज ॥ १० ॥

मज घडो सेवा राघवाची भक्ती । उभयपद प्राप्ती ह्मणोनियां ॥११॥
ह्मणोनियां धन्य आपणा ह्मणवी । दास ह्मणे पदवी तुह्मा करितां ॥१२॥
इतुकें जंव श्रीसमर्थ बोलों सरले । तंव धांवोनि बिभीषणें कंठीं लाविले । धन्यधन्य श्रीसमर्था ह्मणितलें । श्रीरामप्रभूचे उभविले कीर्तिध्वज तुह्मी ॥ ४ ॥ आतां येथोनी । तुह्मी उद्धरिजे मेदिनी । उद्धरिजे जडमूढां लागुनी । प्रताप करणी समर्थसंत तुह्मी ॥ ५ ॥ यापरी बिभीषणनिरोप घेतला । श्रीसमर्थ आले श्रीसेतुबंधाला । येथेंही श्रीहनुमंत साष्टांगें वंदिला । उपरी श्रीरंगनाथ देखिला शेषशयनीं ॥ ६ ॥ श्रीसमर्थ हंसक्षेत्रीं आले । उपरी मध्वरंगासीं देखिलें । श्रीअंतरंगा नमिलें । देखिले श्रीजनार्दन वहिले दर्शसेनादी ॥ ७ ॥ तेथूनि गोकर्णमहाबळेश्वरीं । वस्ती केली बहुकाळवरी । उपरी शेषादि पर्वतशिखरीं । श्रीव्यंकटेश्वरा वंदिलें ॥ ८ ॥ श्रीशैल्य मल्लिकार्जुन । बालनृसिंह नारायण । पालक नृसिंह भगवान । वीरभद्र पंचमहालिंगें जाण देखिलीं ॥ ९ ॥ देखिली किष्किंधा नगरी थोर । ऋष्यमूकपर्वत पंपासरोवर । स्वामी देखिला श्रीकार्तिकेश्वर । दक्षिणक्षेत्रें अपार देखिलीं ॥ १० ॥ देखिलें करवीर क्षेत्र । उपरी श्रीपरशुराम पवित्र । देखिला श्रीपंढरीनाथ सुपात्र । भीमाशंकर त्वरित तोही देखिला ॥ ११ ॥ उपरी आले श्रीत्र्यंबकेश्वरीं । लोटांगण घातिलें गंगाद्वारीं । कडकडोनि आलिंगन श्रीनिवृत्तिसमाधीवरी । यात्रा बरी सुफळित श्रीसमर्थजीची ॥ १२ ॥ उपरी पंचवटीं येउनी । श्रीरघुनाथ वंदिला लोटांगणीं । सकळपुण्य अर्पिलें श्रीचरणीं । निष्कामभजनीं सनाथ जाले ॥ १३ ॥ श्रीरामप्रभू ह्मणती श्रीरामदासा । येथोनि क्षणीं न करावें अवकाशा । त्वरें जावोनि दक्षिणप्रदेशा । अति उल्हासें धर्म संस्थापिजे तुंवां ॥ १४ ॥ तंव श्रीसमर्थें घातलें लोटांगण । कर जोडोनि केलें स्तुती-

स्तवन । स्वामी घेतों आतां मातृदर्शन । सेवीन चरण ज्येष्ठ बंधूंचे ॥ १५ ॥ त्याउपरी कृष्णातटाकासीं । मी निश्चयें जातों लागवेगेंसी । ऐसें ऐकतां श्रीरामचंद्रासीं । संतोष मानसीं बहु वाटला ॥ १६ ॥ श्रीसमर्थें श्रीराघवा पूजिलें । नाना असीर्वाद घेतले । श्रीरामप्रभू अंतर्धान पावले । श्रीसमर्थ चालिले तेथोनि पुढें ॥ १७ ॥ उपरी आले टाकळीं । साष्टांगेंसीं वंदिला श्री-महाबळी । उद्धवा आलिंगिलें प्रेमसम्मेळीं । करुणाबोलीं गुज त्यासीं करिती ॥ १८ ॥ उद्धवा सांगती श्रीरामदास । आह्मीं जातों श्रीगंगाप्रदक्षिणेस । अल्पकाळेंचि येऊं भेटीस । चित्तीं दुःखखेदास न आणिजे ॥ १९ ॥ यापरी संबोखूनि उद्धवास । श्रीसमर्थ चालिले गंगाप्रदक्षिणेस । ठाकोनि आले श्रीप्रतिष्ठाणक्षेत्रास । बहुकाळ वसतीसिं राहिले ॥ २० ॥ ते काळीं श्रीसमर्थध्यान । अत्यंत तेज परिपूर्ण । करीं तुंबा कुबडी धारण । कटिबंधकौपीन विलसतसे ॥ २१ ॥ पाठीसीं मेखळा । शिरीं जटाजूट मोकळा । कंठीं तुळशीमाळा लेइल्या । गलोल शोभली करसम्पुटीं ॥ २२ ॥ यापरी करोन वेष । श्रीसमर्थ आले पैठणास । सायम्संधेच्या समयास । गंगेवरी ब्रह्मवृंदास दृष्टीं पडिले ॥ २३ ॥ श्रीसमर्थां पुसती ब्राह्मण । जी आपुली उपासना कोण । कैसें आदरिलें परिभ्रमण । वसतीस्थान कोण तुमचें ॥ २४ ॥ तंव श्रीसमर्थ नमूनि ह्मणती । विचरों श्रीरामउपासनापंथीं । ब्रह्मचर्य आश्रम आह्मांप्रती । स्वानंद-वृत्ती महीं विचरों आह्मी ॥२५॥ श्रीसमर्थकरीं गलोल देखिली । कवण्या काजा द्विजवरीं पुसिली । श्रीसमर्थ ह्मणती क्रीडावया भली । करीं धरिली स्वामिराया ॥२६॥ कांहीं आहे अभ्यास । ऐसें द्विजवर पुसती श्रीसमर्थांस । तंव घार आकाशीं घेत होती परिभ्रमणास । श्रीसमर्थें तिसीं तत्काळ पाडिलें ॥ २७ ॥ द्विजवरीं हाहाःकार केला । श्रीसमर्थां जीवहत्त्या दोष लाविला ।

प्रायश्चित्तविधी आरंभिला । जटाभार उतरिला गोमय दिधलें ॥ २८ ॥ श्रीसमर्थां द्विजवर ह्मणती । आतां जाह्लीसे शुद्धी । हें वाक्य न मनेचि श्रीसमर्थांप्रती । ह्मणती असत्य वदंती द्विजवर हो ॥ २९ ॥ श्रीएकनाथस्वामीसीं तुह्मी । छप्पन्न प्रायश्चित्तें दिधलीं संभ्रमीं । मज तंव न मानवे हें स्वामी । घार तुह्मी जंव न उठवितां ॥ ३० ॥ ऐसा श्रीसमर्थआग्रह । द्विजवर ह्मणती हें नव्हे । मेला जीव परतोनि नये । भलत्या भरीं भरों नये गोसाविया ॥ ३१ ॥ तंव श्रीसमर्थें निजकरीं । घार उचलोनि घेतली सत्वरीं । ह्मणती जाई वो आपुल्या भ्रमणांतरीं । गगनभरीं फिरावया ॥ ३२ ॥ ऐसें ह्मणत गोंजारिलें । घारीपृष्ठीं हस्त फिरविले । तंव तेथ नवलविंदान जालें । सजीव होवोन उडाली घार गगनीं ॥ ३३ ॥ श्रीसमर्थें प्रतिष्ठानीं नवल केलें । पूर्ववत जटाभार आले । द्विजवर श्रीसमर्थ चरणीं लागले । ह्मणती क्षमा केलें पाहिजे स्वामिराया ॥ ३४ ॥ प्रतिष्ठानीं नवल जालें । लोकीं श्रीसमर्थ सिद्ध वोळखिले । सकळीं नानास्तुती पठण केलें । नानापरी गौरविलें पूजाविधी ॥ ३५ ॥ श्रीसमर्थें ब्रह्मवृंदा वंदिलें । हा तुमचा प्रताप ह्मणितलें । तुह्मां सकळांचें मी लेकरूं लडिवाळें । श्रीनाथचरणावरी खेळेन कवतुकेंसीं ॥३६॥ श्रीनाथपादुकाजवळी । श्रीसमर्थ कीर्तन करिती गजरीं । सानथोर भुलविले अळुमाळी । श्रीनाथवृंदावन डोलों लागलें ॥३७॥ श्रीसमर्थां नित्य गंगास्नान । मधुकरी करिती कोरान्न । रात्रौ करिती हरिकीर्तन । निस्पृह पूर्ण श्रीसमर्थस्वामी ॥३८॥ आतां येरीकडे जांब नगरीं । राणाऊ शोक पीडा अत्यंत शरीरीं । अन्न न सेविती पोटभरी । नयनीं पूर येती दुःखाश्रूचे ॥ ३९ ॥ ऐसिया शोकाकुळींत वृत्ती । राणाऊदृष्टी गेली निश्चिती । गंगाधरपंत नित्य सांत्वन करिती । आठव देती पूर्वसंकल्पाचा ॥ ४० ॥ कैसें पंतांचें सूर्योपासन । कैसें पावलें वर-

दान । तें सकळ तुह्मासीं ज्ञान । वृथा कष्टोन देह कां पीडितां ॥४१॥ सूर्यअंशें पुत्र जाला । पूर्व संकल्पें सन्निध बैसला । रुद्रांशें पुत्र प्रगटला । त्याचा नेम नेमिला जगदुद्धारा ॥४२॥ ऐसें हें सकळ जाणतां । आणि लोकिकीं या ऐसे शोकीं भरतां । हें तंव न साहवेचि भगवंता । तरी नारायण आतां त्वरीत भेटेल ॥ ४३ ॥ पंत गंगाधराचें आइकोनि वचन । जननी बोलिली सावधान । तूं बोलिला तें सत्य साच वचन । सत्य समाधान तुझेनि वचनें ॥ ४४ ॥ तूं ज्ञाता साधू गुणनिधान । आत्मानात्म करावें निरूपण । तेणेंचि वृत्ती स्थिरावोन । भगवद्भजन सांग घडेल ॥४५॥ ते काळीं पंतगंगाधरें । निरूपिला आत्मानात्म विचार । जननीस अत्यंत हरुषभर । श्रीरघुवीर स्मरणेंसीं ॥ ४६॥ तंव अकस्मात एके दिनीं । श्रीसमर्थ उभे अंगणीं । जयजय श्रीरघुवीर गर्जनीं । जांबभुवन पवित्र केलें ॥ ४७ ॥ ते काळींचा आनंद । न सांठवेचि गगनांत । मूर्ति पहातां भव्य अवधूत । श्रीशुकमुनींद्र ऐसा ॥ ४८ ॥ धन्य ते काळींचे जन । जिहीं श्रीसमर्थ अवलोकिले डोळांभरोन । धन्य राणाऊ साध्वी निधान । पुत्र हनुमान जियेसीं ॥४९॥ इतर स्त्रियांसीं पुत्र होती । परी राणाऊसतीची विशेष महती । उभयतां पुत्र विख्यात जगतीं । ईश्वरांश निपजती जगदुद्धरणीं ॥५०॥ अवधारा ते काळीं । राणाऊ स्नुषेतें बोलिली । बाळे गोसाविया भिक्षा घाली । ऐकतां हासिन्नले श्रीसमर्थ रामदास ॥ ५१ ॥ हा हो जी हा भिकारी । नाहीं आला भिक्षेवरी । ऐकतांचि राणाऊ नवल करी । कोण नारोबा गृहीं आला नेणों ॥ ५२ ॥ कोण रे नारायणा । ह्मणतांचि श्रीसमर्थें घातिलें लोटांगणा । मायेनें कडकडोनि दिधलें आलिंगना । देहभान विसरली ॥ ५३ ॥ सर्वेचि आली शुद्धीवर । तंव नारोबाशिरीं देखिला जटाभार । ह्मणे काय करूं न देखवे डोळांभर । नारोबा अरुवार नयनेसीं ॥ ५४ ॥ तंव श्रीसमर्थ

ह्मणती । माते तुज दृष्टी देवीं निश्चिती । डोळ्यांवरी तुळसी-माळा फिरवितां सहज रीती । तंव दृष्टी पुरती नयनासि आली ॥ ५५ ॥ श्रीसमर्था जननी ह्मणे । बाळा ह्या भूतचेष्टा तुज कवण्या गुणें । श्रीसमर्थ स्मित हास्यें ह्मणती जबर भूतानें । मजलागुनी पछाडिल्या जी ॥ ५६ ॥ अत्यंत जबर भूत भारी । ते शिरलें माझिये हृदयमंदिरीं । मी वर्तत त्याचि-या चेष्टेवरी । चराचरीं तें भूत भरलें ॥ ५७ ॥ तुह्मां सांगतों तें भूत । श्रवण करावें सावचित्त । सर्वेचि रचोनि पद्द गात । श्रोतीं सावचित्त परिसावें ॥ ५८ ॥

होतें वैकुंठिच्या कोनीं । शिरलें अयोध्याभुवनीं ।
लागे कौसल्येच्या स्तनीं । तेंचि भूत गे माय ॥ १ ॥
जातां कौशिक राउळीं । अवलोकितां भयंकाळि ।
ताटिका ते छळोनि मेली । तेंचि भूत गे माय ॥ २ ॥
मार्गी जातां वनांतरीं । पाय पडला दगडावरी ।
पाषाणाची झाली नारी । तेंचि भूत गे माय ॥ ३ ॥
जनकाचे अंगणीं गेलें । शिवाचें धनुष्य भंगिलें ।
वैदेही अंगीं संचरलें । तेंचि भूत गे माय ॥ ४ ॥
जेणें सहस्त्रार्जुन वधिला । तो ही तत्काळचि भ्याला ।
धनू देऊनि देह रक्षिला । तेंचि भूत गे माय ॥ ५ ॥
पितयाचे भाकेसीं । कैकईचे वचनासी ।
मानुनि गेलें वनवासीं । तेंचि भूत गे माय ॥ ६ ॥
सुग्रीवाचें पालन । वाळीचें निर्दाळण ।
तारी पाण्यावरी पाषाण । तेंचि भूत गे माय ॥ ७ ॥
रक्षी मरणीं बिभीषण । मारी रावण कुंभकर्ण ।
तोडी अमरांचें बंधन । तेंति भूत गे माय ॥ ८ ॥
वामांगीं स्त्रियेला धरिलें । धांउनि शरयूतिरीं आलें ।
तेथें भरतासी भेटलें । तेंचि भूत गे माय ॥ ९ ॥
सर्वाभूतांचें हृदय । नांव त्याचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तेंचि भूत गे माये ॥ १० ॥

ऐसें रसाळ काव्य श्रवणीं पडतां । जननीये हर्षरोमांच पुल-कितां । कडकडोनि श्रीसमर्था आलिंगितां । धणी न पुरे चुंबिता

श्रीसमर्थसुख ॥५९॥ जननी वदे धन्य नारोबा तुझा पुरुषार्थ । तुझेनि निश्चयें मी सनाथ । तुवां समूळ दुःख केलें सुखचि निभ्रांत । माझिया हृदयांत आनंद न सांठवे ॥ ६० ॥ ऐसें श्रीसमर्थजननी संभाषण । चालतां पंत गंगाधरीं केलें श्रवण । धांवताचि आले आंतून । डोळेभरोन श्रीसमर्थ देखती ॥ ६१ ॥ बंधूबंधूसीं पडिली मिठी । बंधूबंधूसीं प्रेमदृढ गांठी । बंधूबंधूसीं सुख एक पोटीं । सुख संतुष्टीं बंधूबंधू ॥ ६२ ॥ बंधूबंधूचा विशेष प्रेमा । नाहीं द्यावया दुसरी उपमा । भेटि-गाठिं होतांचि समाधी संभ्रमा । तत्काळीं श्रीरामीं लीन दोघे ॥ ६३ ॥ बंधूबंधूसी उपासना एक । बंधूबंधूसीं समाधान एक । बंधूबंधूसीं सुख एक । एकाकी आत्यंतिक एकरूप दोघे ॥६४॥ अवस्था सांवरून पंत गंगाधरें । कंठीं श्रीसमर्थां लाविलें निर्भरें । डोळे भरिलें प्रेमाश्रुपुरें । नयनाश्रुपुरें श्रीसमर्थां न्हा-णिलें ॥ ६५ ॥ पंत गंगाधर नारायण । अवस्था सांवरूनि करिती संभाषण । गंगाधरपंत वदले श्लोकचरण । ते सादरें करोन श्रोतीं अवधारिजे ॥ ६६ ॥

लावण्य तारुण्य संपन्न नारी । कौशल्यता वैभव चित्त हारी ।
एकांतकाळीं पडतां समंधू । अभिलाष नाहीं तो धन्य साधू ॥१॥

ऐसा पंतगंगाधरांचा प्रश्न । श्रीसमर्थ बोलती प्रतिवचन । जे अत्यंत सखोल अर्थपूर्ण । श्लोक गंभीर वचन अवधारिजे ॥६७॥

वारांगना ती सन्मूख आली । लावण्यरूपीं दृष्टी न घाली ।
मुक्ताफळीं शुक उगेचि रासी । परंतु आरण्य मिरास त्यासीं ॥२॥

यापरी संभाषण । उभयतां बंधू करिती आनंदपूर्ण । परस्पर पावती ऊणखूण । अत्यंत समाधान परस्परीं ॥ ६८ ॥ श्रीरा-मरायें वनवासाहुनी । येणें केलें अयोध्याभुवनीं । संतुष्टता कौसल्यामाते लागुनी । राणाऊ जननी तेणेंपाडें सुख संतुष्टी ॥ ६९ ॥ चवदा वरुषें निराहारी । भरत राहिला निर्धारीं ।

श्रीराघवें भेटी दिधल्या उपरी । सुख समाधान परी । पंत गंगाधरा तेणें पाडेसीं ॥ ७० ॥ तया सुखासी सीमा । नाहीं द्यावया उपमा । जांबेची विशेष भाग्यगरिमा । मज तंव संभ्रमा वैकुंठ जालें ॥७१॥ श्रीसमर्थ वास्तव्य जेथें । त्रिभुवनींचें राज्य तेथें । सकळ ऐश्वर्यें सामर्थ्यें । लक्ष्मी राबते अष्टमहासिद्धीसीं ॥७२॥ तईं जांबेंत थोर उत्साव जाला । श्रीसमर्थदर्शना जनसमूह धांवला । सकळीं शोडषोपचारें पूजिलें । सकळांचा झाला जीव कीं प्राण ॥ ७३ ॥ उपरी जाहलें भोजन । श्रीसमर्थ कथिंती निजाचरण । लग्नमंडपींहूनि केलें पलायन । पंचवटीं राहोन अनुष्ठान तीर्थयात्रेवरी ॥ ७४ ॥ मी स्तवियला श्रीहनुमान । तो प्रगटला मजलागोन । ह्मणे जाईं करीं पंचवटीं तपाचरण । श्रीरघुनन्दन तुज भेटेल ॥७५॥ सुखें करीं पुरश्चरण । मुखें चालवीं नामस्मरण । गोष्टी न करीं श्रीरामनामाविण । निर्धारें करोन तप आचरीं ॥७६॥ उपरी गेलों पंचवटीं । आराधिला जगजेठी । श्रीरामप्रभू भेटला उठाउठी । ह्मणती तपाची अटाटी आवरी ॥ ७७ ॥ मियां प्रभुचरणीं विनाविलें । जे स्वामी द्वादश वरुषें नेमिलें । तितुकें निर्विघ्न सिद्धी गेलें । तेणें वाहिलें मज समाधान होईल ॥७८॥ उपरी निघालों तीर्थाटणा । गेलों अयोध्या मथुरा बद्रिनारायणा । चतुर्धामें केलीं जाणा । जयांची सीमा न बोलवे ॥७९॥ द्वादशवरुषें चहूंधामें केलीं । उपरी श्रीरघुनाथभेटी घेतली । श्रीचरणीं पुण्यसंपत्ती समर्पिली । भेटिलागीं आलों संप्रती वडिलांच्या ॥ ८० ॥ आतां येथोनि पुढें । धर्मसंस्थापनेच्या कैवाडें । मज जाणें असें वाडेकोडें । श्रीरमावल्लभें धडफुडें आज्ञापिलें ॥ ८१ ॥ तंव जननी गंगाधरा । आनंद लहरी उठती एकसरा । ह्मणती बापा निवडलासी पुण्यपुरुष साचोकारा । वंशधर पितरां उद्धरिलें तुंवा ॥ ८२ ॥ पूर्व संकेतशब्द खरा जाला । माझा नारोबा पुण्यपुरुष निवडला । ह्मणीं तो मज

कौतुकें भेटी आला। उद्धार केला तेणें आमुचा ॥८३॥ जननी वदे नारायणा। तूं सुखें करी जगदुद्धरणा। परी निववी माझि-या मना। जें कदाही भ्रमणांत न जाइजे ॥ ८४ ॥ श्रीसमर्थें जननीशब्द आइकिला। बंधू गंगाधर विलोकिला। पंत ह्मणती अल्पमात्र संशय उरला। तो निरासिला पाहिजे तुह्मी ॥ ८५ ॥ तंव हांसोनि बोलिले श्रीरामदास। मानितों जी श्रेष्ठवचनास। वंदूनि श्रीगंगाधरचरणास। श्रीकपिलगीतेसीं आदरिलें॥८६॥ ते समूळ श्रीकपिलगीता। आकळे ऐसी नाहीं जी अधिका-रता। भिमू ह्मणे मी अल्पस्वल्प बोलतां। श्रोतीं सादरता क्षमा कीजे ॥ ८७ ॥ मी तंव तुमचें लडिवाळ तान्हे। पिसा-टचि बोलतों वचनें। शब्दार्थ खोली मी कांहीं नेणें। मूर्खपणें महीं वर्तत ॥८८॥ न कळे कैसें जालें। श्रीसमर्थें चरित्रलेखनीं बैसाविलें। माझेनि मुखें तोचि बोले। माझें मूर्खपण वहिलें मज ठाउकें ॥ ८९ ॥ आतां वंदूं श्रीधरचरणा। बोलूं कांहीं कपिल-गीतवचना। श्रोतीं सावधान कीजे श्रवणा। मी अनन्यशरण बाळमती ॥ ९० ॥ आइका श्रीसमर्थ ह्मणती जननीसीं। तुह्मा सांगेन आजि श्रीकपिलगीतेसीं। तुह्मी सावधान करावें श्रव-णासीं। समाधानासीं करूं तुमच्या ॥९१॥ श्रीभगवान कपिल ह्मणती माते। प्रकृतीयोगें देहबंध जीवातें। साच न ह्मणावें या वचनातें। आसक्ती ते बंध पाववी ॥ ९२ ॥ आसक्ती दो विभागीं। भागावी समभागी। एके आसक्तीं नाश जगीं। एकें लागवेगीं वैकुंठ जोडे ॥ ९३ ॥ कोणी एकें भजन केलें। वैकुंठपतीसीं जोडिलें। वरी संसारगर्तेंत पडिलें। तरी जाणावें राहिलें व्यंग साधनीं ॥ ९४ ॥ साधकें निष्काम भावें। अविश्रमता भजन करावें। रागद्वेषादि त्यागावे। कामक्रोधाचिया नावें शून्य दीजे ॥ ९५ ॥ भगव-ताचीं सगुण चरित्रें। श्रवण करावीं परम पवित्रें। तेणें पर-

माथीं मोहारती सकळ गात्रें । होइजे सुपात्र भजनपंथें ॥ ९६ ॥ प्रकृती ते काये । पुरूष कोणा भणों ये । विवेक वैराग्य ह्मणिजे काय । हें स्वयमेव जाणावें ॥ ९७ ॥ विवेक वैराग्य धरी । निष्कामता भगवद्भजन करी । त्याची अज्ञान निशी संव्हरी । तयाचा अंकीत श्रीहरी होवोन ठाके ॥ ९८ ॥ चरणीं देवालया गमन । करीं करावें देवतार्चन । मस्तकीं वंदावे श्रीचरण । मुखें उच्चारण रामकृष्णगोविंद ॥९९॥ आदरें करावें शास्त्र-श्रवण । इंद्रियां आहार देइजे नेमून । करावें अष्टांगयोग साधन । दृढतपाचरण साधावें ॥ १०० ॥ ऐसा नित्यनेम चालतां । इंद्रियें भगवत्स्वरुपीं मोहारतां । जीव जीवबंधां-तूनि सुटे तत्काळता । संशय चित्ता न धरिजे ॥ १ ॥ दोअरणीपासावा विस्तव । अरणीतें भस्म करी स्वयमेव । तैसा साधन साधितां योग गौरव । जीव जीवभाव विसरे ॥ २ ॥ अष्टांग योग साधनें । शास्त्रीं बोलिलीं बहुविधगुणें । तीं कलीमाजी अत्यंत कठीण । यालागीं नामस्मरण करावें ॥ ३ ॥ श्रीराम जयराम । साधकीं गर्जावें उत्तम । येणें तत्काळ निरासे भ्रम । पुरुषोत्तम तत्काळ जोडे ॥ ४ ॥ नानाविध साधनें । तीं तृणावारीं नेलीं एका नामस्मरणें । भगवत्स्वरूप-स्वयमेव होणें । ऐसें प्रतापकरणें नामाचें ॥ ५ ॥ नामासरसी टाळी । वाजवितां पापांची होय होळी । देव सांपडे अळुमाळी । करुणा कल्लोळ श्रीरामचंद्रप्रभू ॥ ६ ॥ कलियुगाचें महिमान । देव सोपा करितां नामस्मरण । नामापरतें नाहीं साधन । ऐसें श्रीकपिलभगवान बोलिला ॥ ७ ॥ तरी तुवां जननीये । हित-कर वाक्य आइकावें । सर्वकाळ रामकृष्णगोविंद गर्जावें । वैकुंठ धावें भेटीसीं तत्काळ ॥ ८ ॥ आणिकीं केलें कांहीं । मज तंव नामापरतें नाहीं । पंडित बोलती शास्त्रप्रवाहीं । मज अनुभव आहे अंगीचा ॥ ९ ॥ हांके सरसी उडी । घालो-

नियां स्तंभ फोडी । तो प्रल्हाद रक्षिला कडोविकडी । ऐसी प्रताप जोडी नामाची ॥ १० ॥ नामें असंख्य भक्त उद्धरले । महापातकियां तारिलें । नामें तिन्हीलोक पुनीत केले । नाम भले साधुसंत सेविती ॥ ११ ॥ यया कलियुगाचें महिमान । एक करावें नामस्मरण । याहूनि ढिलीं आणीक साधनें । पुरश्चरणें नानाविध ॥ १२ ॥ ऐसें ऐकतां श्रीसमर्थवचन । जननीचित्तीं आनंद गहिंवरोन । प्रेमें पडिलें दृढालिंगन । जालें नवलविंदान ते काळीं ॥ १३ ॥ श्रीसमर्था जननी आनंदपूर्ण । उभयतांसी तत्काळ समाधी जाण । पंत गंगाधरासी समाधी पूर्ण । नाहीं देहभान कवणासीं ॥१४॥ तटस्थध्यानीं त्रिवर्ग। इतरां कवणा नेण-वेचि तो प्रसंग । येउनी शुद्धीवर लगबग । गंगाधरपंत समाधी उतरविती सकळांच्या ॥ १५ ॥ आले शुद्धीसीं त्रिवर्ग । जननी संतोष पावली सर्वांग । ह्मणे पुत्र होवोनि फेडि-ला पांग । मी निजांगें सांग पुनीत जालें ॥ १६ ॥ श्रीकपिल-मुनीच्या वचनें । समाधी सेविली श्रीकपिलजननीनें । मज तेणें पाडें नारायणें । समाधीसुख परिपूर्ण सेवविलें आजी ॥ १७ ॥ गेला निवारला भ्रम । आतां निर्विकल्प उच्चारीन नाम । नित्य श्रीरामउपासना नेम । मी निभ्रमें चालवीन ॥ १८ ॥ श्रीसमर्थें यापरी आनंदभरें । जननीभ्रम निरसिला एकसरें । मग आज्ञा पुसिली सत्वर । जगदुद्धार करूं जावया ॥ १९ ॥ तंव जननी बोलिली बाळा । तुझा अधिकार म्यां ओळखिला । तुवां सुखें जाइजे जगदुद्धाराला । विरुद्ध बोला मी नेघे ॥ २० ॥ सर्वेचि पंत गंगाधर ह्मणती । तुमची विख्यात साधुमहंती । तुमचें प्रतापसामर्थ्य आणितां चित्तीं । आनंदवृत्ती उचंबळोन येतसे ॥ २१ ॥ येथोनि सुखें विचरिजे । जगदुद्धारा तुह्मी जाइजे । आह्मुचें विस्मरण कदापि न कीजे । हितगुज सहजें मित्रभावें ॥ २२ ॥ तंव श्रीसमर्थ घालिती

लोटांगण । माता गंगाधर घेती उचलोन । मस्तक करिती अवघ्राण । उतरिती निंबलोण श्रीसमर्थांवरुनी ॥ २३ ॥ उपरी यथाकाळें निघाले । श्रीसमर्थ कृष्णातट ठाकोनि आले । तें चरित्र होईल भलें । पुढिलिये प्रसंगीं ॥ २४ ॥ मी तंव शुद्ध बाळमती । शरण साधुसंतांप्रती । माझी तंव बोबडी वदंती । श्रोतीं यथानिगुती गोड कीजे ॥ २५ ॥ येथोनि पुढील चरित्र । विशेष गंभीर सुपवित्र । श्रवण करितां लांचावतील श्रोत्र । अत्यंत पवित्र श्रीसमर्थकथा ॥२६॥ पूर्वार्ध चरित्रभाग । सिद्धी गेला जी निर्व्यंग । येथोनि उत्तरचरित्र प्रसंग । नेता श्रीरंग श्रीसमर्थस्वामी ॥ २७ ॥ माझिये पोटीं भयभारी । धारिष्ट केलें लेखनावरी । तंव निजांगें धांवला श्रीहरी । माझिये अंतरीं प्रविष्टला ॥ २८ ॥ तेणेंचि केलों निर्भय । वचनें आठवती निरूपाय । तें नवल सांगतां नये । प्रसंग होये प्रसंगावरी ॥ २९ ॥ सत्यसंकल्पाचा । दाता भगवंत साचा । तेणें पवित्र केली माझी वाचा । चरित्र रचनेचा पांग फेडिला ॥ ३० ॥ माझिये मनींचें केलें । मी आवडीं तें वचन बोले । सहज लीळे प्रसंग जालें । चरित्र वहिलें श्रीसमर्थरायाचें ॥ ३१ ॥ श्रीसमर्थस्वामी आवडता । तो माझिये जिवींचा पढियंता । त्याची गाईन चरित्रकथा । संकल्प आतांता । सिद्धीस गेला ॥ ३२ ॥ असो अतां परिहार । श्रोतीं क्षमा कीजे अधिकोत्तर । कृष्णातीर चरित्र विस्तार । होईल निर्भर पुढिलिये प्रसंगीं ॥३३॥ तें निरूपण अत्यंत गोड । साखरे परीस सुघड । श्रोतया वक्तयांचें पुरे कोड । फिटे चाड भाविकांची ॥३४॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भिमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ २३५ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत । भिमूविरचितम् । श्रीसमर्थ तीर्थयात्रा-

गमन । मातृशोकपरिहार करणंनाम अष्टम प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥

॥ एवं वोवीसंख्या २३५ ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ९ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ।
॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



यश कीर्ति प्रताप जोडे । संसारभ्रांति समूळ उडे । कळिकाळ पायरवीं पडे । हें सामर्थ्य गाढें श्रीसमर्थभक्तीं ॥ १ ॥ श्रीरामदास सखा सोइरा । यासम न देखों अन्य दातारा । जन्ममरणाचा पांग पुरा । निज निर्धारा फेडितसे ॥ २ ॥ श्रीरामदास कैवल्यनिधी । दूर करी आधिव्याधी । नाना विघ्नारिष्ट संबंधीं । भवभयजळनिधी संरक्षी ॥ ३ ॥ तनुमनें जिवेंप्राणें । करावें श्रीरामदास गुणगाणें । श्रीरामदासाविणें साजणें । देखता त्रिभुवनीं आढळेना ॥ ४ ॥ अज्ञाननिशी सरतां । आणि प्रबोध पहाट फुटतां । श्रीगुरू चोजविती सुपंथा । श्रीरामदास समर्थां भेटावया ॥ ५ ॥ भाग्याचा निज निधान ठेवा । श्रीरामदास डोळां पहावा । सर्वकाळ हृदईं ध्यावा । श्रीरामदास व्हावा देहभाव सहजीं ॥ ६ ॥ जयासीं श्रीसमर्थसेवा घडे । तयाची त्रिभुवनीं कीर्ति पवाडे । त्यासीं सुरवर वंदिती वाडेकोडें । परब्रह्म धडफुडें सहज ये हातां ॥ ७ ॥ श्रीसमर्थ माझी माउली । विषम कठिण काळींची साउली । नित्य पहातसे वाट्ली । स्नेहाळू भली निज तान्हया

॥ ८ ॥ मज लागलें श्रीसमर्थ ध्यान । तेणें नाठवेचि भूकतहान। लवों विसरली नेत्रपाती जाण । आनंद पूर्ण नित्य नूतन दुणावे ॥ ९ ॥ मज श्रीसमर्थें लाविला वेधू । तेणें विसर पडला संसार संबंधू । अज्ञान हरपलें ज्ञानावबोधू । आनंदकंदू वोळला जी ॥१०॥ नेणों कोण पुण्य फळा आलें । श्रीसमर्थें मज अंगिकारिलें । माझें मीपण तेणें चोरिलें । भाग्य फळलें एकसरां ॥ ११ ॥ येथोनि पुढतपुढती । माझिया भाग्यासि नाहीं मिती । वेधू लागला अहोराती । श्रीसमर्थ रामदास चित्तीं विनटला ॥ १२॥ श्रीरामदासेंविण जें करणें । मज तें तंव होय अमंगळवाणें । श्रीसमर्थभजनाविण देह धरणें । त्याहूनि मरणें सुखरूप ॥ १३ ॥ श्रीरामदासेंविण वस्तु देखणें । तो:तंव अधोगतीचा पंथ लक्षणें। श्रीसमर्थ देवाल्या डावलूनि जाणें । निकट करणें कुंभपाक ॥ १४ ॥ श्रीरामदासेंविण श्रृंगार । तो तंव प्रेतरूप बाडिवार । श्रीसमर्थनामाविण अक्षर । तरी हे सत्वर जिव्हा झडो ॥१५॥ ऐसा मनीं भाव उपजला । तो श्रीसंत श्रोतयां निवेदिला । क्षमा करा जी अधिकोत्तराला । जी अंकिलों जिवें भावें ॥ १६ ॥ श्रीसज्जनीं मज जवळ केलें । कृपा कटाक्षें न्याहाळिलें। प्रबंधवचनीं बोलाविलें । हें सामर्थ्य केतुलें मज पामरा ॥ १७ ॥ तुह्मी मजलागी पढविलें । श्रीसमर्थचरणीं अर्पिलें । श्रीसमर्थगुणानुवादीं सामर्थ्य चाले । हें सामर्थ्य वहिलें तुमचें जी ॥१८॥ आतां असो हा परिहार । परिहार मिसें उठे अहंकार । कांहीं देहीं येईल प्रकार । मी कवेश्वर ह्मणोनी ॥ १९ ॥ तो सांडूनि वृथाभिमान । वंदूनि सकळ सज्जन। पुढें चालऊं कथानुसंधान । श्रीसमर्थगुणवर्णन ग्रंथगर्भीं ॥ २० ॥ मागील प्रसंगीचे अंतीं । श्रीसमर्थ निघाले धर्मसंस्थापनें साठीं । लक्षोनि आले कृष्णातटीं । कथा गोमटी परिसावी ॥ २१ ॥ राणाऊनें करविलें निंबलोण । तंव तेथ असंख्य मिनले पौरजन। लोटांगणीं वंदिती

श्रीसमर्थचरण । नेत्रीं प्रेमाश्रु पूर्ण गहिंवरती ॥ २२ ॥ सुवासिनी गाती मंगळ वोविया । श्रद्धापूर्ण वंदिती श्रीसमर्थपाया । प्रयाणसमयीं निरोप द्यावया । जा ह्मणावया कवणाही बोल नुमटे ॥२३॥ श्रीराघवविरहें विव्हळली अयोध्या। जांबेची तेचि अवस्था सध्या । गोकुळवासी लोधली श्रीकृष्ण जगद्वंद्या । श्रीसमर्थपदा तैसेंचि स्मरती ॥ २४ ॥ श्रीसमर्थें जननीबंधूसि वंदिलें । जगदुद्धारार्थ निरोप घेतिले। पौरजनासी साष्टांगें अभिवंदिलें । आमुचें स्मरण भलें असों द्या ह्मणती ॥ २५ ॥ श्रीसमर्थ ह्मणती मी लेंकरूं । सर्वस्वीं हीन दीन पामरू । तुमचा कृपाकटाक्ष करू । निज निर्धारीं शिरीं असों द्या ॥२६॥ तुमचिया कृपाकटाक्षगुणें । मज हें त्रैलोक्यही होय ठेंगणें । सहजीं कलिकाळाचें तोंड ठेचणें । जडमूढ उद्धरणें नवल किती ॥ २७ ॥ ऐसें ह्मणोनि घातिलें लोटांगण । तंव धांवोनि जनीं घेतले उचलोन । झणीं भेटीसीं यावें परतोन । यापरी गहिंवरोन निरोप देती ॥ २८ ॥ श्रीसमर्थ पंथ क्रमूं लागले। दिसेतों परस्परीं न्याहाळिले । श्रीसमर्थें हस्तसंकेतें पालविले । जन परतले अतिदुःखकष्टें ॥ २९ ॥ श्रीश्रेष्ठ श्रीसमर्थसंगें आले दूरवरी। गुह्यातीत वार्ता केली परस्परीं । श्रीसमर्थें मस्तक ठेविला श्रीश्रेष्ठचरणावरी । प्रेमा अंतरीं न बोलवे ॥ ३० ॥ श्रीरघुनाथजीच्या आज्ञेवरी तुह्मी धर्म संस्थापावा निजनिर्धारीं । धरा पीडियली अत्यंत भारी । श्रीश्रेष्ठ सरोत्तरीं निवेदिती ॥ ३१ ॥ श्रीश्रेष्ठस्वामीनिरोप घेतला । श्रीसमर्थें पंचवटींत श्रीरघुनाथ वंदिला । मग कृष्णातट पंथ आक्रमिला । ठाकोनि आले कृष्णातट ॥ ३२ ॥ शके पंधराशे सहासष्टोत्तरीं । तारणनाम संवत्सरीं । दीनजनांचा निज कैवारी । कृष्णातिरीं प्रगटला ॥ ३३ ॥ आइका श्रोते भाविकजन । श्रीसमर्थ अवतार कार्याचें विंदान । एक नृप अवतरला शिवअंशेंकरोन । नामा-

भिधान शिवराज ऐसें ॥ ३४ ॥ शिवराज परमभाग्याचा। ज्यासीं निदिध्यास सर्वकाळ धर्मसंस्थापनेचा। स्नेहाळु श्रीसंत-सज्जनांचा। रंजल्यागांजल्याचा कैवारधारी ॥ ३५ ॥ शिव-रायाची यशकीर्ती। विख्यात जाहलीसे जगतीं। साधुसंत पावले परम तृप्ती। मंगळ कृती देखोनी ॥ ३६ ॥ अत्यंत अल्पवयामाजीं। शिवरायें तोरणा जिंतिला सहजीं। नाना युद्ध कौशल्य समाजीं। कीर्तिवंत गाजी प्रगटला ॥ ३७ ॥ महारा-ष्ट्राचा भाग्यसूर्य। तो हा प्रत्यक्ष श्रीशिवराय। जयाचे शूरवर वंदिती पाय। धन्य ते माय जिजाई ॥ ३८ ॥ असो ऐसिया समयास। श्रीसमर्थ आले महाबळेश्वरास। जन लाविले भक्ति-पंथास। सानथोरास वेधू लाविला ॥ ३९ ॥ तेथील अनंत-भट आणि दिवाकर। ज्यासी श्रीसमर्थभजनीं अति निर्धार। अनुग्रहीत होऊनि तत्पर। सेवाकर जाहले ॥ ४० ॥ त्यासी श्रीहनुमंतमूर्ती दिधली। उपासनादीक्षा निवेदिली। तेथूनि श्रीसमर्थस्वारी मुरडली। ठाकोनि आली वांईक्षेत्रा ॥ ४१ ॥ श्रीसमर्थें कृष्णास्नान केलें। उपरी श्रीरघुनाथकीर्तन आदरिलें। श्रीरामगुणीं जन रंजविले। जयघोष गाजविले श्रीरघुवीरनामें ॥ ४२ ॥ तंव पीठके यांची जननी। श्रीचरणीं आली लोटांगणी। तिसी देवें अनुग्रह देउनी। श्रीरघुनाथ भजनीं लाविली ॥ ४३ ॥ श्रीरोकडोबा नामाभिधान। तेथ संस्थापिला वायुनन्दन। पीठके यासीं सेवा निवेदून। श्रीजरंडेश्वर लक्षोन चालिले ॥ ४४ ॥ मग कृष्णावेणी संगमीं। वसतीसि आले श्रीसमर्थस्वामी। लेकु-रांसवें क्रीडा आक्रमूनी। बालधर्मीं चातुर्मास्य क्रमिलें ॥ ४५ ॥ श्रीसमर्थें जनलोक धुंडिला। शोध शोधूनि ठाईं पाडिला। गुप्त-वेष न वचे प्रगटविला। जनस्वभाव वोळखिला ठाईंठाईं ॥ ४६ ॥ उपरी आले प्रीतिसंगमीं। विरक्त गाजले श्रीसमर्थस्वामी। नाढळती कदा हेमधामीं। जनविश्रामीं नाढळती कदा ॥ ४७ ॥

क्वचित् जनलोकीं प्रगट दिसती । पहात पहातां गुप्त होती ।
जन शोधशोधूनि पाहती । अत्यंत श्रमती सांपडेना ॥ ४८ ॥
चमत्कार भिक्षामिसें । जन वेधिले सौरसें । स्त्रिया बाळें
अति आवेशें । नमस्कार मिसें लोंधोन पडती ॥ ४९ ॥
श्रीसमर्थें कऱ्हाडदेश पाहिला । विशेषें खडीपर्वत धरियला ।
चरणस्पर्शें पुनीत केला । कृष्णाबाईसी आला धन्यवाद ॥५०॥
श्रीरामखडीचें महिमान । बोलों जातां असाधारण । धन्य
तेचि सभाग्यजन । जिहीं तेथें श्रीचरण देखिले डोळां ॥ ५१ ॥
संप्रती खडीपर्वत देखतां । श्रीसमर्थ आठवती चित्तां । प्रेमाश्रु-
पूर नेत्रीं वहातां । सांवरितां न सांवरे ॥ ५२ ॥ महाराज
योगेश्वरें । चरित्र केलें कौतुकाकारें । दृष्टीं पडतील तीं
पदें कां सुकुमारें । जीवा काविरें विरहाचें ॥ ५३ ॥ धन्य
ते काळींचे सभाग्यजन । जिहीं पूजिले ते श्रीचरण । पाईंच्या
पादुका चटचट करोन । तो ध्वनी आइकोनि श्रवण पुनीत
केले ॥ ५४ ॥ श्रीरामखडीवरून झळकली असेल छाटी ।
ती जिहीं अवलोकिली असेल दृष्टीं । श्रीरघुनाथ नामस्मर-
णाची धाटी । श्रीसमर्थ निकटीं राहोन आइकिली जिहीं ॥५५॥
आइका श्रीसमर्थें भिक्षेकारणें । फेरी नित्यनूतन करणें । अति
गुप्त गिरिकंदरीं प्रवेशणें । विवंचना करणें जगदुद्धरणीं ॥५६॥
आइका पुढें चमत्कार जाला । तो सावधानचित्तें पाहिजे अव-
धारिला । येथोनि विशेष चरित्रलीला । परम आगळा कथा-
भाग ॥ ५७ ॥ माझा स्वामी श्रीसमर्थ । काय एक न करील
अघटीत । जगदुद्धरणीं पक्ष सत्य । त्रिसत्यसत्य गाजला
॥ ५८ ॥ आतां शहापूरकथाविंदान । तुह्मी सादरें करावें
श्रवण । कांहीं होतां अधिक उणें । क्षमा पूर्ण मज कीजे
॥ ५९ ॥ प्रीतिसंगमीं स्नान केलें । श्रीरामखडीं विश्रांतीसि
आले । संध्याजपवंदनादि सारिले । आदरिलें भिक्षेसी ॥६०॥

नित्यनेम मसुरासि जावें । मधुकरी कोरान्न करावें । तें भोजन खडीपर्वतीं सारावे । विवंचीत जावें जनदुःखपरिहारा ॥ ६१ ॥ एकवार आलें मनीं । जावें शहापुरा लागुनी । कोरडी भिक्षा यावें घेउनी । आजिचे दिनीं हेंचि भलें ॥ ६२ ॥ तैसेचि प्रवेशले शहापुरांत । जन देखती आश्चर्यचकीत । फेरी करितां अवचीत । गृह आलें ग्रामलेखकाचें ॥ ६३ ॥ ते ग्रामलेखक बाजीपंत । ग्रामसाऱ्यास्तव होते बंदिस्त । स्त्री सतीबाई होती विळपत । तंव अंगणांत रामरामध्वनी आइकिला ॥ ६४ ॥ जयजयश्रीरघुवीर ध्वनी । सतीबाई आइकोनि कानीं । आधीच संतप्त होती मनीं । तैसी धांवोनि अंगणीं आली ॥ ६५ ॥ सती बोले हे अभद्रवाणी । नुच्चारी आमुचिये अंगणीं । जा झणीं नीघ परता येथुनी । आजपासोनि न येइजे ॥ ६६ ॥ श्रीसमर्थें नित्य नेम धरिला । अंगणीं रामरामध्वनीं गाजविला । सतीबाईमनीं अत्यंत क्रोध भरला । साधू ताडिला कठिणोत्तरीं ॥ ६७ ॥ ते ह्मणे गोसाविया धीटा । किती करविशी रे कटकटा । तुझ्या न कळती कोणह्या चेष्टा । हटातटा पीडिसी ॥ ६८ ॥ तुझी मूर्ती वल्कलांबर । भस्मीभूत जटाभार । अभद्रवाणी गर्जविसी फार । लेंकुरें लहानथोर धाकीं भरलीं ॥६९॥ इतुकियांत चमत्कार जाला । बाजीपंतासि देहदंड नेमिला । विजापुराहूनि तलफनामा आला । गृहीं वाढला अति आक्रोश ॥ ७० ॥ तंव तेथ श्रीसमर्थ अंगणीं आले । शोका कोण कारण पुसिलें । जन ह्मणती जावें पंथें आपुलें । तुझेनि केलें काय होय ॥ ७१ ॥ श्रीसमर्थ सतीबाईसीं विनविती । दुःखशोक सांगा मजप्रती । जरी आह्मी केली शोकनिवृत्ती । तरी चित्तीं श्रीराम स्मरावा ॥ ७२ ॥ सतीनें अवलोकिले श्रीरामदास । ह्मणे जरी पुरतील माझे मनोरथ । तरी निश्चयें भजेन श्रीराघवास । हे सत्यसत्य भाष माझी ॥७३॥

तंव श्रीसमर्थें दिधलें अभिवचन । एकादश लोटतां दिनमान । गृहासि येतील तुमचे यजमान । श्रीरामध्यान धरोनि राहिजे ॥ ७४ ॥ इतुकें बोलोनि खर्डीपर्वतीं आले । नित्यनियमातें सारिले । उपरी अंतर्धान पावले । प्रगटले विजापूर दरबारीं ॥ ७५ ॥ वेषतरी साधारण । वृत्ती दाविली गुमास्तपण । उभे हिशेब किताब हातीं धरोन । पादशहा लागून मुजरा केला ॥ ७६ ॥ नामपुसतां सांगितलें दासोपंत । यजमान आमुचे बाजीपंत । कुळकर्ण लिखितां मी नेमस्त । चुकिताचें प्रायश्चित्त मजचि व्हावें ॥ ७७ ॥ आजि हिशेब आणिले शुद्ध करोन । ते एकवार पहावे निरखून । याउपरी पडेल कांहीं न्यून । देहदंडण मजचि व्हावें ॥ ७८ ॥ अश्चर्य जाहलें यवन कचेरीं । हिशेबीं चुकी नाडळेचि अणुभरी । मूर्ती पहातां चित्तचोरी । टकमक अंतरीं यवनांच्या ॥ ७९ ॥ न्यून नाहीं ऐसें कळलें । बाजीपंत बंधमुक्त केले । श्रीसमर्थसंगें मार्गस्थ जाले । शहापूरनिकट आले सुखसम्मेळीं ॥ ८० ॥ सुखदुःखाच्या गोष्टी केल्या । श्रीसमर्थें निजलीला गुप्त राखिल्या । बाजीपंतासी नाहीं उमगल्या साध्याभोळ्याला केंवि कळे ॥८१॥ शहापूर निकट येतांचि जाण । श्रीसमर्थ राहिले दिशेकारणें । बाजीपंत लगबगें आले गृहालागून । कुटुंब लेंकुरां देखोन समाधान पावले ॥ ८२ ॥ सतीबाई पुसे कैसी सुटका जाली । येरें दासोपंतकथा निवेदिली । तेणेंगुणेंचि सुटका कीर जाहली । आयुर्मर्यादा वाढली अकस्मात ॥ ८३ ॥ सतीबाई वदे न दिसती दासोपंत । येरु वदे येतील आतां त्वरीत । बहुकाळ लोटला वाट पहात । तरी तो दासोपंत नयेचि दृष्टीं ॥ ८४ ॥ रात्र सरली दिवस उगवला । परी दासोपंत नाहीं भेटला । सकळीं निराहार मांडिला । शोध मांडिला ठाईं ठाईं ॥८५॥ ह्मणती दासोपंत आलियावीण । आह्मां करणेंचि नाहीं भोजन । यापरी क्रमिल्या रात्री तीन । तंव कळक-

ळोन श्रीसमर्थें दृष्टांत दिधला ॥८६॥ तुह्मी हें काय आदरिलें । हें निर्वाण कोण मांडिलें । त्वरीत लेंकुरां जेववा पहिले । मग वहिलें भेटीसि यावें ॥ ८७ ॥ मी आहे चंद्रगिरीपर्वतीं । तुह्मी ह्मणीं यावें भेटीप्रती । ऐसा दृष्टांत सतीबाईप्रती । होतां चित्तांत गहिंवरली ॥ ८८ ॥ ह्मणे तोचि गोसावी पावला । आजवरी हा पुरुषार्थ नाहीं कळला । त्यासी म्यां मूर्खें अपराध जोडिला । कुशब्दें छळ केला नानापरी ॥ ८९ ॥ तो बोलिला अकराव्या दिवसीं । तुझ्या आणितों भर्त्यासीं । तें साच म्यां देखिलें प्रचीतीसी । धन्य त्या साधूसीं पूजीन आतां ॥ ९० ॥ परिवारें गेली चंद्रागिरी पर्वतीं । श्रीसमर्थ-चरणीं लोटांगणें घालिती । नाना प्रियभाषणें चमत्कृती । श्रीसमर्थ सतीबाईप्रती बोलिले ॥ ९१ ॥ श्रीसमर्थपूजाविधान जालें । उभयतां स्त्रीपुरुषें अनुग्रह घेतिलें । सतीबाईसी सिद्धसाहित्य दिधलें । नवल दाविलें उपासनेचें ॥ ९२ ॥ श्रीसमर्थ पात्रें वाढविती । भोजनासि आले श्रीमारुती । देखतां सती मूर्छित पडली क्षितीं । श्रीसमर्थ उठविती सांवरोनी ॥ ९३ ॥ प्रगट साधू कळला । सतीबाईचा भाव दृढावला । श्रीसमर्थचरणीं संसार अर्पिला । आग्रह धरिला गृहीं यावें ह्मणोनी ॥ ९४ ॥ शुद्धभावें श्रीसमर्थ बोलले । शहापुरा वसतीसि आले । तीन वरुषेंपर्यंत क्रमिले । वृक्ष लाविले ठाईं ठाईं ॥ ९५ ॥ नित्य कृष्णास्नान करणें । संध्यावंदन रामखडीं आचरणें । मसुरीं मधुकरीसी जाणें । भोजन सारणें शहापुरीं ॥ ९६ ॥ यापरी काळ क्रमिला । मग आज्ञा पुसती जावयाला । तेणें गहिंवर दाटला सकळांला । जावें ऐसा बोल न काढवे ॥ ९७ ॥ तंव श्रीसमर्थें केलें विंदान । उतरंडी टाकिती फोड फोडोन । विंचू-सर्प सोडिती अंतर्गृहालागून । तरीही सतीबाई लागून रोष नयेची ॥ ९८ ॥ लेंकुरां घेती चिमोरे । पाणियाचे फोडिती

रांजण डेरे । तरीही सतीबाईच्या अंतरें । खेद अणुभरें न सेविजे ॥ ९९ ॥ तंव कोणी एके दिनीं । श्रीसमर्थ बोलिले सतीबाई लागुनी । जे गृहभाग द्यावा निवडुनी । श्रीरघुनाथ-चिंतनीं बैसावया ॥ १०० ॥ तंव सतीबाई नम्रभावें बोले । देवा सकळ गृहचि आपुलें । आतां यांतुनी निराळें । मना आलें तेथें वसती कीजे ॥ १ ॥ श्रीसमर्थें देखिलें माजघर । रात्रींतूनि निर्मिला श्रीमहारुद्रवीर । भीममूर्ती साचार । ध्यान अरुवार आपणा ऐसें ॥ २ ॥ इकडे रवी उदय पावला । सतीबाई आली श्रीसमर्थवंदनाला । श्रीसमर्थें श्रीहनुमंत दाविला । नवलाव जाला सकळिकां ॥ ३ ॥ बाजीपंत नमनासि येती । तेही कौतुकें तटस्थ देखती । श्रीसमर्थचरणीं साष्टांगें लोळती । धन्य ह्मणती श्रीसमर्थलीला ॥ ४ ॥ श्रीसमर्थें उभयतांसीं पुसिलें । जें ध्यान कवणाऐसें देखिलें । तंव तिहीं श्रीसमर्थसदृश ह्मणितलें । ध्यानीं बिंबलें श्रीसमर्थ-रूप ॥ ५ ॥ श्रीसमर्थदेवें त्रिवार पुसिलें । तिहीं श्रीसमर्थस्वरूपाचि ह्मणितलें । तरी मग पूजा मूर्तिसीं भलें । आह्मासि वाहिलें जाणें कीं ॥ ६ ॥ आह्मी आलों धर्मसंस्थापणें । येथ गुंतलों संसारगुणें । हें ह्मणीं अंगा येईल उणें । श्रीराम-भजनीं विश्व अंतरेल ॥ ७ ॥ यापरी श्रीसमर्थ वदंती । आइकोनि सकळही विव्हळती । श्रीसमर्थ तयांसी वारिती । निग्रह चित्तीं दृढ गमनीं ॥ ८ ॥ निग्रह निर्वाण देखिलें । मग श्रीसमर्थ-पूजन आदरिलें । भोजनीं मिष्टान्नपदार्थ सिद्ध केले । निरोप दिधला थोर कष्टें ॥ ९ ॥ येच समईं थोरथोर । संत प्रगटले क्षितीवर । धर्मसंस्थापनेसीं लाविती हातभार । अविंध साचार मावळण्या ॥ १० ॥ श्रीवामन श्रीआनंदमूर्ती । तैसेचि श्रीजय-राम श्रीरंगनाथ गाजती । भागानगरस्थ श्रीकेशव प्रगटती । जडमूढांप्रती तारक ॥ ११ ॥ श्रीविठ्ठलें श्रीतुकयासी दृष्टांत

दिधला । श्रीसमर्थरामदास वायुतनय जाणविला । परस्पर भेटीं ब्रह्मानन्द दुणावला । धर्म गाजला परस्परीं ॥ १२ ॥ चंद्रभागाभिवरें वाळुवंटीं । श्रीतुकाराम ब्रह्मानंद वाटी । श्री-समर्थ रामदासीं होतां भेटी । आनंद कोटी दुणावला ॥ १३ ॥ चरित्रें निवेदिलीं परस्परीं । अवतारखूण बाणली अंतरीं । निर्भय निर्विकार क्रियाचारी । उपासनाधारी वर्तती ॥ १४ ॥ मग वंदूनि श्रीसमर्थचरण । श्रीतुकाराम आले देहू ठाकोन । संतसज्जनीं पुसिलें गमन । श्रीतुकारामीं श्रीसमर्थध्यान वर्णिलें ॥ १५ ॥

हुर्मुजी रंगाचा उंच मोतीदाणा । रामदासीबाणा या रंगाचा ॥ १ ॥
पीतवर्ण कांती तेज अघटीत । अवाळु शोभत भृकुटीमाजीं ॥ २ ॥
काष्ठाच्या पादुका स्वामीच्या पायांत । स्मरणी हातांत तुळशीची ॥
रामनाममुद्रा द्वादश हे टिळे । पुच्छ वळवळे कटीमाजीं ॥ ४ ॥
कौपीन परीधान मेखळा खांद्यावरी । तुंबा कुबडी करीं समर्थांच्या ॥
कृष्णातटाकासीं जाहलें दर्शन । वंदिले चरण तुका ह्मणे ॥ ६ ॥

अवधारा श्रीसमर्थ आले मसुरास । आरंभिलें श्रीरामनवमी-उत्सवास । श्रीरघुनाथरथ काढिला मिरवणीस । तंव डहाळी मार्गास आड आली ॥ १६ ॥ वृक्षडहाळी तोडणें । हें तंव ग्रामाधिकाऱ्या अधीन । तो तंव गर्वेंचि बैसला फुगोन । रथ तिष्ठोन राहिला ॥ १७ ॥ तेथ श्रीसमर्थें चमत्कार दाविला । कराडी हुजुरीं गुप्त प्रवेश केला । क्षणीं हुकूम लेहोन आणिला । प्रगट दाविला विश्वजना ॥१८॥ थक्कीत जाहले मसुरीचे जन । नवल सांगती परस्परांलागून । श्रीसमर्थें वृक्षावरी मूल चढऊन । उफराटा बैसऊन डहाळी काढविली ॥१९॥ तंव तेथ अघटीत घडलें । डहाळी समवेत मूल कूपांत पडलें । सकळ जन हळह-ळले । बोल लाविले श्रीसमर्थदेवा ॥ २० ॥ श्रीसमर्थ सांगती विश्वजना । मूल सुखरूप असे जाणा । मग निकट येऊनि हांक देती कल्याणा । वरी येईं जना सुखी करी ॥ २१ ॥ तो ओ

देताचि वरी आला। सकळलोकीं कल्याण देखिला। तधीं-पासोनि कल्याणपद पावला। प्रतापी गाजला पट्टाधिकारी ॥ २२ ॥ श्रीसमर्थ दरुषणा कारणें। सतीबाईसी नित्य मसुरासि येणें। नित्यनूतन कीर्तनश्रवण करणें। प्रसाद पावणें श्रीसमर्थजीचा ॥ २३ ॥ श्रीसमर्थदरुषणाविण। सतीबाईसी होय उबगवाणें। नित्य श्रीसमर्थगुणीं वेधणें। नित्य स्मरणें श्रीसमर्थनाम ॥ २४ ॥ धन्य ते सतीबाई पुण्यशील। जियेसीं श्रीसमर्थ जोडले अळुमाळ। जाहला प्रेम सुखाचा सुकाळ। धन्य काळ श्रीसमर्थभेटी ॥ २५ ॥ श्रीसमर्थ चिंतोनि पाय ठेवी। श्रीसमर्थस्वरूपीं विश्व भावी। श्रीसमर्थचिंतनें श्रेष्ठ पदवी। स्वात्मानुभवीं राहिजे ॥ २६ ॥ श्रीरामनवमीकारणें। सतीबाईसीं मसुरासि येणें। सहपरिवारेंसीं सादर होणें। सेवा करणें नानाविध ॥२७॥ उत्साव समाप्ती उपरी। परतोनि येती शहापुरीं। साष्टांगें श्रीसमर्थचरणावरी। सप्रेमभरीं लोळती ॥२८॥ तंव काय जाहलें हो नवल। नमन न करी सतीबाईचें मानस मूल। ह्मणे नमन केलियाचें फळ। निज निश्चळ कोण असे ॥ २९ ॥ जन पाहती कौतुकें। बाळ बोल बोलतसे कौतुकें। ऐसें न देखों मूल आणीक। बोल लटिके न ह्मणती कोणी ॥ ३० ॥ श्रीसमर्थदेवें मूल जवळी पाचारिलें। ह्मणती बाळा तुवां ह्मणितलें। तें आह्मी श्रवण केलें। तरी वहिलें आइकावें ॥ ३१ ॥ जरी टाकिसील ह्या कूपांत उडी। करूं तुज पाहिजे त्याची जोडी। यापरी श्रीसमर्थवचन निघतां तांतडी। बाळें धडाडी उडी कूपांत घेतली ॥ ३२ ॥ तंव एकाचि हाहाःकार जाला। जन ह्मणती व्यर्थ अविचार घडला। श्रीसमर्थ ह्मणती ह्मणीं लेंकुरें बोल आणिला। ह्मणतां घेतली निजांगें उडी ॥ ३३ ॥ जळीं लेकुरें देखिलें दिव्य सिंहासन। वरी श्रीसमर्थ विराजमान आपण। माळा मुद्रा जटाधारण। दिव्याभरणें विराजीत

॥ ३४ ॥ गोपीचंदनाची उटी । तुळशीमाळा विराजीत कंठीं । श्रीरामनामाचा ध्वनी कर्णपुटीं । अती निघोटी ऐकतसें ॥ ३५ ॥ बाळें वंदिले श्रीचरण । अनन्यभावें घातिलें लोटांगण । अनुग्रह प्रसाद पावोन । ब्रह्मानन्द पूर्ण बिंबला ॥ ३६ ॥ उपरी उभयतां आले वरी । जन देखती हरुषभरीं । श्रीरामनामाचा गजर भारी । भक्त प्रेमपडिभरीं गर्जिन्नले ॥ ३७ ॥ तेचि प्रसिद्ध भीमाजी महंत । अधिकारी जाले श्रीसमर्थसेवकांत । उदंड गाजले कीर्तिवंत । सतीबाई सान्निध्यांत परमपद पावले ॥ ३८ ॥ देवें मसुरासी नवमीउत्साव केलें । तेथ श्रीमहारुद्र संस्थापियले । बहुविधजन भजनीं लाविले । उपरी आदरिलें प्रयाणासीं ॥ ३९ ॥ सहज लीले हिंडत फिरत । श्रीसमर्थ आले चाफळखोऱ्यांत । हे नेमिली कर्मभूमी विख्यात । महिमा अत्यंत स्थळ विशेषीं ॥ ४० ॥ धन्य तें चाफळीं वृक्षपर्वत । धन्यधन्य तेथील पक्षिजात । धन्यधन्य ते आसमतांत । चाफळखोऱ्यांत वस्तुजात विचरती ॥ ४१ ॥ परमपावन ते भूमी । जेथ विराजिले श्रीसमर्थस्वामी । नानावैभव संभ्रमीं । चाफळग्राम विराजिलें ॥ ४२ ॥ नेणों कोण भूमीचें पुण्य । जेथ लागले श्रीसमर्थचरण । श्रीरामनामें करोन । वैकुंठभुवन प्रत्यक्ष जालें ॥४३॥ अमरावतीचें वैभव । चाफळीं कोंदलें स्वयमेव । नाना संतमहंत समुदाव । निजवैभवें ठाकोनि आले ॥४४॥ श्रीरामदासमहंती गाजली । कीर्ति चहुंकडे विखुरली । भाविकासीं मोकळीवाट फुटली । शोधीत आले श्रीरामदास ॥ ४५ ॥ कोणी महासिद्ध प्रगटला चाफळीं । हेचि मात जनीं रूढली । दरुषणाकारणें उत्कंठीत जाहली । धाधावली निशिदिनीं ॥४६॥ श्रीसमर्थे उपासनासामर्थ्य दाविलें । महंत शिष्य मेळविले । भजन उपासनेसी वृद्धिंगत केलें । स्थळ शोधिलें चाफळीं ॥४७॥ चाफळग्रामाधिकाऱ्यासी । देवें मागीतलें स्थळासीं । तिहीं दा-

विलें स्मशानभूमीसीं । श्रीसमर्थमानसीं मानवलें ॥ ४८ ॥ नाहीं कळला श्रीसंतमहिमा । ते नर कासया आले हो जन्मा । पाहुणेर केवळ यमधर्मा । अधमाधम नरकासि जाती ॥ ४९ ॥ तिरस्कारें साधूसि लेखून । स्मशानभूमीसी दिधलें दान । देवें तेंचि श्रेष्ठ ह्मणोन । मठ संस्थापन आदरिलें ॥ ५० ॥ आपुला शिष्यसमुदाय बोलाविला । समूळ पाषाण गोटा काढविला । तंव तेथ एक चमत्कार घडला । समंध प्रगटला स्मशानीं ॥५१॥ श्रीसमर्थसंन्निध प्रगटोन । ह्मणे देवें मज न द्यावें जी भिरकावोन। निश्चयें निरुपद्रत्वें राहेन । देवें मज लागोन जीवदान द्यावें ॥५२॥ श्रीसमर्थ ह्मणती हें तंव न घडे । तुजसी आह्मा सख्यत्व केंवि जोडे । विघ्नराज तूं दुघड । स्त्री बाळें बापुडे तूं पीडिसील ॥५३॥ बहुत विनविल्या वरी । देवें राखिला मठाशेजारीं । दधिभात दिधला रथोत्सवाउपरी । अद्यापवरी नेम चालविला ॥ ५४ ॥ श्रीसमर्थदेवें मठ स्थापिला । भजनमार्ग सुगम केला । श्रीरघुनाथउत्साव चालविला । अनुपम सोहळा मृत्यलोकीं ॥ ५५ ॥ श्रीसमर्थचित्ता आलें । जे श्रीरघुनाथ पाहिजे संस्थापिले । पाथरवटासीं पुसिलें । अवधी बोलिले वरुष एक ॥ ५६॥ श्रीसमर्थ श्रीरघुनाथ इच्छा बोलिले । उपरी पर्यटण आदरिलें । झणीं अंगापुर शिवस्थानीं आले । ध्यानस्त बैसले क्षण एक ॥ ५७ ॥ श्रीरघुनाथध्यान धरितां । ध्यानीं प्रगटली दृष्टांत वार्ता । मज श्रीरघुपतीसीं वरी काढी आतां । भाग्यवंता रामदासा ॥५८॥ तंव श्रीसमर्थें तत्काळ तेथें । उडी घेतली डोहाआंत । वरी घेवोनि आले श्रीरघुनाथ । स्वरूप अत्यंत साजिरें ॥ ५९ ॥ श्रीरघुनाथ कोदंडधारी । श्रीसमर्थ देखती डोळांभरी । सवेंचि घालोनि झोळीभीतरीं । मार्ग सत्वरीं आक्रामिला ॥ ६० ॥ गुराखियांनीं कौतुक देखिलें । तें धांवोनि गांवलोकां निवेदिलें। ग्रामस्त तत्काळ तेथ पातले । कठिणोत्तर बोलिले स्वामीप्रती

॥ ६१ ॥ ह्मणती स्वामी तुह्मी हें काय मांडिलें । आमुचे मूर्तीसीं कासया चोरिलें । निजपूर्वजीं डोहीं सांठविलें । तें तुह्मी हरिलें गुप्तत्वें ॥ ६२ ॥ तरी आतां बऱ्या बोलें । मूर्तीसी पाहिजे दिल्हें । श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । तळीं ठेविलें मूर्तीसीं ॥ ६३ ॥ देवें जन निरोप घेतला । ठाकोनि आले चाफळीं मठाला । जनलोकीं बहु यत्न केला । मूर्ती न्यावयाला नगरासी ॥ ६४ ॥ बहुतीं बहु यत्न केले । बळी बळिवंतही थकले । बहु वृषभही लाविले । नाहीं चळले श्रीरघुनाथ ॥६५॥ नाना यत्न केले । ते ते सकळ वायां गेले । लज्जीत मानसीं हिरमुसले । शरण आले श्रीसमर्थ देवा ॥ ६६ ॥ ह्मणती स्वामी श्री गोसावियां । आजि अनन्य शरण आलों पायां । तुह्मी समर्थस्वामी क्षमा करावया । ह्मणोनि पायां लागती ॥ ६७ ॥ आह्मी कुणबी जातीचे हीन । आह्मासि नाहीं शुद्धज्ञान । अन्याय अपराध दारुण । पोटीं घालोन क्षमा कीजे ॥ ६८ ॥ धांव धांवोनि लागती चरणीं । अश्रुपूरें भिजविती धरणी । श्रीसमर्थस्वामी करुणारसें द्रवले मनीं । जनांलागून अभय दिधलें ॥ ६९ ॥ उपरी भानजी शिष्य पाठविले । श्रीरघुनाथ झोळींत आणविले । चाफळीं समारंभेसीं संस्थापियेले । उत्साव गाजविले श्रीरामनवमी ॥ ७० ॥ चालिला नवमीउत्साव । विस्तार पावला महंतसमुदाव । लाजिन्नले स्वर्गींचे अमरादिदेव । धन्य वैभव मृत्यलोकीचें ह्मणती ॥ ७१ ॥ अंगापुरस्थ जनीं सेवाधिकार चिंतिला । देवें उत्सवीं ध्वजसंकेत निवेदिला । तधींपासोनि नेम चालत आला । विश्वजन देखती डोळां अद्यापवरी ॥ ७२ ॥ श्रीसमर्थ सेवेकारण । अक्का आलीसे शरण । पदवी पावली असाधारण । कृपा पूर्ण श्रीसमर्थरायाची ॥ ७३ ॥ साधुसज्जन मिळाले । श्रीसमर्थचरणीं विनटले । करवीरप्रांतीं मंगळ भरलें । संत गाजले श्रीरामदास-

स्वामी ॥ ७४ ॥ कीर्ती प्रगटली दूरवर । श्रीसमर्थासीं जाणती सानथोर । शोधीत येती गिरीकंदर । घोष अपार श्रीरामनामीं ॥ ७५ ॥ श्रीसमर्थें महंत पढविले । दूरदेशीं पाठविले । जडमूढ-प्राणी उद्धरिले । शोध घेतले गुप्त कार्यें ॥ ७६ ॥ श्रीसमर्थ मिरजेसि आले । नगरीं भिक्षामिसें प्रवेशले । तंव देशपांडि-यांचें गृह आलें । दृष्टीं न्यहाळिलें वेणाईसीं ॥ ७७ ॥ जयजय-श्रीरघुवीर । आइकोनि वेणाई धांविन्नली अतिसत्वर । साधु-चरणीं घातिला नमस्कार । ध्यान अंतरीं ठसावलें ॥ ७८ ॥ श्रीसमर्थदेवें नवल केलें । तुंबाभर दुग्ध द्यावें ह्मणितलें । ह्मणी सासवेनें अव्हेरिलें । उपाव न चले वेणाईचा ॥७९॥ श्रीसमर्थ-ध्यान जडलें मानसीं । डोळा तेंचि बैसलें दिवसनिशीं । तेंचि पहावया कासाविशी । उकसाबुकसी स्फुंदत ॥ ८० ॥ विरहें विव्हळली अंतरीं । ह्मणे तो साधु कई देखेन डोळांभरीं । सद्गदीत रोमांच थरारी । झुरे अंतरीं वेल्हाळी ॥ ८१ ॥ पाय ठेवितां धरणी । श्रीसमर्थ आठवी वेणी । नवस मांडिले अनुदिनीं । श्रीसमर्थ नयनीं पहावया ॥ ८२ ॥ तंव एके दिनीं । वेणाई बैसली वृंदावनीं । श्रीनाथभागवतपठणीं । पारायणीं विन-टली॥८३॥ तंव अकस्मात प्रगटले श्रीसमर्थ । वेणाईसीं पुसती ग्रंथार्थ । येरी वदे मी केवळ असमर्थ । ग्रंथार्थ मी काय जाणें ॥ ८४ ॥ सर्वेचि नम्रपणें । श्रीचरणीं घाली लोटांगण । नम्रत्वें पुसिले कांहीं प्रश्ण । श्रीसमर्थें संतुष्ट होवोन सोडविले ॥८५॥ वेणाबाईवरी कृपा केली । श्रीरामीं वृत्ती रंगविली । परम-पदाची सोय दाविली । आपदा हरली जन्ममृत्यु ॥८६॥ वेणा-ईनें निकटवास चिंतिला । देवें अवकाशसंकेत जाणविला । लौकिकीं जनापवाद रूढला । संसारियांसीं तेंचि गमे ॥ ८७ ॥ कठिण विषम काळ । ह्मणीं निवारी तमाळनीळ । अतिस्नेहाळु भक्तप्रणतपाळ । हृदय कोंवळें श्रीरामाचें ॥ ८८ ॥ अल्पकाळेंचि

श्रीसमर्थ आले। वेणाईसीं चाफळीं नेलें। भक्तिवैराग्य विशेष गाजलें। महिमान गाजलें वेणाईस्वामीं ॥ ८९ ॥ श्रीनामयाची जनाई। श्रीसमर्थीं तैसीच वेणाई। संत महंतांच्या हृदईं। अत्यंत लाजवी विरक्तभावें ॥ ९० ॥ इतरत्र बहुविध स्त्रिया। संसारीं शिणविती काया। श्रीहरिचरणीं विनटावया। नेणती उपाया मंदत्वें ॥ ९१ ॥ धन्य ते वेणाई धन्य ते महंत। जया सांगाती श्रीस्वामीसमर्थ। पडों नेणती माया मोहांत। धन्य पुरुषार्थ श्रीरामीं ॥ ९२ ॥ श्रीसमर्थकीर्ती विस्तारली। दूर दिगंतरीं गेली। भक्तमंडळी विस्तार पावली। मही मंडळीं श्रीराम आला ॥ ९३ ॥ श्रीसमर्थें टाकळीं पत्र लिहिलें। उद्धव-गोसाविया आणविलें। पंचवटींतील बंधुवर्गासी नमिलें। स-ख्यत्व विस्तारिलें दूरवरी ॥ ९४ ॥ श्रीसमर्थस्वामींनीं पत्रार्थ लिहिलें। तें श्रोतीं पाहिजे श्रवण केलें। धन्य मूळपत्रार्थ लाध-लें। भाग्य फळलें श्रोतयां वक्तयांचें ॥ ९५ ॥

श्रीसमर्थ पत्र

जनस्थान गोदातटीं। परम पावन पंचवटी।
जेथें पडिली कृपादृष्टी। रघोत्तमरायाची ॥ १ ॥
तेथील रामउपासक। त्यांच्या सेवकांचा सेवक।
तुह्मामध्यें मी एक रंक। सरतें करावें ॥ २ ॥
तुह्मी निकट देवापासीं। आणि मी पडिलों दुरीदेशीं।
कृपाळूपणें रघुनाथासीं। माझी करुणा भाकावी ॥ ४ ॥
ह्मणावें ते अनाथ। समर्था तूं दिनानाथ।
ह्मणावें ते पतीत। देवा तूं करुणाकर ॥ ४ ॥
ह्मणावें ते परम किंकर। देवा तूं करुणाकर।
ह्मणावें ते निराधार। आधार इच्छी ॥ ५ ॥
सत्य मिथ्या तुह्मा ह्मणवी। त्याची चिंता असों द्यावी।
ऐसी करुणा करावी। नाना प्रकारीं ॥ ६ ॥
तुह्मां दासामध्यें मी हीन। माझे कोट्यावधी अवगुण।
परंतु आहे अनन्य। सेवक रघुनाथाचा ॥ ७ ॥
पुढें स्यां ऐसेंचि असावें। माझें मन न पालटावें।
इतुकें देवासीं मागावें। तुह्मी बंधुवर्गीं ॥ ८ ॥

प्रत्यहीं माझा नमस्कार। देवासीं करावा निरंतर।
मजकारणें शरीर। इतुकें कष्टवावें ॥ ९ ॥
बाळ वृद्ध नरनारी। सकळ भक्त कुमार कुमारी।
समस्तासीं नमस्कारी। कृष्णातीरवासी ॥ १० ॥
शुद्धउपासना विमळज्ञान। वीतरागी आणि ब्राह्मण्यरक्षण।
गुरुपरम्परेचें लक्षण। शुद्धमार्ग ॥ ११ ॥
ऐसें पंचधा बोलिलें। इतुकें पाहिजे यत्नें केलें।
ह्मणिजे सकळही पावलें। ह्मणे दासानुदास ॥ १२ ॥

आईका ठांई ठांई मठ स्थापले। ठांईठांई संत मेळविले। ठांई-ठांई चमत्कार केले। अपण राहिले गुप्तत्वें ॥ ९६ ॥ खणाळ्या-मध्यें राहती। यात्रा देवाची पाहती। ज्या त्या मुखीं हेचि वदंती। जाती शोधिती श्रीसमर्थदेवा ॥ ९७ ॥ विशेष श्रीराम-उपासना। भेदोनि चालविली गगना। कलियुगीं प्रगट दाविला श्रीरामराणा। वैकुंठ ठेंगणें केलें जी ॥ ९८ ॥ आपण गुप्तत्वें राहे दुरी। कार्य साधिती वरिच्या वरी। मोठमोठ्यां ठक पडिलें अंतरीं। धन्य महीवरी श्रीरामदास ॥ ९९ ॥ श्रीराम-दासें चरित्र केलें अनुपम। तो कथा भाग अतिदुर्गम। मज नेणवे गुह्यातीत संभ्रम। कथा उत्तमोत्तम श्रीसमर्थरायाची ॥ २०० ॥ श्रीसमर्थरामदासचारित्र शोधूं गेले। तेथ थोरथोरां ठक पडिलें। त्या मज पामराचें काय चाले। निज तान्हुलें श्रीसमर्थजीचें ॥ १ ॥ हा हो जी आवडीच्या गुणें। बिसा-टचि निघती वचनें। नेणवे प्रिय जाहलीं कवण्या गुणें। सहजीं सहजपणें चरित्र जालें ॥ २ ॥ श्रीरामदासकथासारामृत। साव-धान संत श्रोते परिसोत। श्रीधरचरणीं भिमू विनवीत। निज-कृपामृत तुमचें हें ॥ ३ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत भिमू-विरचितं धर्मसंस्थापनार्थस्थळनिश्चयनाम नवम प्रसंग सम्पूर्ण॥

॥ एवं वोवीसंख्या २०३ ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १० वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



रामदास प्रगट जनीं । रामदास व्यापक त्रिभुवनीं । रामदास कोंदला जनीं विजनीं । रितें स्थळ नयनीं आढळेना ॥ १ ॥ जीव अज्ञान अंधःकारें । गजबजलीं एकसरे । भ्रांती बळियाढ काविरे । साचोकारें प्रतीतीसि नये ॥ २ ॥ साधनाचा तिटकारा । वृथाभिमान भरला वारा । शुद्ध सात्विकाचा उबारा । पुरा पुरा घोटिती ॥३॥ भाविकांसी फावला एकांत । कृपें बोळला श्रीगुरुनाथ । श्रीसमर्थस्वरूप नितांत । प्रत्यक्ष हृदयांत उजळलें ॥ ४ ॥ धन्य धन्य हे रसना । रंगली श्रीसमर्थगुणवर्णना । धन्य धन्य ह्मणों या चरणा । श्रीरामदाससदना धांवली ॥ ५ ॥ धन्य धन्य ह्मणों हे कर । लिहिती श्रीसमर्थगुणअक्षर । धन्य चि जालें जी कलेवर । उघड समाधी निरंतर श्रीसमर्थ स्वरूपीं ॥ ६ ॥ आजि स्वानंदाची पूर्णरासी । श्रीसमर्थ पहुडले शेजेसीं । नेणवे आतां दिवसनिशी । सर्व काळेंसी अनुभवी ॥ ७ ॥ त्रिभुवन ठेंगणें जालें । श्रीरामदास सदनीं आले । पापताप सकळ मावळलें । विश्व धवळलें मंगळरूप ॥ ८ ॥ आतां आणीक नेणों उद्दीम । वाढलासे चरित्रउद्दीम । येणें एकें पुरतील मनोधर्म । उत्तमोत्तम श्रीसमर्थ बोळला ॥ ९ ॥ श्रीरामदासचरित्र जालें उदंड । बोलूं नेणें शेषाचेंही तोंड । तेथ मज पामराचा पाड । कथा अवघड काय बोलूं ॥ १० ॥ परी श्रीसमर्थस्वामी तुष्टला । माझा अभिमान त्यासीं लागला । हृदईं येऊनि बैसला । चरित्रबोला

बोलवितसे ॥११॥ करूनि श्रीरामदाससचिंतन । वंदूनि सकळ संतसज्जन । चालऊं पुढें कथानुसंधान । परमपावन सुखकारी ॥ १२ ॥ मही उद्धराया कारणें । शिवरायासीं अवतरणें । भूतमात्रासीं सौख्य पूर्ण देणें । धर्म संस्थापणें नानापरी ॥ १३ ॥ धर्मासी ग्लानी चढे । महीं विशेष पाप वाढे । पापिष्ठ थैकारती संतांपुढें । तैं बाडेकोडे महाभाग येती ॥ १४ ॥ शिवरायास ह्मणों नये साधारण । शिवरायास पाहों नये न्यून । शिवराय ह्मणों नये सामान्य । धर्मसंस्थापनकार्यकर्ता ॥ १५ ॥ शिवराय ह्मणों नये मानव । प्रत्यक्ष परमात्मा स्वयमेव । लीला नाटकी हाव भाव । कार्य गौरव दाखवी ॥ १६ ॥ मानवी ह्मणोन कार्य साधिलें । जन अघवेचि झकविले । जनीं नाहीं प्रगट कळलें । शिवराज अलुमाळ महाभाग ॥ १७ ॥ जन्म घेतिला क्षत्रिय कुळीं । यवनासवें घेतली हातोफळी । गुढी उभाविली महीमंडळीं । पिटिली टाळी सुरवरीं ॥ १८ ॥ कार्याकारण भावें । श्रीशिवरायें श्रीगुरु शोधावे । नाना साधुसंतासीं नमावें । पुनीत व्हावें चरणधुळी ॥ १९ ॥ नित्य नूतन हिंडावें । अधर्मतेसी दंडावें । गोब्राह्मण पूजावे । भजन करावें नित्यनेमें ॥ २० ॥ अधर्मे पीडिली देखतां धरा । येणें शिव-रायासि होय उबारा । प्राण निघों पाहे पुरा । जन दुस्तरा देखोनी ॥ २१ ॥ अंगीं तेजस्विता भारी । पुरुषार्थी संवगडे मेळविले परोपरी । धर्मसंस्थापनकार्य आदरी । घरोघरीं जाण-विलें ॥ २२ ॥ दादोजी शिक्षागुरू तुष्टला । त्यासीं बाळपुरु-षार्थ मानला । प्रसन्नचित्तें असीर्वाद बोलिला । राज्यधर मुला होसी ह्मणोनी ॥ २३ ॥ माता जिजाई भली । सुपुत्र ऐसा प्रसवली । येणें धरा पवित्र केली । होळी जाहली अध-र्माची ॥ २४ ॥ शिउबा अत्यंत सुलक्षणी । विनटे साधुसंत भजनीं । प्रेम जडलें नामस्मरणीं । पवित्र करणी शिउबाची

॥ २५ ॥ वयोमर्यादा वाढली । कार्यक्षेत्रें दुणावलीं । शूर पुरुषार्थ मांदी मेळविली । मही दणाणिली पुण्यपुरुषार्थें ॥ २६॥ ह्मणती अधर्म अंधःकार गेला रे गेला । पुण्य परमात्मा शिवसूर्य उदय पावला । येणें आमुचा दुःख परिहार केला । विश्रांती पावला जीव येणें ॥ २७ ॥ उदंड यश आयुष्य व्हावें शिवरायासीं । तो निरसिता आधिव्याधीसीं । जन अशीर्वचनें बोलती ऐसीं । शिवराय दिवसानिशीं सकळ स्मरती ॥ २८ ॥ राय दुर्गावरी । शिवरायासि वास्तव्य निरंतरी वैरी तिष्ठती पाळतीवरी । नाशकरावया निरंतरी वाट पाहती ॥ २९ ॥ हरि-कीर्तनाकारणें । शिवरायासि वारंवार पुण्यनगरीं येणें । प्रसाद तीर्थ ग्रहण करणें । परतोनि जाणें निजस्थळा ॥ ३० ॥श्रीतु-काराममहिमा वाढला । शिवरायश्रवणीं पडला । अति आदरें लोटांगणीं वंदिला । धन रत्नें पाठविलीं बहुमूल्य ॥ ३१ ॥ ताटीं बहुमोल रत्नें भरुनी । शिवराय । पाठवी श्रीतुकया लागुनी तंव तो विरक्त साधु न पाहे दृष्टी भरूनी । श्रीविठ्ठलभजनीं विनटला ॥ ३२ ॥ श्रीतुकाराम ह्मणती प्रधान पंताला । हें वैभव न सरे जी आह्माला । भूपें झणीं न लागावें आमुचे छंदाला । जोग दिधला श्रीविठ्ठलें आह्मां ॥३३॥ देवें आह्मासि करोनि भिकारी । संसार निपटिला वरिच्चे वरी । वैराग्य गळां बांधोनि दोरी । निजनाम गजरीं गर्जविलें ॥ ३४ ॥ आमुचा देहभाव हरपला । श्रीविठ्ठलीं विनटला । बोल बोलूनि अबोला । देह विकिला श्रीविठ्ठलीं ॥ ३५ ॥ श्रीविठ्ठलाचें नाम । हाचि आह्मा परम धर्म । श्रीविठ्ठलाविण नेम । होय अधर्म आह्मासीं ॥ ३६ ॥ तुह्मी सांगा पुण्यशीळ राजा । ह्मणावें पडों नको आमुचे काजा । हा अर्थलोभ सहजा । सहजीं सहजा उडोनि गेला ॥ ३७ ॥ द्रव्यदाना कारण । यासीं अधिकारी ब्राह्मण । जे करिती अन्नसंतर्पण । सहस्रभोजनें ठाईं ठाईं ॥ ३८ ॥ मी

१५

हीन कुळजातीचा । हा अर्थभाग मज कैंचा । भाव कळला शिवरायाचा । तो साधुसंतांचा कैवारी ॥ ३९ ॥ धन्य भाव शिवरायाचा । ज्यासीं अभिमान साधुसंतांचा । धन्य धन्य ज्या त्या मुखींचा । यशकीर्तीचा धन्यवाद गाजे ॥ ४० ॥ नर नारी पुरुष । गाती वर्णिती शिवराज यश । धन्य ह्मणती क्षत्रियावतंस । परम पुरुष शिवराज जन्मला ॥ ४१ ॥ तरी तुह्मी सुज्ञ प्रधान । हें दान करावें मोरया लागोन । करूं नये अनमान । अधिकारी पूर्ण तेचि यासी ॥ ४२ ॥ ते मोरयासीं दान देवविलें । श्रीतुकारामवैराग्य गाजलें । प्रधानपंता हातीं पत्र पाठविलें । असिर्वाद दिधले शिवकल्याण राजा ॥ ४३ ॥ आइका श्रोते भाविक । काय वर्तलें नवल कवतुक । कीर्तनीं प्रगटला यदुनायक । शिउबा निःशंक निजांगें जाहला ॥ ४४ ॥ एकवार पुण्यनगरीमाजीं । श्रीतुकयानें कीर्तन आदरिलें सहजी । तें श्रवण करावया शिवाजी । जनसमाजीं पातले ॥४५॥ शिवरायावरी पाळती दारुण । पाळतीयासीं बिंबलीसे खूण । जे कथाकीर्तनावांचून । हातालागून शिवराज नये ॥ ४६ ॥ तिहीं गुप्त सुगावा घेतला । जे शिवराज कीर्तनीं बैसला । अति लागवेगीं वेढा दिधला । श्रोते दचकले भयाभीत ॥४७॥ शिवराज वदे स्वामी आइकावें वचन । मजकारणें कीर्तनीं वोढवलें हें विघ्न । मी क्षणीं जातों उठोन । निर्भयें करोन करा कीर्तन तुह्मी ॥ ४८ ॥ तंव तो तुका कठिण वैष्णव संत । कळिकाळांही भीक न घालीत । तेथ यवन बापुडे धाक दावीत । हें चित्तांत न गणी तो ॥ ४९ ॥ शिवरायासीं वारिलें आग्रहीं । ह्मणती भयासी कारण नाहीं । कीर्तनीं विघ्न कैचें काई । ठाईच्या ठाईं मावळे ॥ ५० ॥ मग बोलिले निर्वाण वचन । आइका श्रोते सज्जन । कीर्तन मर्यादा ऊणखूण । सावधपणें श्रवण करा ॥५१॥

साता दिवसांचा झाला उपवासी । तरी कीर्तनासी सांडू नये ॥१॥
फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सांडू नये ॥ २ ॥

शरीराचे होत जरी दोन भाग । कीर्तनाचा रंग सांडू नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव वसे ॥ ४ ॥

इतुकें बोलोन गजर केला । श्रीविठ्ठल विठ्ठल ध्वनी गाजला । टाळमृदंगीं ध्वनी लोपला । देहभाव हरपला पांडुरंगीं ॥५२॥ इतुकियामाजीं नवल वर्तलें । श्रीविठ्ठलें शिवराजरूप धरिलें । अश्वावरी स्वार होवोन धांवले । यवनां भुलविलें एकसरां ॥ ५३ ॥ बहु दूर नेलें भुलवोनी । गारीं गडदरीं रडविलें अरण्यीं । तयांची हाक बोंब नायकेचि कोणी । चुकलों ह्मणोनी तोबा तोबा करिती ॥ ५४ ॥ येरीकडे कीर्तन गजर चालिला । तुका कीर्तन रंगीं रंगला । श्रोतयां देह भाव हारपला । शिवभूप गेला समाधि शेजे ॥ ५५ ॥ आरिष्ट टळलें एकसरा । श्रीतुकारामीं भाव जडला पुरा । ह्मणे येथोनि पुरे राजशकट पसारा । भूप एकसरा वीतरागी जाहला ॥ ५६ ॥ श्रीतुकारामसेवाकर जाहले । सकळ राजचिन्ह अव्हेरिलें । एकाकी अरण्यवासी जाहले । अलंकार त्यागिले नानाविध ॥ ५७ ॥ जिजाईमनीं नवल जालें । ह्मणे एकाकी देवकार्य अंतरलें । हें श्रीतुकयासि नाहीं कळलें । ऐसें ह्मणों नये वहिलें एकाकी ॥ ५८ ॥ माता जिजाई आली सहपरिवार । श्रीतुकयासि करी नमस्कार । नम्रपणें ह्मणे स्वामी तुह्मी दयाकर । कार्य कार्यांतर तुह्मी जाणा ॥ ५९ ॥ तुह्मी तरी त्रिकाळज्ञ स्वामी । परब्रह्मस्वरूपविश्रामी । दीन रंक बापुडे आह्मी । विनवणी संभ्रमीं करीतसों ॥ ६० ॥ श्रीतुकयानें जिजाईसीं देखिलें । अति निकट सन्निध बैसविलें । धर्मसंस्थापना कार्य विचारिलें । शिउबासि पाचारिलें सन्निध ॥ ६१ ॥ मग गीतार्थ काढिला । शिवभूप नानापरी बोधिला । अवतार संकेत जाणविला । श्रीगुरू सांगितला श्रीरामदास ॥ ६२ ॥ ह्मणती बापा भूपा तूं पुण्यशीळ । तुजलागीं श्रीगुरू

नेमिला श्रीरामदास निर्मळ। तो प्रगटला श्रीमारुति अवतार केवळ। तुंवा अलुमाळ शरण त्यासि जावें ॥ ६३ ॥ शिवरायानें श्रीतुकयासि वंदिलें। उपरी सहपरिवार स्वस्थळा आले। उपरी कुळदैवतेसी पूजिलें। सोहळे केले यथाविधी ॥ ६४ ॥ रात्रौ ध्यानस्तवृत्ती लाविली। भगवती हृदईं प्रगटली। श्रीगुरू श्रीरामदास खूण बोलिली। गुप्त जाली श्रीफळ देउनी ॥ ६५ ॥ श्रीरामदास मारुति अवतार। तो प्रगटलासे महीवर। तूं शरण होई त्यासीं सत्वर। भगवती वर वदोनि गेली ॥६६॥ शिवरायासि लागलें श्रीसमर्थध्यान। चित्त निर्बुजलें कार्यांतून। कईं घडेल त्या साधूचें दर्शन। अत्यंत तळमळोन चित्त वेधलें ॥६७॥ श्रीभगवती वंदूनि शिवराज उठिला। माता जिजाईसीं भेटला। इत्थंभूत दृष्टांत निवेदिला। जिजाईसीं जाहला आनंद भारी ॥ ६८ ॥ माता जिजाइसीं नमिलें। श्रीसमर्थदर्शनीं प्रयाण आदरिलें। कृष्णावेणीतट ठाकोनि आले। संत पूजिले नानाविधी ॥ ६९ ॥ साधुमुखीं वार्ता आइकिली। जे श्रीसमर्थ वसती चाफळीं। तैसीच सडी स्वारी चालिली। ठाकोनि आले चांफळा ॥७०॥ मठीं प्रवेश केला। शिष्यसमुदाव विलोकिला। श्रीरघुनाथ साष्टांगेसीं अभिवंदिला। शिवराय गहिंवरले हर्षरोमांचित ॥ ७१ ॥ श्रीशिवरायआगमन आइकोनी। नरसोमलनाथ आले धांवोनी। अति विनीत भावें मुजरा करोनी। स्वामी लागोनि सुखासन दिधलें ॥ ७२ ॥ नरसोमलनाथ परम भक्त। श्रीस्वामीसेवेसी अत्यंत रत। निजांगें सुभेदार चाफळखोऱ्यांत। शिवरायाचे अंकीत राजकारणीं ॥ ७३ ॥ श्रीशिवरायें श्रीरघुनाथ दर्शन केलें। सभोंवार देवालया प्रदक्षिणा करोनि आले। मनीं परम विस्मय पावले। जें घडलें नाहीं कांहींच दास्य ॥ ७४ ॥ श्रीरघुनाथदेवालय जालें। आह्मांसि कांहींच नाहीं घडलें। मनीं अत्यंत खेद पावले। नरसोमलनाथासि पुसिलें

विस्मयें करोनी ॥ ७५ ॥ तंव विठ्ठलगोसावी पुढें सरसावले । ह्मणती नव्हे जी हें तुमचेंचि केलें । लटिकें ह्मणाल तरी आइका वहिलें । कैसें घडलें वर्तमान ॥ ७६ ॥ गिरी गोसावी हिंडत फिरतां । पुण्य नगरीसीं आले अवचिता । आपुले उपाध्ये यांचे गृहीं असतां । हरिकथा तिहीं आदरिली ॥ ७७ ॥ ते काळीं हरिकथेकारण । आपणासि घडलें तेथ आगमन । कथाश्रवणीं परम संतुष्ट होवोन । तीनशे होन समर्पिले ॥ ७८ ॥ तंव गिरीगोसावी बोलिले । जे आह्मी विरक्त साधू भले । आह्मासि द्रव्य कोण उपेगा आलें । इच्छा तरी पाठवावें चाफळीं ॥ ७९ ॥ पवित्र चाफळखोऱ्यांत । श्रीरघुनाथदेवालय करविती श्रीसमर्थ । उपेगा येईल पुण्यकार्यांत । तें त्वरीत आपण पाठविलें ॥ ८० ॥ याकारणें तुह्मी पाठविलें । कांहीं भक्तगणींही भरी घातिलें । ऐसें हें श्रीरघुनाथ देवालय । तुह्मी शोभविलें निज निष्ठें ॥ ८१ ॥ तईं श्रीशिवरायासीं स्मरण जालें । तीनशे होन होते पाठविले । उपरी सातशें होन काढिले । नरसोमलनाथासि निवेदिलीं नूतन कार्यें ॥ ८२ ॥ नरसोमलनाथाप्रती । श्रीशिवराय कार्य निवेदिती । साकू बांधोनि वोढा फिरवा ह्मणती । महाद्वाराप्रती भव्याकार सांगितला ॥ ८३ ॥ मठीं श्रीप्रसाद सेविले । नरसोमलनाथआदरातिथ्य ग्रहण केलें । उपरी श्रीसमर्थदर्शनार्थ प्रयाण आदरिलें । शोध घेतले बहुपरी ॥ ८४ ॥ श्रीसमर्थ रामदासाविणें । शिवरायासि होय उबगवाणें । श्रीसमर्थ रामदासाविण साजणें । तिहीं त्रिभुवनीं दिसेना ॥ ८५ ॥ कंठीं प्रेम दाटलें फार । कम्प रोमांच शरीर थरथर । वाणी गर्जवी श्रीरघुवीर । श्रीसमर्थदातार स्मरे क्षणक्षणां ॥ ८६ ॥ श्रीसमर्थ स्मरोनि चरण चाली । वाचा श्रीरामनामीं रंगविली । श्रीसमर्थ विरहें देहयष्टी सुकली । अतिकष्टी जाहली श्रीसमर्थभेटीस्तव

॥ ८७ ॥ ज्या त्यासीं शिवराय पुसे । मज श्रीसमर्थ भेटतील कैसे । प्रेमविरहें उकसाबुकसें । श्रीशिवरायासीं अश्रु लोटती ॥ ८८ ॥ शिवराय ह्मणे श्रीसमर्थाविणें । मज राज्यभार सर्वथा नाहीं करणें । त्याचिया चरणधुळीविणें । वसती न करणें सुखासनीं ॥ ८९ ॥ अत्यंत वैराग्य भरलें । श्रीसमर्थस्वरूप हृदईं बिंबलें । अन्नोदक रुचेनासें जालें । कंटाळले जन संबंधीं ॥९०॥ शिवरायासि वेधू लागला । जे एकवार पहावें श्रीसमर्थचरणाला । यालागीं शोधशोधूनि ठाव पाहिला । व्यर्थ गेले सकळ श्रम ॥ ९१ ॥ नाना गुप्तस्थळें शोधिलीं । चाफळीं गिरी गिरीकंधरें उल्लंघिलीं । घळीं खणाळीं दृष्टीं घातिलीं । शोधकें थकलीं ठाव न कळे ॥९२॥ऐसियांत राजकारण जालें । भूपें प्रतापासि गमन केलें । कार्य सम्पादोनि श्रीभगवतीसिं आराधिलें । निग्रहें मांडिलीं अनशनव्रतें ॥९३॥ पूर्वीं दृष्टांत दाविला । तैसा श्रीगुरु नाहीं भेटला । माझा उपाव सर्वस्वीं खुंटला । देह घातिला आजि अनशनीं ॥९४॥ श्रीगुरु जरी न भेटती । तरी देहसांडणी आजि सुनिश्चिती । ऐसें वदोनि शिवराय क्षितीं । श्रीसमर्थभेटीप्रती पहुडले ॥ ९५॥ क्षणएक लागला डोळा । तंव स्वप्नामाजीं साधु प्रगटला । कटीं कौपीन मेखळा गळा । गळामाळा तुळशीच्या ॥ ९६ ॥ पाईं पादुका स्मरणी हातीं । तुंबा कुबडी करीं विराजिती । जटाजूट भस्मीभूत मूर्ती । भव्य विराजती श्रीसमर्थ रामदास ॥ ९७ ॥ श्रीसमर्थें शिवराय स्मितहास्यें विलोकिला । कृपाकटाक्षें न्याहाळिला । आशिर्वचनीं संबोखिला । पद्मकर ठेविला मस्तकावरी ॥ ९८ ॥ तंव शिवरायें घातिलें लोटांगण । झणींच श्रीसमर्थें घेतलें उचलोन । हातीं प्रसाद श्रीफळ दिधलें पूर्ण । ऊणखूण प्रत्यक्ष ॥ ९९ ॥ तेथ भूपें प्रार्थना केली । जे देवा बहू मार्गप्रतिक्षा घडली । आजि अनशन व्रतें मांडिलीं । कृपा भली

बोळली आजी ॥ १०० ॥ तरी मज पुनीत करावें । आपुलें नामाभिधान निवेदावें । निजस्थळ आपुलें सांगावें । सुखी करावें निज दासा ॥ १ ॥ तंव श्रीसमर्थ सुहास्यवदनें बोलती । बाबा आह्मी गंगातीरस्थ रामदास ह्मणती । संप्रती तुजकारणें कृष्णातीराप्रती । श्रीरघुपतीआज्ञेस्तव आलों ॥ २ ॥ तुझिया राज्यामाजीं । स्वरूपसंप्रदाय वाढविला सहजीं । आतां धेनुविप्रसमाजीं । निर्व्याजीं भजतसों ॥ ३ ॥ तुमचे देशीं वास्तव्य केलें । तुह्मी समाचार नाहीं घेतले । ऋणानुबंधें विस्मरण घडलें । आतां भलें आठवलें ॥ ४ ॥ असो जालें तें होवोन गेलें । आतां तरी न पाहिजे विस्मरलें । गोविप्रीं भजावें चांगलें । संतमेळें पावावें ॥ ५ ॥ धर्मसंस्थापनेकारणें । श्रीआज्ञा तुज निवेदणें । जडभारी पडतां धांवणें । संरक्षणें तुजलागीं ॥ ६ ॥ आतां तुज पुढतपुढती । तेंचि तें सांगणें किती । अवलंबिल्या राजकारणाप्रती । पुढतपुढती विस्तारविजे ॥ ७ ॥ तंव शिवराय संतुष्ट जाला । न सांवरत गहिंवरोन उठिला । नेत्रीं प्रेमाश्रुपूर भरला । जिजाईसीं भेटला लागवेगीं ॥ ८ ॥ जिजाईसीं दृष्टांतवार्ता निवेदिली । श्रीफळप्रसाद खूण दाविली । माताजिजाई मनीं परम संतुष्टली । मंगळ केलें अति गजरें ॥ ९ ॥ जेष्ठ पत्नीसीं श्रीफळ दिधलें । शिवरायमनीं शुभसंकल्प भरले । ह्मणे स्वामी स्वप्नीं भेटोनि गेले । ते प्रत्यक्ष भले विलोकीन आतां ॥ १० ॥ मग आदरिलें प्रयाण । माता जिजाईसीं केलें साष्टांगें नमन । ठाईं ठाईं घातिली द्विजां सहस्र भोजनें । सुवर्ण गोदानें नानाविध ॥ ११ ॥ भूप परिवारेसीं चालिला । ठाकोनि आला महाबळेश्वराला । असंख्य द्विजभार गौरविला । सहस्रभोजनला आदरी ॥ १२ ॥ श्रीवांईक्षेत्रीं महालिंग पूजिलें । क्षेत्रस्थ द्विजवरां संतुष्ट केलें । उपरी कृष्णावेणी माहुलीं आले । विश्रांति राहिले त्रिरात्र ॥ १३ ॥ कृष्णा-

वेणीसंगमीं स्नान केलें । श्रीसमर्थदर्शन शीघ्र व्हावें चिंतिलें ।
इतुकियांत नवल वर्तलें । जें पत्र आलें श्रीसमर्थरायांचें ॥१४॥

श्रीसमर्थांचें पत्र

निश्चयाचा महामेरू । बहुतजनासीं आधारू ।
अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥ १ ॥
परोपकाराचिया रासी । उदंड घडती जयासी ।
जयाचे गुणमहत्वासीं । तुळणा कैंचीं ॥ २ ॥
नरपती हयपती । गजपती गडपती ।
पुरंदर आणि शक्ती । पृष्ठभागीं ॥ ३ ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥ ४ ॥
आचारशीळ विचारशीळ । दानशीळ धर्मशीळ ।
सर्वज्ञपणें सुशीळ । सर्वांठायीं ॥ ५ ॥
धीर उदार आणि सुंदर । शूर क्रियेसीं तत्पर ।
सावधपणेंसी नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥
तीर्थक्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें विवडलीं ।
सकळ तीर्थें आंदोळलीं । धर्म गेला ॥ ७ ॥
देव धर्म गोब्राह्मण । करावयासीं रक्षण ।
हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥
उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञिक वैदिक ।
धूर्त तार्किक सभानायक । तुमचे ठाईं ॥ ९ ॥
या भूमंडळाचे ठाईं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म उरला कांहीं । तुह्मा कारणें ॥ १० ॥
अणखी कांहीं धर्म चालती । श्रीमंत होवोन कित्येक असती ।
धन्य धन्य तुमची कीर्ती । विश्वीं विस्तारली ॥ ११ ॥
कित्येक दुष्टांसि संहारिलें । कित्येकांसि धाक सुटले ।
कित्येकांसि आश्रय जाले । शिवकल्याण राजा ॥ १२ ॥
तुमचे देशीं वास्तव्य केलें । परंतु समाचार नाहीं घेतले ।
ऋणानुबंधें विस्मरण जालें । काय नेणूं ॥ १३ ॥
सर्वज्ञमंडळी धर्म मूर्ती । सांगणें काय तुह्मांप्रती ।
धर्मसंस्थापनेची कीर्ती । सांभाळिली पाहिजे ॥ १४ ॥

उद्दंड राजकारण तटलें । तेथें चित्त विभागलें ।
कारण नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

शिवरायें श्रीसमर्थपत्र हातीं घेतलें । घेवोनि शिरसा वंदिलें । श्रीसमर्थशिष्यासीं गौरविलें । सन्मानिलें अति आदरें ॥ १५ ॥ श्रीसमर्थपत्र हातीं आलें । प्रेमाश्रुपूरें नेत्र भरले । दृष्टांत दरुषण आठवलें । सदद्गित जाहले निजमनीं ॥१६॥ शिवराय ह्मणे श्रीसमर्थसेवाकर । मी निजांगें होईन सत्वर । श्रीगुरुकृपा पाखर । आतां अरुवार मी पावेन ॥ १७ ॥ माझा स्वामी श्रीरामदास । तो मज आतां भेटेल परेश । दृढालिंगन देईन सर्वांगास । करीन वास चरणतळवटीं ॥ १८ ॥ माझी श्रीसमर्थ माउली । ती विषम कठिण काळींची साउली । तिसी भेटावया चरणचाली । त्वरा जाली मज आतां ॥१९॥ ऐसा हर्षरोमांचितभरें करोन । श्रीसमर्थांसि केलें पत्रलेखन । शिष्यासि पुसिलें वर्तमान । स्वामीदर्शन केंवि घडे ॥ २० ॥ ते ह्मणती श्रीसमर्थस्वामी । क्षणएकही नसती विरामीं । निश्चित स्थळ न बोलवे संभ्रमीं । चाफळआश्रमीं बहुधा भेटतील ॥ २१ ॥ विशेषतः रामघळीं कां दासघळीं । श्रीसमर्थ भेटती एकांत वेळीं । तुह्मी त्वरा करोनि अळुमाळी । श्रीसमर्थ घळींत शोधावे ॥ २२ ॥ शिवभूपें त्वरा केली । मानगांव पर्यंत स्वारी आली । मग सडीस्वारी निघाली निवडकमंडळीनिसीं चाफळासि आले ॥ २३ ॥ श्रीराघवा साष्टांग प्रणिपात केला । श्रीसमर्थप्रभूचा शोध घेतला । अक्का बोलिली शिवरायाला । शिंगणवाडीं श्रीमारुतिसन्निध श्रीसमर्थ भेटतील ॥२४॥तरी आतां स्नानें करावीं । स्वस्तचित्तें भोजन सारावीं । क्षणएक विश्रांता घ्यावी।निरोप पाठवितें श्रीसमर्थदेवासीं॥२५ तंव तेथ शिवराय ह्मणे । आजि श्रीसमर्थदर्शनाविण अन्न न सेवणें । अक्का बोलिली ऐसी त्वरा न करणें । बहुत परिवारें श्रीसमर्थ भेटती न भेटती ॥ २६ ॥ तुह्मी पत्र जें पाठविलें ।

कल्याण श्रीसमर्थसन्निध घेवोनि गेले । आतां भोजन करावें वहिलें । निरोप पाठवितें श्रीसमर्थदेवा ॥ २७ ॥ शिवरायासि श्रीसमर्थध्यास जडला । हृदा विरहाग्नी अत्यंत झोंबला । यालागीं दिवाकरगोसावी समागमें दिधला । भेटी पाठविलें श्रीसमर्थप्रभूच्या ॥ २८ ॥ आइका श्रोते हो सज्जन । हा भेटियोग सांगावया मी मतिमंद अज्ञान । शिवरायश्रीसमर्थ भेटिचें महिमान । शिवसमर्थाविण नेणवे अन्या ॥ २९॥ धन्य भाग्याचा नृपती । ज्यासी संतपुरुषांची खंती । धर्मसंस्थापनेप्रती । अती निगुती सर्वस्व वोपिलें ॥ ३० ॥ शिवराय शिंगणवाडीसि आले । श्रीखडीमारुती दर्शन केलें । परी श्रीसमर्थ नाहीं भेटले । तैसेंचि केलें गमन पुढें ॥ ३१ ॥ श्रीसमर्थ होते खिंडीं । पुष्पवाटिके तरुतळवटीं । तेथ कल्याण शिवराजपत्र वाचिती । श्रीसमर्थ श्रवण करिती स्नेहभरें ॥ ३२ ॥ कल्याणगोसावियांप्रती । श्रीसमर्थ चमत्कारचित्तें बोलती । जे शिवराज येतो भेटीप्रती । त्वरा चित्तीं आजीच केली ॥ ३३ ॥ तंव जनचाहूल आइकिलें । श्रीसमर्थें कल्याण पुसिलें । कल्याणें दिवाकर गोसावी सांगीतले । मागूनि दिसती दोघेजण ॥ ३४ ॥ ह्मणीं दिवाकरें घातिलें लोटांगण । कां आला श्रीसमर्थ पुसती त्यालागून । तोंचि शिवराज घाली लोटांगण । श्रीसमर्थ चमत्कारोन हांसती ॥ ३५ ॥ श्रीसमर्थ ह्मणती शिवराया । पत्र तुह्मी एकदांचि आलां भेटावया । शिवराज धांवोनि लागती पायां । वचन बोलावया धीर न पुरे ॥३६॥ अपराधी ह्मणोनि घातिलें लोटांगण । धांव धांवोनि धरिले दृढचरण । ह्मणती क्षमा करा मज दीनालागून । स्वामी दयाघन कृपा करावी ॥ ३७ ॥ शिवरायें अनुग्रह प्रसाद चिंतिला । श्रीसमर्थें कल्याण गोसावी विलोकिला । कल्याण सांगती अधिकारी भला । आणि पूर्व संकेताला युक्तची ॥ ३८ ॥ शिवरायें पूजासाहित्य मेळविलें ।

श्रद्धा आवडीं श्रीसमर्थ पूजिले । अनुग्रह दीक्षा संप्रदाई जाले । श्रीसमर्थस्वरूपीं जडले प्रहर चार ॥ ३९ ॥ ध्यान जडलें अंतरीं। वृत्ती नाठवेचि दुसरी । तंव श्रीसमर्थें समाधीउतरोनि सत्वरी । वृत्तिवरी शिवराज आणिले ॥ ४० ॥ शिवरायें श्रीगुरु गौरविला । नानालंकार आभरणीं भूषविला । उधळिले अगणित रत्नमोहराला । अद्याप त्या स्थळाला सांपडती ॥ ४१ ॥ धन्य शिवरायाचें गुरुदास्य । धन्य शिवरायाचें भक्तिसौरस्य । धन्य शिवरायाचें वाढलें यश । परमपुरुष श्रीरामदास जोडला ॥४२॥ शिवराजभूप येतां अवतरोनी । हें विश्वचि मुरडलें हरिभजनीं श्रीराम प्रत्यक्ष प्रतीतीसि आला जनीं । ज्यात्यालागुनी सन्मार्ग जडला ॥ ४३ ॥ सर्व आले कारभारी । तिहीं अनुग्रह घेतला सत्वरी । श्रीसमर्थकृपेची थोरी । सत्संगाभीतरीं सहज कळली ॥ ४४ ॥ श्रीसमर्थें शिवरायासि आलिंगिलें । नृपवरें श्रीसमर्थ साष्टांगें अभिवंदिले। श्रीसमर्थें शिवराया पूर्ण यशसामर्थ्य दिधलें । कीर्तिवंत केला महीमंडळी ॥ ४५ ॥ शिवरायें श्रीसमर्थावरी बहुरत्नें उधळिलीं । कांहीं दिवाकरगोसाविसीही अर्पिलीं । श्रीगुरुनिष्ठा प्रगट दाविली । श्रीसमर्थमाय पावली शिवरायासी ॥ ४६ ॥ श्रीसमर्थें शिवभूप गौरविला । मठीं प्रसादासि पाठविला । श्रीरघुनाथप्रसाद प्रत्यक्ष पावला । श्रीराघवें हार दिधला अखंड शोभेचा ॥ ४७ ॥ श्रीरघुनाथसन्निध कल्याण शिवराज आले । श्रीसमर्थआज्ञें प्रसादचिन्ह मागितलें । श्रीरघुनाथ मुगुटींचा पुष्पतुरा हाले । खालीं आला अकस्मात ॥ ४८ ॥ कल्याणगोसावियांनीं उचलिला । तोचि शिवराजशिरीं खोंविला । चमत्कार बहुमोल रत्नीं विनटला । सकळीं देखिला डोळांभरी ॥ ४९ ॥ नवल देखिलें सकळीं । पुष्पें होतां रत्नें जालीं । श्रीसमर्थउपासना प्रगटली । भक्तमंडळी सुखावली ॥ ५० ॥ मठींतूनि श्रीसमर्थ

आले । शिवरायासीं त्रिरात्र राहविले । नाना परमार्थवचन बोलिले । सुखी केलें अमृतोत्तरीं ॥ ५१ ॥ श्रीसमर्थ ह्मणती अक्कावेणाईसीं । आह्मी तरी अरण्यवासी । भूप आले पाहुणे-रासी । कांहीं त्यासीं गौरविलें पाहिजे ॥ ५२ ॥ यापरी श्री-समर्थ कौतुकें बोलिले । तंव शिवराज मनीं लाजिन्नले । श्री-चरणीं दंडवत घातिलें । दीनरंक आपुलें मज ह्मणवा ह्मणे ॥ ५३ ॥ येथोनि श्रीसमर्थचरणींचा दास । मज श्रीसमर्थउच्छि-ष्टाची आस । ऐसें ह्मणोनि शिवराज सावकाश । श्रीसमर्थ रामदासा वंदिती ॥ ५४ ॥ शिवराजमुखींचे अमृतवचन । श्री-समर्थ श्रवण करिती प्रेमें भरोन । मग शिवराजसैन्य परिवारजन भोजनालागोन बैसविले ॥ ५५ ॥ धन्य ते शिवरायसंगतीचे जन । ज्यांसीं सर्वकाळ लागलें श्रीसमर्थप्रभूचें ध्यान । मज गमे श्रीरामावतारीचे वानरगण । महीउद्धरण करूं आले ॥ ५६ ॥ शिवरायाचे जीव कीं प्राण । ते मावळे मराठे सैनिकगण । ज्यासीं धैर्य शौर्य पुरुषार्थ परिपूर्ण । शिवरायाकारणें देह अर्पि-ती ॥ ५७ ॥ एकेक मराठा मावळावीर । उल्लंघू पाहे सप्तसागर । धर्मसंस्थापनेचा निर्धार । अति अरुवार बाणला अंगीं ॥ ५८ ॥ एका शिवरायाकारणें । तिहीं तुच्छ केले आपुले प्राण । गृह-धनदारापुत्र त्यागोन । शिवराजवचनीं प्राण देती ॥ ५९ ॥ एकएकाहूनि वीर । स्वामीकाजीं अतितत्पर । पडों नेणती कार्यकार्यांतर । अति निर्धार स्वामिकार्यीं ॥ ६० ॥ शिवराज-सेना असंख्य मिनली । श्रीसमर्थचरणीं लागली । श्रीसमर्थें नेत्र भरोन विलोकिली । सेना गर्जली श्रीरामनाम ॥ ६१ ॥ श्रीसमर्थें सैन्यसंभार विलोकिला । मनीं अत्यंत संतोष वाटला । ह्मणती श्रीरघुनाथ आह्मां तुह्मां वोळला । यशलाभ वाढला धर्म संस्थापणें ॥ ६२ ॥ गंभीर वचनीं असीर्वाद वदले । ह्मणती श्रीरघुनाथ तुह्मांवरी तुष्टले । निर्भयें तुह्मी भजा शिव-

राज पडिलें । सुरकार्य निर्मळ तुह्मी साधाल ॥ ६३ ॥ तंव सकळीं हरुषभरें टाळी पिटिली । मेदिनी श्रीरामनामीं दणाणिली । स्वर्गीहूनि पुष्पवृष्टी जाहली । विमानें दाटलीं नभमंडळीं ॥ ६४ ॥ महाराष्ट्रधर्म उजळला । साधुसंतां आनंद वाटला । दुष्टां अधर्मियां चळीकोप सुटला । कृतांतकाळ वाटला शिवराय ॥ ६५॥ शिवरायें स्वधर्मध्वजा उभविली । श्रीसमर्थकृपाकटाक्षें स्थिराविली । नाना पुण्यकर्मे धवळलीं । महीमंडळीं मंगळ गाजलें ॥ ६६ ॥ नाना सत्कृत्यें चालिलीं । भाविकें भजनमार्गी उतटलीं । साधुसंतां निर्भयता लाधली । शिवरायाची गाजली सामर्थ्यसत्ता ॥ ६७ ॥ श्रीविठ्ठलाचे वारकरी । पीडा पावती श्रीपंढरीं । दिंडी पताका घेतां करीं । त्यांसी वैरी हेळसीत होते ॥ ६८ ॥ चालतां पंढरीच्या पंथें । त्यांसी दुष्ट पीडित अवचितें । शिवराज पुण्यप्रतापवंत । पंढरी पेठेंत त्याचा दंड गाजला ॥ ६९ ॥ हा हो महाराष्ट्रदेशीं । पुण्यकर्म वाढलें विशेषीं । श्रीसमर्थकृपा शिवरायासीं । तो सत्कर्मासीं वाढविता ॥ ७० ॥ असो श्रीसमर्थ संतुष्टले । सकळ सेना सैनिक गौरविले । उपरी सभा करोनि बैसले । नवमीकार्य सांगितलें अधिकार परत्वें ॥ ७१ ॥ भक्तमंडळी पाचारिली । नवमीउत्सावकार्यें निवेदिलीं । नवूदिन वेगवेगळालीं । कार्यें सांगितलीं एकेकां ॥ ७२ ॥ श्रीसमर्थमाहिमान विस्तारलें । तें दिगंतरा भेदोनि चालिलें । परी श्रीसमर्थ सतीबाईसी नाहीं विसरले । अग्रमान दिधला नवमींत बाईप्रती ॥ ७३ ॥ श्रीदासहनुमंतमूर्ती । शिबिकासनीं चाफळीं आणविती । प्रतिपदेच्या कार्यक्रमाप्रती । सतीबाई निश्चिती नेमिल्या ॥ ७४ ॥ द्वितियेचा दिवस । कऱ्हाडकर रुद्राजी साधिती सावकाश । तृतियेचा दिवस । तारळेकर देशपांडियासीं नेमिला ॥७५॥ चतुर्थी पंचमी दोन्ही दिवस । शिराळकर देशपांडे साधिती उत्सवास ।

षष्ठीचा दिवस । निगडीकरांस निवेदिला ॥ ७६ ॥ सप्तमीच्या दिवशीं । नेम नेमिला नरसोमलनाथासीं । अष्टमीच्या कार्य-क्रमासीं । वेणूबाईसीं सांगितलें ॥ ७७ ॥ नवमीचा दिवस । नेमिला श्रीकल्याण गोसावियास । दशमीच्या उत्सवास । चाफ-ळकर देशपांडियास नेमिला ॥ ७८ ॥ यापरी नउमीकार्यक्रम नेमिला । सिवरायासि अन्य कार्यभाग सांगितला । नउमीउत्साव ब्रह्मांडपैलाड नेला । श्रीराम प्रत्यक्ष प्रगटला महीतळीं ॥७९॥ श्रीसमर्थसामर्थ्य भारी ।श्रीरामनवमी गाजली चराचरीं। दिंड्या पताका सरोभरीं भक्त अरुवारीं थैकारती ॥८०॥ श्रीसमर्थस्वामी प्रगटला। त्यासी शिवराय सानुकूळ जाला । नवमीउत्साव विस्तारला । वैकुंठाला कोण पुसे ॥ ८१ ॥ प्रगटला साधू श्रीसमर्थ जनीं । राजा निजांगें रतला श्रीरामभजनीं । नास्तिक्य प्रकटवील कोण झणीं । धन्य धन्य त्रिभुवनीं श्रीशिवराजप्रजा ॥ ८२ ॥ श्रीसमर्थशिवराजे एकांती बैसती । नाना गुप्त कठिण कार्यें विवरिती । नाना जनारिष्टें निवारिती । पुण्यमार्ग उजळिती जनांकारणें ॥ ८३ ॥ श्रीसमर्थें शिवराया हातीं धरिलें । त्यासीं यश सिद्धी सामर्थ्य अर्पिलें । मंगळ घोषें गगन दणाणिलें । श्रीसमर्थ रामदास भले मृत्युलोकीं ॥ ८४ ॥ शिवरायें श्रीसम-र्थचरणीं मस्तक ठेविलें । श्रीसमर्थें शिवराजमस्तक अवघ्रा-णिलें । पाठीवरूनी हस्त फिरविले । निरोप दिधला आनंद-मेळीं ॥ ८५ ॥ श्रीसमर्थ सांगती शिउबा भिवों नको । धर्म-संस्थापनें अंतरों नको । दुष्टदमनीं चळों नको । लाजों नको श्रीरामनामीं ॥ ८६ ॥ श्रीरघुनाथआज्ञेकारणें । आह्मासीं तुज सहाय्य करणें । नाना अरिष्टें संकटें निवारणें । धर्म जागविणें श्रीरघुनाथजीचा ॥ ८७ ॥ आतां तुह्मां आह्मां हेंचि करणें । जनपरिहारदुःख निवारणें । विशेष स्वरूपउपासना वाढविणें ।

वैकुंठीं पाठविणें जीवभूत ॥ ८८ ॥ श्रीरघुनाथ हृदयस्थ जाला। त्यानें तुह्मासीं अभयवर पाठविला। ह्मणीं विसरों नका ह्या बोली। यापरी संबोखिला शिवराज श्रीसमर्थें ॥ ८९ ॥ शिवरायें श्रीसमर्थनिरोपा घेतलें। पुनरपी साष्टांगेंसीं नमिलें। प्रेमपडिभरें श्रीसमर्थें उठविलें। आलिंगिलें कडकडोनी ॥९०॥ ऐसी श्रीसमर्थकृपा जाली। ते काळीं शिवरायें धन्यता मानिली। राजभवनीं येवोनि जिजाई अभिवंदिली। वार्ता निवेदली श्रीसमर्थकृपा ॥९१॥ सकळांसी परमानंद जाहला। ह्मणती भगवंत आह्मांवरी तुष्टला। तेणें तरी आह्मां सकळांला। सहाय्य श्रीसमर्थाला पाठविलें ॥ ९२ ॥ मुख्य शिवराय भजनशीळ। तेणें प्रजा सर्व जाली पुण्यशीळ। श्रीरामनामाचें कल्लोळ। अती सोज्वळ मही चालिले ॥ ९३ ॥ विषेश चरित्रमर्मभाग। तो हा श्रीशिवश्रीसमर्थ भेटिचा प्रसंग। बोलविता श्रीसमर्थ श्रीरंग। तो निजांगेंचि बोलवी ॥ ९४ ॥ माझिये मनींचे केलें। श्रीसमर्थचरित्र हातां आलें। बहुकाळींचे कोड पुरले। चरित्र निर्मळ सुखदाई ॥ ९५ ॥ श्रीसमर्थस्वामी कृपाळु भला। माझा प्रेमभाव त्यासीं कळला। शुद्धभावार्थें हृदई प्रविष्टला। चरित्रलेखनाला बैसवी ॥ ९६ ॥ माझा देहभाव परिपूर्ण। तो निजांगें जाला श्रीसमर्थ आपण। एक श्रीसमर्थ रामदासाविण। माझें मीपण आनु नेणें ॥ ९७ ॥ श्रीसमर्थचरित्रगोडी। माझी मजाचि लागली धडफुडी। येथील शुद्ध प्रेमाची चवी गाढी। अभाविकें बापुडीं नेणती ॥ ९८ ॥ मी निज निष्ठेचिया गुणें। आदरिलें श्रीसमर्थचरित्रगाणें। श्रीसमर्थचरित्रगुणीं चित्त वेधणें। हें माझें मीच जाणें सुखपूर्ण ॥ ९९ ॥ श्रीसमर्थचरित्र जालें। जालें तें होवोनि गेलें। मज संपती अनुभवा आलें। सुख परिपूर्ण वाटलें चरित्र गातां ॥ २०० ॥ आतां पुढिलिये प्रसंगींचें निरूपण। विशेष रसाळ नवल विंदान।

श्रवण करोत भाविक सज्जन। श्रीसमर्थ मनकामना पुरविती ॥१॥ श्रीरामदासकथासारामृत। सावधान संतश्रोते परिसोत। श्रीधरचरणीं भिमू विनवीत। निजकृपामृत तुमचें हें ॥२०२॥ इति श्रीरामदासकथासारामृत भिमूविरचितायां शिवराजश्रीसमर्थभेटी अनुग्रह नाम दशम प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग ११ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम्।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम्॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



या श्रीसमर्थप्रभूसीं जे भजती। ते नर उत्तम पदवीतें पावती। निर्धार भजनीं कैवल्यपद प्राप्ती। ते हे श्रेष्ठभक्ती श्रीसमर्थरायाची ॥ १ ॥ कलीयुगीं साधन सोपें। एक्या श्रीसमर्थच्चिंतनें जळती पापें। महापातकांचीं कंदर्पें। आपोआप जळोनि जाती ॥ २ ॥ कोणीतरी व्हारे भाग्यवंत। डोळांभरीं अवलोका स्वामी श्रीसमर्थ। जयाचिया नांवें कळिकाळ कांपत। त्रैलोकीं समर्थ श्रीसमर्थस्वामी ॥ ३ ॥ किती करावा शब्दविस्तार। येथील अनुभव नेणती संसारी नर। दुष्ट नष्ट खळ खोटे अविचार। वृथाअहंकारें फार वहात गेले ॥४॥ त्यासी शुद्धभक्तिपंथें चालतां। उपहास हेळण उपजे चित्ता। क्षणीं प्रेमळ भजन गातां नाचतां। लाज चित्ता आविष्करे ॥ ५ ॥ हिताहित कांहीं नेणती। सर्वकाळ टवाळीं ढवाळीं रमती। नातरी गंजीफा सारिपाट मांडिती।

बहुमोल वेंचिती निजायुष्या ॥ ६ ॥ अहो कोण पुरुषार्थ मानिला । नातरी कोण लाभ येणें जोडला। धिग् धिग् वेंचिला काळ वृथा गेला । कळिकाळघाला नाठवा मनीं ॥ ७ ॥ तारुण्य भर भर जाईल । वृद्धाप्यदशा अंगीं येईल। सकळ शरीरसंबंधी सांडितील। अवकळा ठाकेल सन्मुख उभी ॥८॥ मग कोणी न धांवेल सखा सोइरा। दूर राहतील स्वजन पुत्रदारा। पारिखें व्हावें लागेल स्वशरीरा। गंगातिरा देह दग्ध करिती ॥ ९ ॥ ऐसे गेले नेणों किती। महाराजे चक्रवर्ती। तेथें बापा तुझा पाड किती। श्रीसमर्थ रामदास चित्तीं कां नाठवे ॥ १० ॥ चवदा चवकड्याचा रावण। जयाचें अपरंपार वैभव धन। सुवर्णालंकृत निजनगर परिपूर्ण । बळसामर्थ्यें करोन परिपूर्ण ॥ ११ ॥ त्याची कोण देखिली अवकळा। भंगला मान गेला संपत्तिसोहळा। अंतकाळीं मुखीं न मिळे सुवर्ण वालतोळा। दुराभिमानें निमाला रावण ॥ १२ ॥ दुर्योधनाचा अभिमान भारी। नित्य पांडवांचा हेवा करी। पांडवां सहाय्य निजसखा श्रीहरी। कौरवां बोहरी दुर्योधनसंगतीं ॥ १३ ॥ कंस अभिमान वैभवें मातला। त्याचा श्रीकृष्णें गर्व उतरिला। यापरी थोरथोरां घाला आला। मानवी पामराला कोण पुसे ॥ १४ ॥ मानवी आयुर्मर्यादा केतुली। केवळ शतवरुषें नेमिलीं। गणती न होतां किती गेलीं। डोळां देखिलीं मरतांही ॥ १५ ॥ ऐसें जाणूनि सावध व्हावें। श्रीरामदासभजनीं लागावें। येणें पौरुषपदवीतें पावावें। संसारीं वर्तावें सावधपणें ॥ १६ ॥ श्रीरामदासेंविण संसार केला। तो नर निपटचि वायां गेला। पृथ्वीसी भूभार जाला। काळें ग्रासिला झडपोनी ॥ १७ ॥ कांहीं तरी सोय धरी। श्रीसमर्थरामदास स्मरण करी। तो निजभक्तसहाकारी। निजनिर्धारीं रक्षिता ॥ १८ ॥ एक्या श्रीरामदासभजनें। सच्चिदानंद पदवी पावणें। देहासकट

वैकुंठीं जाणें । कीर्तीवंत होणें सचराचरीं ॥ १९ ॥ श्रीसमर्थमहिमा जाणती साधुसंत । कां तो जाणे शिवराज पुण्यवंत । जाणती उद्धव कल्याण वेणाई निष्ठावंत । ती भाग्यवंत गुरुभक्त मंडळी ॥ २० ॥ ज्यासीं श्रीसमर्थसेवा घडली । तीच भाग्यवंत भक्तमंडळी । श्रीसमर्थरामदास नामकल्लोळीं । गदारोळीं गर्जिन्नले ॥ २१ ॥ श्रीसमर्थासि मृत्यलोकीं येणें । हरिनाम भक्तिपंथ उजळणें । महापातकियांही सोय लावणें । दुष्टा दंडणें निर्धारेसीं ॥ २२ ॥ श्रीसमर्थस्वामीचरणावर । लोळती सिद्धसाधू थोरथोर । अभिमान त्यागून दूर । सेवातत्पर राहती ॥२३॥ आइका श्रोते हो भाविकजन । मागील प्रसंगींचें अनुसंधान । शिवराज श्रीसमर्थभेटी आनंदले पूर्ण । संतुष्ट होवोन निजस्थळासि आले ॥ २४ ॥ शिवराज श्रीसमर्थचरणींचा अंकिला । नियमें गुरुवारीं येत श्रीसमर्थदर्शनाला । निर्धारें चालवी निजनियमाला । श्रीसमर्थभक्तिपुतळा शिवराय ॥ २५ ॥ श्रीसमर्थदास्यत्वाची थोरी । शिवराज पावला निजनिर्धारीं । निजांगें दास्यत्व श्रीचरण चुरी । आवडी भारी गुरुभजनाची ॥२६॥ शिवराय चित्तीं श्रीगुरुभजन आवडे । वाचा श्रीगुरुनामीं पवाडे । एक्या श्रीगुरुसेवेपुढें त्रैलोक्य थोकडें । शिवराय मानी ॥२७॥ मागां रामकृष्णादिकीं । श्रीगुरुनिष्ठा सम्पादिली निकी । प्रवृत्तिमार्ग राखिला लौकिकीं । सिद्ध अनेक श्रीगुरुनिष्ठ जाहले ॥ २८ ॥ गोरक्ष गोपिचंद निवृत्ती । श्रीगुरुभजनीं जाले रती । श्रीएकनाथ जनार्दन सेविती । शिवभूपती तैसाच श्रीगुरू भजे ॥ २९ ॥ श्रीगुरुभजनें पावती वैभव । श्रीगुरुभजनें पुरुषार्थ स्वयमेव । श्रीगुरुभजनें पळे भवभेव । अढळपदींचा ठाव श्रीगुरूभजनें ॥ ३० ॥ ऐसा शिवराज श्रीसमर्थ अंकिला । श्रीसमर्थीं तेणें देहभाव विकिला । श्रीसमर्थभजनीं सर्वकाळ रतला । यश पावला निजनिष्ठें ॥३१॥ श्रोते हो आइका नवल-

विंदान । शिवराज आला श्रीसमर्थभेटी कारण । अगणित सेना परिवारजन । श्रीसमर्थचरण शोधीत घळींत आले ॥३२॥ शिवराजसेना वाट चाली । उष्णकाळ तृषेनें व्याकुळ जाली । तृषाक्रांत चित्तें अत्यंत गजबजलीं । मुखें कोमेजलीं सकळांचीं ॥ ३३ ॥ चाफळीं रामघळीं अरण्यांत । कवणाही जळबिंदु न भेटे निश्चित । श्रीसमर्थें नवल दाविलें अकस्मात । चाफळ-खोऱ्यांत जळ वाहाविलें ॥ ३४ ॥ कुबडी लावोन पाषाण लवं-डिला । लवंडितां जळवोघ वाहविला । तोचि पुढें कुबडीतीर्थ नामें गौरविला । जन देखती अद्यापवरी ॥ ३५ ॥ मधुर पवित्र जळ । जा पहा रे कोणी अळुमाळ । गळतील नानाकुष्ट दुःख-कल्लोळ । देह निर्मळ कुबडी तीर्थीं एकदांचि न्हातां ॥ ३६ ॥ शिवराजतृषा हरली । सकळ सेना सुखी संतुष्टली । जळचम-त्कारें थक्कीत जाली । चरणीं लागली श्रीसमर्थजींच्या ॥ ३७ ॥ शिवराजसैनिक श्रीसमर्थ नमिती । श्रीरामनामीं कल्लोळ करिती । पुरुषार्थप्रतापें रणीं लढती । यश अर्पिती शिवराया ॥ ३८ ॥ शिवपुरुषार्थयावा देखोन । श्रीसमर्थ संतुष्टती प्रेमभरोन । नाना भविष्य चिन्हें निवेदोन । धर्मसंस्थापनेकारण प्रवर्तती ॥ ३९ ॥ शिवभूपतीचा पुरुषार्थ गाजला । अविंधां चळी कांप सुटला । संतसज्जनां परमानंद वाटला । भला भला श्रीसमर्थशिष्य ह्मणती ॥ ४० ॥ श्रीसमर्थ आज्ञेविण । शिवराज न चाले अणु-प्रमाण । श्रीसमर्थस्वामींचें घेत असीर्वचन । यश सम्पादून श्रीसमर्थदर्शनीं धांवे ॥ ४१ ॥ उदंड शिवपुरुषार्थ गाजला । तेणें तरी श्रीसमर्थस्वामींचा ह्मणितला । अपरिमित दौलत मुलूख सम्पादिला । रायें अर्पिलें श्रीसमर्थचरणीं ॥ ४२ ॥ नाना गड-कोट किल्ले सम्पादिले । नाना महावीर रणीं मर्दिले । कृत-काळासम शत्रू रणीं विदारिले । परी शिवरायें ह्मणितली श्री-समर्थशक्ती ॥ ४३ ॥ शिवराज ह्मणें श्रीसमर्थनामावरी । मी यश

मेळवीन चराचरीं। यवन बापुडियांची कोण थोरी। धाकेभरीं शरण आणीन ह्मणे ॥४४॥ श्रीसमर्थे शिवराजपुरुषार्थ देखिला। श्रीसमर्थ गौरविती शिउबा तूं भला भला। धन्य तुजवरी श्रीरघुनाथ तुष्टला। सुरकार्याला तूं साधिता ॥ ४५ ॥ तुझेनि आह्मी धन्य जालों। तुझेनि आह्मी सौख्यपद पावलों। तुझेनि आह्मी कृष्णातिरा आलों। अनन्य जालों तुजलागीं ॥ ४६ ॥ तुंवां आमुचे मनींचें केलें। महाराष्ट्रधर्मा उजळिलें। दुष्ट पापियां यमलोकीं पाठविलें। निर्भय केलें पृथ्वीतळ ॥ ४७॥ शिउबा तुझा पुरुषार्थ प्रगट कळला। हा अंबरीं यशदुंदुभी गाजला। श्रीराघवा परम संतोष वाटला। धन्य महीतळा शिउबा तूं एक ॥ ४८ ॥ तुंवां श्रीरघुनाथ मनींचें केलें। ह्मणीं तुज पाहिजे आतां अभिषेकिलें। ऐसिया श्रीसमर्थवचनीं सभा डोले। देशोदेशीं जाणविलें शिवराज्यारोहण ॥ ४९ ॥ श्रीराघवें रावणवधिला। त्रिभुवनीं यश दुंदुभी गाजला। संप्रती शिउबा तैसा शोभला। कीर्ती पावला चराचरीं ॥ ५० ॥ श्रीराघवें निर्मळ केली धरा। शिवराज कार्यकर्ता तैसाचि पुरा। श्रीराघव वसिष्ठ श्रीगुरू सोईरा। शिवरायासि दातार श्रीसमर्थस्वामी ॥ ५१ ॥ न होय तेंचि घडोनि आणिलें। न भेटे तेंचि सम्पादिलें। महाराष्ट्रराज्य विस्तार पावलें। कलीं गाजले श्रीशिवराज ॥ ५२ ॥ शिवरायासीं अभिषेक होतो। आनंदभरें तुष्टला जो तो। राज्यामाजीं मंगळ उत्साव गाजतो। जो तो गातो शिवयश प्रताप ॥ ५३ ॥ धन्य भाग्याचा तोचि एक नृपवर। ज्यासी यश चिंती प्रजा सानथोर। जीवाहूनि प्रीती करिती निरंतर। प्रीती परस्पर अनुपम्य ऐसी ॥ ५४ ॥ राजा प्रजा शुद्ध प्रीतीनें वोतिला। तेथ कल्पांतीं न चले परचक्र घाला। दुःखव्याधी अरिष्टाला। रिघावयाला मार्ग न फुटे ॥ ५५ ॥ असो आतां बहु विस्तार। करण्या शिवराज्याभिषे-

कविचार। सभे बैसले शिष्ट थोर थोर। मुख्यासनावर श्रीसमर्थ विराजले ॥ ५६ ॥ श्रीसमर्थ ह्मणती श्रीरघुनाथ तुष्टला। शिवरायें राज्यभार सम्पादिला। महाराष्ट्रराज्य विस्तार पावला। नृप मानला शिवराज आह्मां ॥५७॥ आह्मी तुळजाभवानीसीं नवस केला। तो आजि फलद्रूप डोळां देखिला। अविंध अवरंग्यामाज जिराला। शिवरायाला अभिषेक व्हावा ॥ ५८ ॥ तुह्मी सकळ सभानायक। धूर्त तार्किक वैदिक। राया व्रतबंध करा निःशंक। करा अभिषेक निर्भयें ॥ ५९ ॥ पाठवा प्रयागराजीं वाहन। बोलवावे वेदोक्त सुब्राह्मण। विशेषतः गागाभट्ट आणऊन। शिवराज्यारोहण साधावें ॥ ६० ॥ तुह्मी प्रधानपंत आपुलाल्या परी। कार्यतत्पर असावें निरंतरी। कार्यांतर पडों न द्या अणुभरी। कीर्ति बरी विस्तारली तुमची ॥ ६१ ॥ श्रीसमर्थवचनीं सभासंतुष्टली। सकळीं श्रीरामनामीं टाळी पिटिली। शिवराजगुणानुवादसम्मेळीं। कार्यकुशळीं तत्पर जाले ॥ ६२ ॥ ते शिवराज्याभिषेकमाहिमान। वर्णावया मी मतिमंद अज्ञान। किंचित्मात्र बोलेन ऊणखूण। क्षमा पूर्ण मज कीजे ॥ ६३ ॥ शिवराज्याभिषेक सोहळा। धन्य धन्य ते देखती डोळां। चारी मुक्ति एकेचि हेळा। शिवराज्यामाजीं नांदती ॥ ६४ ॥ न भूतो न भविष्यती उत्साव जाला। शिवराज सिंहासनीं बैसविला। चराचरीं आनंद गाजला। धन्य जोडला शिवनृपती ॥ ६५ ॥ गागाभट्टशास्त्री आणविले। शिवरायासिं मंगळस्नान कळविलें। उपरी व्रतबंधन साधिलें। राजचिन्हीं विराजविलें शिवरायासीं ॥ ६६ ॥ देशोदेशींचे ब्रह्मविद् ब्राह्मण। शिवरायासिं देती असीर्वचन। शिवराज करी सुवर्णदान। गागाभट्टालागोन चार लक्ष होन आर्पिले ॥ ६७॥ सहस्रभोजनें घातिलीं। नाना मिष्टान्न पक्कान्नें जेवविलीं। याचक वर्गाची पूर्ण तृप्ती केली। दानें दिधलीं इच्छेनुरूप

॥ ६८ ॥ देवदेवांसी अभिषेक केले । महाराष्ट्रदेशीं मंगळ गाजले । प्रजाजन परमानंदीं बुडाले । शिवरायासि गाइलें साधुसंतीं ॥ ६९ ॥ किती संत पुरुष आले । तिहीं शिवराया धन्यवाद दिधले । रायें साधुजन शुद्धभावें पूजिले । तीर्थप्रसाद सेविले शुद्धभावें ॥ ७० ॥ महाराष्ट्रराज्याभीतरीं । उत्साव गाजला मासवरी । निर्भय जाले चराचरी । दुःख अणुभरी वोखदासि नुरलें ॥ ७१ ॥ शिवराया राज्याभिषेक जाला । भूपें श्रीगुरू षोडशोपचारें पूजिला । पुढें आइका चरित्राला । अघटित लीला श्रीसमर्थरायाची ॥ ७२ ॥ शिवरायासि अभिषेक जाला । श्रीसमर्थें "छत्रपती" पदवीं भूषविला । गोब्राह्मणप्रतिपालक ह्मणितला । भूतळाला धन्य धन्य शिवराज ॥ ७३ ॥ गोब्राह्मणप्रतिपालक । छत्रपती पदवी पावला निःशंक । जिजाईमनीं कोटिआनंद कौतुक । ह्मणे बाळक धन्य शिवराज माझा ॥ ७४ ॥ धन्य शिवराज माझा बाळ । धन्य स्वामी श्रीसमर्थ दयाळ । परम सौख्य आनंद कल्लोळ । वैकुंठ हेळा तुच्छ मानूं आह्मी ॥ ७५ ॥ माझा विषम कठिणकाळ गेला । जैंपासूनि शिवराज जन्मला । तो आजि चक्रवर्ती गाजला । धाक बैसल कळिकाळासीं ॥ ७६ ॥ थोर थोर राज्यधर । लोळती जयाचे चरणावर । माझ्या शिवरायाचा सेनासंभार । देखोनि सुरवर लाजिन्नले ॥ ७७ ॥ थोरथोर सरदार मानकरी । लोळती जयाचिये चरणावरी । शिवरायाची सेना सारी । लेंकुरापरी जिजाई मानी ॥ ७८ ॥ एका शिवरायाकारणें । जिजाईसीं जगन्माता ह्मणणें । धन्य जिजाईचें पुत्र प्रसवणें । सुरवरीं वंदणें चरण जियेचे ॥ ७९ ॥ जिजाईचा पुण्यप्रभाव भिवरों । जे पुत्र वैभ देखिला डोळांभरी । मुक्तिपद पावली श्रीसमर्थचरणांवरी । धन्य चराचरीं जिजाई माउली ॥ ८० ॥ जिजाई एकचि पुत्र प्रसवली । जयाची तिहीं लोकीं कीर्ति विस्तारली । जगन्माता पदवी

पावली । जिजाई भली स्त्रीदेहीं ॥ ८१ ॥ श्रीसमर्थचरणावरी । जिजाई लोळे प्रेमपडिभरीं । श्रीसमर्थ गौरविती मधुरोत्तरीं । नानापरी असीर्वचनें बोलती ॥ ८२ ॥ सकाळां एकचि आनंद वाटला । श्रीरामनामीं उत्साव गाजला । विश्वीं विश्वंभर प्रगटला । श्रीसमर्थलीला सुखदाई ॥ ८३ ॥ शिवराज श्रीसमर्थांवंदूनि सिंहासनीं आरूढला । श्रीछत्रपति शिवराज घोष दुमदुमिला । श्रीसमर्थें नेमोनि दिधलें अष्टप्रधानांला । राजकारणाला सहकारी ॥ ८४ ॥ श्रीसमर्थआज्ञेवरी । शिवराज राजकारण करी । श्रीसमर्थ आज्ञेविण अणुभरीं । काये निर्धारीं वावरे नाम ॥ ८५ ॥ आइका काय नवल जालें । विशेष राजकारण घडलें । श्रीसमर्थ शिवरायासिं अंतरले । चिंतावर्तीं पडिले शिव अष्टप्रधान ॥ ८६ ॥ अष्टप्रधान सांगती शिवभूपाला । श्रीसमर्थ न सांपडती एके स्थळाला । निजछंदें विचरती महीतळाला । राजकारणाला विलंब न कीजे ॥ ८७ ॥ गनीम तरी निकट आला । अकस्मात वोढवेल घाला । ह्मणीं आज्ञा दीजे आह्मां सकळां । शत्रु पाळामुळासीं खणून आणूं ॥ ८८ ॥ भूप ह्मणे श्रीसमर्थआज्ञेविण । आह्मां करणें नाहीं अणुप्रमाण । ह्मणीं जावो राज्यवैभव सम्पूर्ण । श्रीचरणाविण शून्य आह्मां ॥ ८९ ॥ ऐसा शिवभूप निर्वाण बोलिला । सभा चकित न बोलती बोला । इतुकियांत चमत्कार जाला । श्रीसमर्थ प्रगटले शिवराजदरबारीं ॥ ९० ॥ जय जय श्रीरघुवीर । श्रीसमर्थ गर्जिन्नले गिरागंभीर । चमत्कारली सभा अरुवार । श्रीसमर्थचरण वंदण्या सभा धांवली ॥ ९१ ॥ सिंहासनावरूनि धांवला नृपवर । श्रीचरणीं घाली साष्टांग नमस्कार । श्रीसमर्थ उचलोनि घेती वरचेवर । स्मरणाकारण पुसिलें श्रीसमर्थें ॥ ९२ ॥ शिवभूप सांगे स्वामीप्रती । आजि राजकारणीं पडिली गुंती । आपुले आज्ञेविणे निश्चिती । कार्य यथासिद्धी न पवे ॥ ९३ ॥ एकवार कृपाकटाक्षें अव-

लोकावें। मग आह्मी राजकारणीं प्रवर्तावें। ऐसें वदोनि स्वभावें। शिवराज जिवें भावें श्रीचरण वंदी ॥ ९४ ॥ तंव श्रीसमर्थ स्मितहास्यें बोलती। शिवबा हे कोण वदंती। आह्मां एका स्थळीं न घडे वसती। कार्यकारणाप्रती तुह्मी सारिजे॥ ९५ ॥ यथोनि पुढें अवधारावें। संकटीं भगवतीसन्निध बैसावें। क्षण-एक ध्यान धरोनि रहावें। प्रष्ण करवावे कार्यकुशळ जनांकरवी ॥ ९६ ॥ तेथ तुह्मी बोलाल जें वचन। तोचि सिद्धी पाववील निश्चयें करोन। ह्मणीं न तिष्ठावें आह्मांकारण। भगवती संर-क्षण करील तुमचें ॥ ९७ ॥ ऐसें दृष्टांतवचन बोलिलें। श्रीसमर्थस्वामी अदृश्य जाले। सकळ सभाजनां ठक पडिलें। श्रीसमर्थ आले गेले कैसें तें कळेना ॥ ९८ ॥ नृप-वरें स्वामीआज्ञा पाळिली। श्रीभगवतीही प्रसन्न जाली। राया दिव्य असिलता प्राप्त जाली। करीं शोभली सर्वकाळ ॥ ९९ ॥ आलें संकट निवारलें। शिवराज यशस्वी रायगडीं आले। भार्येनें फलाहारा आम्रफळ आणिलें। मधुर लागलें अत्यंत भूपा ॥१००॥ तें श्रीसमर्थस्मरण जालें। ह्मणे स्वामीसीं पाहिजे अर्पिलें। इतुकें ह्मणतां श्रीसमर्थध्यान घडलें। गडीं प्रगटले श्रीसमर्थ महाभाग ॥ १ ॥ जय जय श्रीरघुवीर। श्रीस-मर्थ गर्जिन्नले गिरागंभीर। रायें घातिला साष्टांग नमस्कार। अती आदरें श्रीसमर्थपूजन केलें ॥ २ ॥ श्रीसमर्थे पुसिलें स्मरणा कोण कारण। राव सांगे आम्रफळें आलीं गोमांतकाहून। चवी अत्यंत मधुर चाखोन। स्वामीसीं अर्पण करूं गमलें ॥ ३ ॥ ऐसें ह्मणोनि अर्पिलें आम्रफळ। स्वामी चवी घेती अळुमाळ। ग्रहण केला विडातांबूल। निरोप तत्काळ मागीतला ॥ ४ ॥ नृपवरें श्रीचरणीं प्रष्ण केला। जी हा अकस्मात आग-मनयोग कैसा साधिला। देवें स्मितहास्यें सूपहातीं धरिला। तटासन्निध आणिला कौतुकेसीं ॥ ५ ॥ एक पाउल दुर्गावरी।

दुजा टाकिला बाह्यांगावरी । स्वामी सांगती शिउबा आवधरीं । इतुक्यांत निर्धारीं विद्युल्लता झळकली ॥ ६ ॥ शिवराज नेत्र दिपिले । श्रीसमर्थप्रभू अदृश्य जाले । शिवराजनेत्रीं प्रेमाश्रुपूर भरले । अघटित कळलें श्रीसमर्थ कौतुक ॥ ७ ॥ शिवराजनेम गुरुवार आला । ससेनेसीं घळींत श्रीदर्शना पातला । दर्शनो-त्तरीं भूपें निरोप मागीतला । श्रीसमर्थें राहविला प्रसादाकारणें ॥ ८ ॥ दोन प्रहर भरत आले । आतां क्षुकिस्त जीव तळमळे । श्रीरघुनाथप्रसाद ग्रहण करा वहिलें । हेंचि भलें उचीत आजी ॥ ९ ॥ शिवराजाचित्तीं संकोचला । सर्व असंख्य सेनासमूह भरला । इतुकियां सकळां खावयाला । चाफळखोऱ्याला देतां कष्ट होतील ॥१०॥ तंव देवें कल्याण पाचारिले । नूतन गुंफाद्वार उघडिलें । सैनिकां स्नानादि विधी उरकविले । पंक्ती बैसविल्या गुंफेमाजी ॥ ११ ॥ नाना मिष्टान्न पदार्थ भोजन । तृप्ती ढेंकर देती संतुष्ट होवोन । ग्रासोग्रासीं आठविती श्रीरघुनन्दन । श्रीसमर्थमाहिमान ग्रासोग्रासीं आठविती ॥ १२ ॥ शिवराज थक्कीत जाला । परम श्रेष्ठ सत्कार पावला । चमत्कार देखोनि अत्यंत भ्रमला । जे श्रीसमर्थें सेनेला तृप्त केंवि केलें ॥ १३ ॥ भोजनोत्तर श्रीचरणीं लागला । ह्मणे स्वामी अपूर्व नवलाव देखिला । हा सेनासमूह तृप्ती भोजनी धाला । ह्या चरित्राला श्रवण कीजे ॥ १४ ॥ स्वामी स्मितहास्यें बोलती । हें तुह्मी पुसावें श्रीतुकयाप्रती । तो सकळ जाणे येथील स्थिती । संतमहिमेप्रती तो जाणता ॥ १५ ॥ तंव शिवराज श्रीचरणीं लागला । उपरी निजस्थळाला आला । स्वामीलीला देखोनि ससैन्यें गहिंवरला । ज्याला त्याला श्रीसमर्थ चमत्कार आठवे ॥ १६ ॥ पुढें कांहीं काळ लोटला । नृपवर श्रीतुकारामभेटीं आला । तिहीं आग्रहेंसी राहविला । तृतीं जेवविला ससैन्येसीं ॥ १७ ॥ येथेही नृप ससैन्येसीं जेवविला । तंव शिवराज मनीं चमत्कारला । श्री-

तुकारामचरणीं लागला। विनविता जाला आदरेसीं ॥ १८ ॥ श्रीतुकाराम ह्मणती शिवराया। तुज स्वामींनीं पाठविलें आह्मां- सन्निध यावया। तूं थोर नृप भाग्याचा महितळा या। श्रीसमर्थ रामदासचरणाला विनटलासीं ॥१९॥ तरी आईके शिवनृपवरा। बापा संतमहिमा नकळे कोण्हा पुरा। तुज भाग्यें जोडला श्रीसमर्थ सोइरा। भाग्यवंत खरा श्रीरामोपासक तूं ॥२०॥ कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्। श्रीसमर्थस्वामी पूर्णकाम। पूर्ण परात्पर मोक्षधाम। परंधाम पावविता ॥ २१ ॥ शिउबा धन्य पुरुषार्थ दाविला। तुंवां श्रीसमर्थस्वामी संतुष्ट केला। सकळ भूभार उतरिला। भूतमात्रांला सौख्य तुझें ॥ २२ ॥ तंव रायें श्रीतुकाराम साष्टांगें वंदिला। उपरीं नम्रत्वें स्वामी निरोप घेतला। ठाकोनि आले प्रतापाला। संतलीला निशिदिनीं आठवे ॥ २३ ॥ येरीकडे श्रीचाफळीं। श्रीसमर्थलीला चाले सोज्वळीं। नित्य श्रीसमर्थदर्शना येती संतमंडळी। श्रीचरणांजवळी रहिवास करिती॥२४॥ श्रीसमर्थ रामघळीं एकांतीं वसती। तेथ कल्याण सेवेसीं तत्पर राहती। एकवार लोटतां प्रहर रात्रीं। श्रीसमर्थें तांबुलाप्रती मागीतलें ॥२५॥ साहित्य नसतां धांवले कल्याण। तंव मार्गीं पडिले सर्पदंश होवोन। श्रीरघुवीरनाम गर्जोन। निचेष्टित होवोन भूमी पडिले ॥ २६ ॥ श्रीसमर्थश्रवणीं ध्वनी पडिला। कोण रे ह्मणोनि पुसती सकळांला। तंव कल्याण न पडेचि दृष्टीला। शोधाला चुडी घेवोन चालिले ॥ २७ ॥ शोधीत अर्ध पर्वत आले। मार्गीं कल्याण निचेष्टित देखिलें। श्रीसमर्थ चित्तीं अत्यंत हळहळले। भुजंगातें देखिलें सन्निधची ॥ २८ ॥ श्रीसमर्थें श्रीराम मनीं आठविला। कल्याणा हस्तस्पर्श केला। श्रीरामगजरेसीं कल्याण उठविला। चालिला मठाला धरिला सकळीं ॥ २९ ॥ कोठें जातोसि ह्मणोनि पुसिलें। तो ह्मणे तांबूलसाहित्य आणितों वहिलें। श्रीसमर्थें कौतुकें वारिलें। प्राण

वांचविले कल्याणस्वामींचे ।।३०।। श्रीसमर्थे भुजंग न्याहाळिला। त्यासीं स्थळत्यागा निरोप दिधला। दुग्ध हंडाभर नैवेद्य समर्पिला। खुणे रोविला सिंदुर चर्चित पाषाण ।। ३१ ।। एकवार श्रीसमर्थ कळंब्याघळीं बैसले। श्रीस्वामीदर्शना शिवराज आले। नानास्तुती करुणावचनें बोलिले। सन्निध वसती यावें विनविलें स्वामीप्रती ।। ३२ ।। श्रीसमर्थस्वामी निकट वास व्हावा। नित्य अर्चन वंदन लाभ घडावा। ऐसें आसुचें येत मनोभावा। श्रीसमर्थ स्वामींनीं कृपा कीजे।।३३।।प्रताप अथवा रायगड। स्वामीवसतीकरितां सुगड। अथवा मानेल तरी परळीगड। स्वामींनीं निकट वसती यावें ।। ३४ ।। आम्हां होईल सुख अपरंपार। नित्य दर्शन अर्चन सुखोद्धार। चिंता निवारेल वरचेवर। स्वामीचरणांवर सर्वकाळ लोळूं ।। ३५ ।। शिवराजआग्रह देखिला। देवें परळीगड नेमिला। क्षणीं भूपें कडेकोट बंदी सिद्ध केला। वसतीसिं दिधला श्रीसमर्थ देवा ।।३६।। श्रीसमर्थ परळीं वसतीसि आले। त्यासीं सज्जनगड नामें गौरविलें। संतसज्जनांचें माहेर प्रगटलें। भाविक धांवले श्रीसमर्थदर्शना ।।३७।। श्रीसमर्थ आले सज्जनगडीं। श्रीरामनाम गर्जिन्नले धडाडी। प्रतापलीला परम चोखडी। अती आवडीं श्रोतीं अवधारिजे ।। ३८।। नवमीउत्सवाकारणें। स्वामीभक्तमंडळीं चाफळीं जाणें। उत्साव परमोत्साहें सम्पादणें। रथ मिरविणें अतिगजरें ।। ३९ ।। चाफळीं असंख्य यात्रा लोटे। उत्साव करिती घडघडाटें। तेणें महापातकांचीं थाटें। गिरी दरकुटें रिगोनि जाती ।। ४० ।। श्रीसमर्थदर्शनाकारणें। असंख्य भक्तगणीं लोटणें। श्रीसमर्थदेवा एकांत वसती करणें। यात्राकौतुक देखणें दासघळींमधुनीं ।। ४१ ।। जन थोरा कष्टें शोधिती। दासघळीं श्रीसमर्थां वंदिती। अती घोषें श्रीरामनाम गर्जती। चाफळखोरा दणाणिती श्रीरामनामीं ।। ४२ ।। उत्सावोत्तर स्वामी परिभ्रमण करिती। विश्रांती

श्रीसज्जनगडीं येती । नित्य नूतन चमत्कार दाविती । थक्कीत करिती विश्वजनां ॥ ४३ ॥ एकवार सज्जनगडीं ओंवरीला । श्रीसमर्थ बैसले स्वलीला । तंव प्रचंडवात सुटला । छाटी तळाला उडोनि गेली ॥ ४४ ॥ श्रीसमर्थ ह्मणती कल्याणा धांवें । छाटी तळीं गेली घेवोनि यावें । स्वामीवचन ऐकतां स्वभावें । कल्याण तटातळीं उडोनि गेले ॥ ४५ ॥ एकचि हाहाःकार जाला । ह्मणती गोसाविया देहपात घडला । व्यर्थ केलें अविचाराला । जन धांवले तटातळीं ॥ ४६ ॥ श्रीसमर्थ स्वस्थचित्तें पाहती । छाटी आणोनि कल्याण नमस्कारिती । आश्चर्य जालें सकळांप्रती । श्रीसज्जनगडावरतीं श्रीसमर्थलीला ॥ ४७ ॥ श्रीकल्याणस्वामी महाप्रतापी । सामर्थ्य अंगीं जेंवि महारुद्र कपी । एकनिष्ठ पुरुषार्थ श्रीचरणीं अर्पी । मंदबुद्धी शिष्य प्रकोपी हेवा करिती ॥४८॥ श्रीसमर्थएकनिष्ठसेवेकारणें । कल्याणें निजशरीर वोवाळूनि सांडणें । श्रीचरण सेवें त्रैलोक्य ठेंगणें । जिवेंभावें सेवणें गुरुनाम ॥ ४९ ॥ कल्याणपुरुषार्थ भारी । स्वामीसेवा निजांगेंचि सर्व करी । सर्वकाळ श्रीगुरू-नाम कंठीं धरी । महंतीच्या भरीं भरोचिना ॥ ५० ॥ धन्य कल्यणाचा प्रताप । धन्य कल्याणाचा साक्षेप । धन्य कल्या-णासीं आपेंआप । श्रीसमर्थप्रताप अनुभवा आला ॥ ५१ ॥ श्रीसमर्थशिष्य उदंड जाले । परी कल्याण सरीसीं न उतरले । धन्य कल्याण कल्याणपद पावले । श्रीसमर्थचरणीं राहिले सर्व-काळ ॥ ५२ ॥ नित्य श्रीसमर्थाकारणें । कल्याणें उर्मुडीजळ वाहणें । पांचा गुंडांचा एकचि हंडा भरणें । गड चढणें उतरणें हेळामात्रें ॥ ५३ ॥ ब्रह्मचर्य व्रतस्थ खडतरी । तेणेंचि बळसा-मर्थ्य अत्यंत भारी । क्षणीं अवाढव्य कार्य सारी । अणुभरी श्रमी न होतां ॥ ५४ ॥ श्रीसमर्थशिष्यसमुदाव भारी । त्यामाजीं भोळारामाची श्रवण करा थोरी । श्रीगुरुचरणींचाएकनिष्ठ सेवे-

करी । निज निर्धारीं गाजला ॥ ५५ ॥ आणीकही शिष्य आपुलाले परी । सेवा सम्पादिती परोपरी । किंचित् हेवा तिरस्कार परस्परीं। गडावरीं उपजला ॥५६॥ भोळारामचरित्र अति रसाळ परम पवित्र । भोळाराम अत्यंत सत्पात्र। अहोरात्र गुरुदास्य करिती ॥ ५७ ॥ भोळाराम गोसावियांसी । श्रीसमर्थे नित्य मागावें तांबुलासीं । भोळाराम सर्वभावेसीं । श्रीसमर्थांसीं तांबूल अर्पी ॥ ५८ ॥ यापरी नित्यनेम चालिला । तंव शिष्यवर्गीं विकल्प रूढला । तिहीं गुप्तस्थळीं ठेविलें खलाला । कैसा तांबुलाला देईल पाहूं ह्मणती ॥ ५९ ॥ आह्मी सकळही वांया गेलों। श्रीसमर्थतांबूलसेवेसीं मुकलों । यापरी परस्परीं लागले बोलों । श्रीसमर्थांसि कळों आलें हें वर्म ॥ ६० ॥ श्रीसमर्थ ह्मणती आमुचा भोळाराम । आह्मासि तांबूल देतो उत्तम । शिष्य ह्मणती भोळा अधमाधम । देतो निजमुखें चावोन स्वामीसीं तांबूल ॥ ६१ ॥ ऐसें बहुतीं बहुवार देखिलें । बहुतां मनीं खेद भरले । शिवराज श्रीसमर्थदर्शना आले। शिष्यवर्गीं निवेदिलें भोळारामकृत्य ॥६२॥ शिवरायां सांगती भोळा महा नष्ट । अधमाधम पापिष्ट । श्रीस्वामीप्रती तांबूल उच्छिष्ट । अती चोखटा अर्पितो ॥ ६३ ॥ हे मात स्वामीपुढें काढितां । आह्मां धीर नुपजे चित्ता । अत्यंत वोखटी हे वार्ता । कल्याणही चित्ता न आणिती ॥ ६४ ॥ ऐसें वर्तमान ऐकिलें । ऐकतां शिवराज खिन्नवदन जालें । श्रीसमर्थें शिवराजहृदय वोळखिलें। निर्विकल्प केलें चरित्र दाउनी ॥६५॥ श्रीसमर्थें नवल दाविलें । भोळारामा तांबूल मागितलें । झणीं भोळ्यानें निज शुद्धमुखें चूर्ण केलें । समर्पण केलें श्रीसमर्थदेवां ॥ ६६ ॥ श्रीसमर्थें तांबूल ग्रहण केलें । विशेषेंपरी गौरव वचन बोलिले । वारंवार खलवर्णन जालें । शिवराज विस्मयीं बुडाले कळेना ॥ ६७ ॥ रायें विनविलें श्रीसमर्थालागोन । जे

देवें सांगावा तांबुलाचा गुण। श्रीसमर्थ ह्मणती शिउबा तूंचि यावें खल घेवोन। निजांगें अनुभवून पाहे पां ॥ ६८ ॥ तंव शिवराज भोळ्यासन्निध आले। खल द्यावें जी ह्मणितले। भोळ्यानें निज करीं शिर उतरिलें। हातीं दिधलें नृपतीच्या ॥६९॥ घ्या जी खल भोळा ह्मणे। भूपती भयकंप लाजिरवाणें। स्वामीसान्निध यावया खिन्न मन। शिर घेवोन भयाभीत आले ॥७०॥ शिष्यसमुदाय घाबिरा जाला। भोळाराम खल सकळीं विलोकिला। श्रीसमर्थ ह्मणती स्वलीला। पहा रे खलाला भोळ्याच्या ॥७१॥ तें भोळारामाचें शिर। श्रीरामनाम गर्जे वारंवार। शिवराज कांपिन्नला थर थर। ह्मणें मी मतिमंद पामर विकल्पें नाडिलें ॥ ७२ ॥ सकळ शिष्य लाजिन्नले। अपराधी ह्मणोनि श्रीचरणीं लोळों लागले। सकळीं साष्टांगें दंडवत घातिलें। विकल्प गेले सांगती स्वामिया ॥ ७३ ॥ आह्मांसीं थोर अपराध घडला। व्यर्थ भोळाराम विटंबिला। क्षणीं आह्मासीं तो अंतरला। आह्मां सकळांला हें दुःख अनिवार जाले ॥ ७४ ॥ तरी आतां देवें क्षमा करावी। भोळ्यारामा पूर्वपदवी प्राप्त व्हावी। तंव तो बोलला श्रीसमर्थ गोसावी। नवल नवाई अपूर्व दाविली ॥ ७५ ॥ शिवरायासीं श्रीसमर्थ ह्मणती। खल नेवोनि ठेविजे जैसा तैशा स्थिती। शिवराज त्वरेनें धांवती। शिर ठेविती धडावरी ॥ ७६ ॥ कैसें नवल घडलें पहा हो। भोळाराम पूर्ववत् जाहले सदेहो। सर्वकाळीं श्रीरामनामीं फोडिती टाहो। ह्मणे हो श्रीचरणींचा मी एक रंक दुर्बळ ॥ ७७ ॥ शिष्यसमुदाव भोळ्याचरणीं लागला। भोळा सर्वकाळीं पूज्यतम मानिला। सर्वीं सर्वत्र भोळाराम वर्णिला। शिष्य शोभला श्रीसमर्थसेवें ॥ ७८ ॥ आइका श्रीसमर्थस्वामीदर्शनाकारणें। नित्य सिद्धसाधूंसि सज्जनगडीं येणे। नाना श्रीसमर्थ लीला प्रगट देखणें। श्रीरामनाम गर्जणें अत्यंत प्रीती ॥ ७९ ॥

नृपवरें सातार नगरीं । निजवसतीसिं शोभविली बरी । श्रीगुरुनिष्ठा साचोकारी । शिवराजअंतरीं वसतसें ॥ ८० ॥ एकवार श्रीसमर्थ असतां सातारीं । आइका कैसी जाली नवल परी । निगडीकरांची अचुक आली फेरी । शिवराज मंदिरावरूनि चालिले ॥ ८१ ॥ श्रीरंगनाथ साधू दिसे सरदार । शिरीं मंदिल विलसें जरतार । होवोन भव्य अश्वावर स्वार । कटीं तरवार विराजे ॥ ८२ ॥ वेश पहातां सरदाराचा । अधिकारी तरी सिद्ध पदवीचा । अत्यंत जिवलग श्रीसमर्थस्वामींचा । वरीवरी जनांचा भाव चळे ॥ ८३ ॥ श्रीरंगनाथ आले राजनगरीं । भूपती मनीं विचार करी । यासीं साधू ह्मणावें कवण्यापरी । श्रीसमर्थ निर्धारीं भजती यासीं ॥ ८४ ॥ श्रीसमर्थांचें रंगनाथीं, प्रेम जडलें । श्रीसमर्थें वारंवार रंगनाथ स्तवियले । यालागीं श्रीसमर्थपंगतीं रायें निमंत्रण केलें । श्रीरंगनाथ राहविलें सुस्थळीं ॥ ८५ ॥ श्रीसमर्थें माहुली स्नानसंध्या सारिली । उपरी स्वारी राजमंदिरीं प्रवेशली । रायें श्रीरंगनाथआगमनवार्ता निवेदिली । आमंत्रण केलें सांगाती भोजना ॥ ८६ ॥ श्रीसमर्थ ह्मणती हें काय केलें । भ्रष्ट पुरुषा कां पाचारिलें । ह्मणीं परत निरोप पाठवा वहिलें । जे भ्रष्ट पुरुष पंगतीं न चले आह्मां ॥ ८७ ॥ श्रीसमर्थवचनीं शिवराज लाजला । अधोमुखें कांहीं न बोलेचि बोला । श्रीसमर्थें निजांगें निरोप पाठविला । भ्रष्ट पुरुषा भोजना न यावें ह्मणोनी ॥ ८८ ॥ श्रीसमर्थें पंगती बैसविल्या । अत्यंत तृप्ती जेवविल्या । तृप्ती ढेंकरें अत्यंत धाल्या । तांबूल आर्पिलें दक्षिणादि ॥ ८९ ॥ भूपा सांगती श्रीसमर्थ । तूंही भोजन सारी स्वस्त चित्त । आह्मी समाचारा जातों रंगनाथ जेथ । कुशळ वृत्तांत पुसूं कांहीं ॥ ९० ॥ श्रीचरणीं शिवराज करी विनंती । देवें मजही न्यावें सांगाती । श्रीसमर्थ ह्मणीं त्यासी वारिती । ह्मणती भ्रष्टवितील रंगोबा न कळे ॥ ९१ ॥

रंगोवा जिवींचा आवडता । तो नये आणिकाचे चित्ता । त्याचिये बिऱ्हाडीं भेटीं जातां । अघटित वार्ता देखाल नेणों ॥ ९२॥ कांहीं विपरीत देखाल । तुमचें अंतःकरण दुःखवेल । आमुचा रंगनाथ आह्मां सुखवील । समाचार केवळ आह्मी घेणें ॥९३॥ भूपें सवें यावया आग्रह धरिला । श्रीसमर्थांसवें चालिला । येरीकडे काय जाली लीला । श्रोतीं श्रवणाला सादर व्हावें ॥ ९४ ॥ श्रीसंतपुरुषांचें चरित्र । विचित्र आणि परम पवित्र । जें अत्यंत गुह्य गुह्यातीत सूत्र । संसारीं अपवित्र चवी नेणती ॥९५ ॥ साधूचा कळावया महिमा । आपणचि जावें त्याचिया जन्मा । सामान्यां कळेना आह्मां तुह्मां । पापात्मा संतपण नोळखी ॥ ९६ ॥ श्रीसमर्थें पाठविला निरोप । रंगोबासी गुह्य कळलें आपेआप । निरोपिया सांगती कळला निरोप । भ्रष्टपुरुषप्रताप प्रगटेल कांहीं ॥ ९७ ॥ निरोपी मनीं वोशाळले । जे निरोपें न सांगतां स्वामीसीं कळलें । ह्मणती श्रीसमर्थांनीं निरोप पाठविलें । तें स्वामींनीं वोळखिलें कैशापरी ॥ ९८ ॥ रंगोवा सांगती श्रीसमर्थकृपें कळलें । निरोपियासीं निरोप दिधलें । भुकेनें प्राण व्याकुळ जाले । शिष्यासि ह्मणितलें आण कांहीं ॥ ९९ ॥ शिष्यासी सांगती दिसेल तेंचि आण । तंव खाद्यपदार्थ दृष्टीं न पडेचि अणुप्रमाण । रंगोबा सांगती दिसेल तेंचि आण । करूं भक्षण लवलाही ॥ २०० ॥ शिष्य ह्मणे स्वामीप्रती । एक ह्मैसा येताहे त्वरित गती । रंगोबा ह्मणती तोचि आणी निश्चिती । पाकनिष्पत्ती आजि हेचि बरी ॥ १ ॥ दो चौ शिष्यांनीं रेडा आकळिला । रंगनाथस्वामिसन्निध आणोनि उभा केला । श्रीरंगनाथीं एका घायीं वधियला । मांस हंडा चढविला पाकनिष्पत्ती ॥२॥ हाडें शिंगें रक्त सांडिलें । अंगणामाजीं सर्वही लिडबिडिलें । इतुकियांत शिवराय श्रीसमर्थ आले । दार ठोठावलें उघडावया ॥ ३ ॥ स्वामी श्रीसमर्थ ह्मणती । रंगोबा आलों तुझिये भेटीप्रती । तुह्मां आह्मां एकाचि पंगती ।

भ्रष्टाकारस्थिती होऊं द्या येथें ॥ ४ ॥ बहुकाळ लोटला । तुह्मा आह्मा पंगती योग नाहीं घडला । येणेंकाळें भाग्योदय प्राप्त जाला । भोजनाला तूं घालिशील ॥ ५ ॥ श्रीसमर्थ विरुद्ध वचन बोलिले । तंव शिवराय मनीं संकोचित जाले । हाडें मांस डोळां देखिलें । चिळस उपजली अंतःकरणीं ॥६॥ शिवरायासीं श्रीसमर्थ ह्मणती । आह्मी तरी बैसो रंगनाथ पंगती । तुह्मां तंव न रुचेल हे रीती । व्यर्थ संगतीसीं आलां ॥ ७ ॥ नृपवर श्रीगुरुनिष्ठ श्रद्धांकिला । श्रीसमर्थचरणीं प्राण विकिला । सर्वभावेंसीं चरणीं लागला । भ्रष्टाकाराला तो न गणीं ॥ ८ ॥ नृपवर विनवी स्वामीप्रती । ह्मणे मज द्यावें जी निजपंगती । श्रीप्रसाद भ्रष्टाकार स्थिती । मज यथानिगुती होवो का ॥ ९ ॥ श्रीसमर्थप्रसादाकारणें । जन्मजन्मांतरीं कोटि पुण्य सम्पादणें । थोराकष्टें श्रीचरण देखणें । सानिध्य पावणें परम दुर्लभ ॥१०॥ श्रीसमर्थें स्मित हास्य केलें । त्रिवर्गां भोजना पात्र मांडविलें । श्रीरंगनाथ स्वामींनीं मांस वोगरिलें । कौतुक घडलें कैसें तें आइका ॥ ११ ॥ मांस होतें तें अन्न जालें । शिवरायें निज नेत्रीं देखिलें । पात्रीं आपुलाल्या बैसले । श्रीसमर्थ बोलिले वचन आइका ॥ १२ ॥ रंगोबासीं श्रीसमर्थ ह्मणती । रेडियासी जाऊं द्यावें यथानिगुती । आपण ह्मणीं पाऊं तृप्ती । त्यासी हे गती उचित नोहे ॥ १३ ॥ श्रीसमर्थवचनीं रंगोबा उठिले । श्रीसमर्थचरण साष्टांगें वंदिलें । श्रीरघुवीर स्मरोनि रेड्या स्पर्शिलें । तत्काळ केलें सजीव त्यासीं ॥ १४ ॥ रेडा खडबडोनि उठिला । सकळा देखतां निघोनि गेला । शिवराज मनीं थक्कीत जाला । संतलीला अगम्य ह्मणे ॥ १५ ॥ श्रीरंगनाथचरणीं शिवराज लागला । ह्मणे स्वामी संदेह होता फेडिला । श्रीसमर्थें आजि दाविलें श्रीरंगोबामहिमेला । गहिंवरत बोलिला शिवराज ऐसें ॥ १६ ॥ म्यां श्री-

रंगनाथीं विकल्प धरिला । तो श्रीसमर्थें आजि पूर्ण निरसिला । ऐसें ह्मणत लोटांगणीं गेला । श्रीरंगनाथें उचलिलें धांवोनि रायासीं ॥ १७ ॥ भूपती ह्मणें क्षमा करावी । नेणतपणें अपराध घडला गोसावी । येथोनि निरंतर कृपादृष्टी असों द्यावी । रंगनाथ गोसावी नृपवरासि आलिंगिती ॥ १८ ॥ श्रीरंगोबा ह्मणती शिव भूपाला । तुमचा प्रताप आह्मीं श्रवण केला । धन्य तुह्मांसी श्रीसमर्थस्वामी वोळला । तुमचिया भाग्याला तुळणा नसे ॥ १९ ॥ श्रीसमर्थाकारणें तुह्मां आह्मासीं सख्य । श्रीसमर्थीं आह्मा सर्वकाळीं ऐक्य । श्रीसमर्थलीलाकौतुक अतर्क्य । भावार्था वार्धक्य कदापि न येवों द्यावें ॥२०॥ श्रीसमर्थ शिवरायासि ह्मणती । तुह्मां आली आजि रंगोबाप्रतिती । संतचरणीं विकल्प न आणिजे चित्तीं । अनंतवृत्ती संत महीं विचरती ॥ २१ ॥ तंव शिवरायें दृढ धरिले श्रीचरण । ह्मणे स्वामी आजि चुकलों पूर्ण । संत चरणीं जालों जी अनन्य । अपराध पोटीं घालोन संरक्षिजे ॥ २२ ॥ मग ब्रह्मानन्दें भोजनें सारिलीं । श्रीरंगनाथ स्वारी राजभवनीं आणिली । घनदाट संतमांदी मिळाली । आनंद कल्लोळीं श्रीरामनाम गाजलें ॥ २३ ॥ यापरी श्रीसमर्थ चरित्र नवलविंदान । पुढतपुढती आदरें करावें श्रवण । श्रवणें सहजें होय उद्धरण । कथा असाधारण श्रीसमर्थरायाची ॥ २४ ॥ श्रीसमर्थकथाश्रवणें दोष हरती । श्रीसमर्थकथाश्रवणें उत्तम गती । श्रीसमर्थकथाश्रवणें विघ्नें पळतीं । परब्रह्मपद प्राप्ती श्रीसमर्थकथाश्रवणें ॥ २५ ॥ श्रीसमर्थदेवें कृपा केली । वृत्ती निजनामगुणीं रंगविली । अन्य बोलवार्ता खुंटविली । सर्वकाळीं चरित्रीं बुडालों ॥ २६ ॥ उठतां बैसतां चालतां । खातां देखतां पहुडतां । सर्वकाळीं आठवे चरित्रकथा । सहजीं सहजता श्रीसमर्थचरित्र स्फुरे ॥ २७ ॥ श्रीसमर्थस्वामी वोळला । माझा संकल्प सिद्धी

अणिला । काळ सार्थकीं लाविला । नरदेहाला उचित दाविलें ॥ २८ ॥ आतां मियां हेंचि करावें । सर्वकाळ श्रीसमर्थ भजनीं लागावें । श्रीसमर्थस्वरूपाकार व्हावें । धन्य ह्मणवावें नरदेहीं ॥ २९ ॥ असो आतां बहू भाषण । पुढें विशेष रसाळ निरूपण । सर्वांगाचे करोनि कान । श्रोतीं सादरें करोन अवधारिजे ॥ ३० ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भिमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ २३१ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत भिमूविरचितायां शिवराज्यारोहण श्रीरंगनाथरेडाचरित्रकथनंनाम एकादश प्रसंग सम्पूर्ण ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १२ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥


राहे नित्य भक्तांकित । माझा स्वामी श्रीरघुनाथ । न भूतो न भविष्यती चरित्र गाजत । गाती साधुसंत सर्वकाळ ॥ १ ॥ श्रीराघवा भक्तजनीं आकळिलें । सर्वभावें त्यासीं भजिन्नलें । येणें भजनें भक्तिमार्गा उजळिलें । मृत्यलोकीं गाजविलें श्रीरामनाम ॥ २ ॥ श्रीरामनामाच्या निर्धारीं । सहजें जोडे कोदंडधारी । विघ्नें होतीं पाठिमोरीं । कलीमाझारीं नामस्मरण करावें ॥३॥ चित्त सुचित्त

करावें । श्रीगुरूचरणीं विनटावें । अत्यंत प्रीती नाम गर्जावें । पुनीत व्हावें हेळामात्रें ॥ ४ ॥ करितां श्रीरामनामस्मरण । न कळे तें कळों येईल पूर्ण । गृहीं अलभ्यलाभ येती चालोन । हें श्रीसंतवचन अन्यथा न ह्मणावें ॥५॥ मुखीं नाम हातीं टाळी । नाचत बोलावी बिरुदावळी । येणें छंदें श्रीवनमाळी । हृदय-कमळीं प्रवेशे ॥ ६ ॥ अवतारामाजीं श्रीरामावतार । अति धीर आणि गंभीर । विशेष सत्ववृत्तीचा निर्धार । उत्तरोत्तर दाखविला ॥ ७ ॥ तेहतीस कोटी सुरवर । दशमुखें बंदिस्त केले जर्जर । श्रीरामरायें धांवोनि सत्वर । दुःखपरिहार पैं केला ॥८॥ श्रीरामावतारीं परम सौख्य वाढलें । ऋषिमुनी संतुष्टले । गंधर्व किन्नर वर्णूं लागले । अमरीं पूजिलें श्रीराघवा ॥ ९ ॥ श्रीराघवें सुरकार्या येणें केलें । निजावतारकार्य सम्पादिलें । निजधामासीं प्रयाण आदरिलें । मागें राहविले श्रीहनुमंतस्वामी ॥ १० ॥ येथ कांहीं वोढवल्या विघ्न । श्रीहनुमंतें करावें निवारण । तोचि हा श्रीसमर्थदातार पूर्ण । मानवी होवोन प्रगटलासे ॥ ११ ॥ जयजयाजी वो श्रीरामदास माय । नित्य स्मरतसें तुझे पाय । तुझिये नामगुणीं चित्त धाय । लागली सोय तुझेनि भजनें ॥ १२ ॥ जयजयाजी श्रीरामदास । सर्वसाक्षित्वें तूं परम पुरुष । सर्वसामर्थ्यबळें तूं सत्ताधीश । पावलों संतोष तुझेनि भजनें ॥ १३ ॥ देवें माझा अभिमान धरिला । धरिला मनोदय सिद्धी पाववीला । निजनामगुणीं छंद लाविला । परम सौख्याला पात्र केलें ॥ १४ ॥ श्रीसमर्थनामाचें स्मरण । हेंचि माझें सर्वस्वजाण । श्रीसमर्थ यशकीर्तीचें गायन । हें जीवन मम जीवित्वा ॥ १५ ॥ श्रीरामदासरूप डोळां पहावें । तेणें म्यां सर्वकाळ सुखी असावें । सर्वकाळ श्रीसमर्थपूजन अर्चन करावें। सर्वकाळ रमावें श्रीसमर्थगुणचारित्रीं॥ १६ ॥श्रीसमर्थनाम गुण कीर्तन । हेंचि माझें आगळें संध्यास्नान । श्रीसमर्थचरणीं वार-

वार घेईन लोळण । ध्यान धारण हेंचि माझें ॥ १७ ॥ श्रीसमर्थस्वरूप पहातां । देहासीं अत्यंत होय अवस्था । श्रीसमर्थनामगुणछंदीं नाचतां । प्रेमावस्था सांवरितां न सांवरे ॥ १८ ॥ प्रेमप्रीतीच्या पडिभरें । सोय दाविली श्रीसमर्थदातारें । निजलीलाचरित्रगुणाक्षरें । जिव्हेवरी बैसविलीं ॥ १९ ॥ येणें चरित्रछंदें मज विसर पडिला । बोलूं नेणेंचि अन्य बोला । सर्वकाळीं चरित्रलीला । प्रसंगाला प्रसंग आठवती ॥ २० ॥ असो आतां बहु भाषण । मागील प्रसंगीचें निरूपण । श्रीरंगनाथस्वामी रेडा उठवोन । राजभवन पावले ॥ २१ ॥ श्रीसमर्थें शिवराजसंदेह फेडिला । श्रीरंगनाथमहिमा वाढविला । उत्साव गाजला नृपभवनाला । आबाळसाबाळा ब्रह्मानंद सुकर केला ॥२२॥ पुढें आइका चरित्र जालें । श्रीसमर्थ सज्जनगडीं बैसले। शिवराज स्वामी दर्शना आले । नमन केलें साष्टांगेंसीं ॥२३॥ स्वामीसमर्थें नृप गौरविला। प्रेमकुशळोत्तरीं संतोषविला। शिवराजचित्तीं भाव उपजला । जे स्वामीसेवेला विशेष करूं ॥ २४ ॥ ह्मणोनि श्रीचरणीं नम्रत्वेंविनंती करीं । जे स्वामींनीं कांहीं सेवा सांगावी सत्वरी । ऐसें विनवोनि श्रीचरणांवरी । नमस्कारी वारंवार ॥ २५ ॥ यापरी शिवरायें वारंवार विनविलें । श्रीसमर्थें उपाधीसीं वारिलें । शिवरायांचे विशेष आग्रह पडिले । मग सांगितली अल्पमात्र सेवा ॥ २६ ॥ भिन्नभिन्न प्रांतीचे नगर । शिवरायासि मागती श्रीसमर्थदातार । शिवराज ह्मणे स्वामी राज्याबाहेर । लहानथोर नगरें हीं असतीं ॥२७॥ तरी आपुले राज्यभीतरीं । स्वामींनीं आज्ञाकारितां बरी । तें तें सकळ अर्पीन श्रीचरणावरी । निजनिर्धारीं भरंवसेनी ॥ २८ ॥ एकसेएकवीस नगराचें दान । आह्मी जें जें गेलों बोलोन । करिशील तरी संतुष्ट रघुनन्दन । राज्यविस्तरण येणें होईल ॥ २९ ॥ देशीं अथवा देशांतरीं । यासीं आह्मां चाड नाहीं

निर्धारी । सेवा इच्छिसी तरी सम्पादन करीं । राघवा बरी सेवा रुचेल ॥ ३० ॥ ह्मणीं शिवराजमनीं उल्हास भरला । श्रीसमर्थ स्वामी साष्टांगें नामिला । निज सेनासमूह सज्ज केला । घाव घातला निशाणीं ॥ ३१ ॥ शिवराजशौर्य धैर्य गाजलें । गनीम बहुत जर्जर केले । तंव अकस्मात विघ्न वोढवलें । पूर भरिले सरितेसीं ॥ ३२ ॥ युद्ध चालिलें दारुण । गनीम अटोपेना अणुप्रमाण । रात्रौ शिवराज चिंतावर्तीं पडिलें पूर्ण । यश सम्पादून श्रीदर्शन कैसेनि घडेल ॥ ३३ ॥ रात्र जाली दोन प्रहर । शिबिरीं शिवराज पहुडले मंचकावर । काळजी चिंता झोंबली अरुवार । यश निर्धार दिसेना ॥ ३४ ॥ आजवरी गनीम मर्दिले । ऐसें बळसामर्थ्य खर्चीं नाहीं पडिलें । ह्मणोनि श्रीचरण आठवले । अश्रूपूर भरले नयनासीं ॥ ३५ ॥ तंव अकस्मात् शिबिरामाझारीं । श्रीसमर्थ प्रगटले निर्धारीं । अभयकर ठेवोनि शिवराजशिरीं । यश उत्तरोत्तरीं सांगितलें ॥ ३६ ॥ स्वामी सांगती शिउबा धीर धरीं । श्रीरघुनाथसाक्ष तुझिये शिरावरी । तो सकळ अघ अपदा संव्हरी । अणुभरी डंडळूं नको ॥ ३७ ॥ करीं श्रीरामनामीं कल्लोळ । तुज बळसामर्थ्य वाढलें तुंबळ । ह्मणीं यश येशील अळुमाळ । शत्रू पाळामुळेंसी भिरकावी ॥ ३८ ॥ येथोनि पुढतपुढती । तुह्मां यशसिद्धी निश्चिती । श्रीरघुनाथ नामावरती । कळिकाळ कांपती येरां कोण पुसे ॥ ३९ ॥ ऐसें श्रीसमर्थ बोलिले । सर्वांचि अदृश्य जाहले । शिवराज उघडोनि पाहती डोळे । तंव मंचकाजवळ कोणीही नसे ॥ ४० ॥ शिवराज ह्मणे आह्मावरी संकट पडिलें । ह्मणीं तें श्रीसमर्थदेवा जाणवलें । संकटसमयीं धांवोनि आले । निर्भय केलें निजसेवका ॥ ४१ ॥ उदंड उल्हास भरला । सेनासमूह पाचारिला । सकळासीं श्रीसाक्षात्कार निवेदिला । नामघोष गाजविला श्रीसमर्थप्रभूचा ॥ ४२ ॥ श्रीसमर्थ रामदास-

नामावर । घसरूनि गेले गनिमावर । यश सम्पादिलें अति सत्वर । जय जय श्रीरघुवीर शब्द करिती ॥ ४३ ॥ शिवराज यश सम्पादूनि आले । देशोदेशींचें सुस्थळ श्रीचरणीं अर्पिलें। श्रीसमर्थस्वामींचे चमत्कार आठवले । माता जिजाईसीं सांगितले गहिंवरोनी ॥ ४४ ॥ आह्मी पडिलों महासंकटीं । तै श्रीसमर्थ धांवले अति निकटीं । वैरियांवरीं हटीतटी । श्रीसमर्थें शेवटीं यश घेवविलें ॥ ४५ ॥ श्रीस्वामी साक्षात् अवतारी । आह्मांसी हे खूण बाणली अंतरीं । यापुढें कार्यकारणांतरीं । पुरुषार्थथोरी आमुची व्यर्थ ह्मणों ॥ ४६ ॥ यापरी माता जिजाईसीं रायें सांगितलें । श्रीसमर्थमहिमान उदंड गाइलें । जिजाईचे नेत्र भरोन आले । वंदन केलें श्रीसमर्थरायासीं ॥ ४७ ॥ शिवराजस्थळ सम्पादना गेले । तैसेंचि श्रीसेतुबंध पाहोनि आले । दिव्य विशाळ मंदिरासि देखिले । चित्तीं आलें श्रीदेवाल्य ऐसें करूं ॥ ४८ ॥ शिवराज श्रीसमर्थ दर्शना आले । साद्यंत वर्तमान निवेदिलें । श्रीसमर्थें स्थळोस्थळीं महंत पाठविले । चहूंधामीं गाजले श्रीसमर्थस्वामी ॥ ४९ ॥ रायें श्रीसमर्थचरणीं विनविलें । ह्मणे स्वामींनीं विनंतीसीं पाहिजे परिसिलें । दक्षिणदेशीं पाहिलीं जैसीं देवाल्यें । श्रीरघुनाथदेवाल्य तैसें करूं ॥ ५० ॥ श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । शिवराजवचन श्रवण केलें । सांगती धन्य तुमचे भक्तिवैभवडोहळे । परी येणें काळें राहविजे ॥ ५१ ॥ तुह्मी करूं ह्मणतां देवाल्य । तें क्षणीं तुह्मी सिद्धी न्याल । शिष्य वर्गासीं पाहिजे कांहीं घडलें । हातोहातीं तें करितील ॥ ५२ ॥ श्रीरघुनाथजीची सेवा । सकळांच्याही यावी दैवा । धन्यधन्य तुमच्या प्रतापवैभवा । श्रीराघवा अभिमान तुमचा ॥ ५३ ॥ रायासीं श्रीसमर्थवचन मानलें । श्रीसमर्थचरणीं साष्टांग दंडवत घातिलें। श्रीस्वामीनिरोप घेवोन रायगडीं आले । जिजाईमातेसीं निवे-

दिलें श्रीसमर्थकृपादान ॥ ५४ ॥ चाफळीं नवमीउत्सवीं । राव एकशेंएकवीस खंडी धान्य पाठवी । नाना सालंकृत गजघंटा अर्पण करीं । अरिष्टें चुकवी विघ्नसंतोषियांची ॥५५॥ वाजंत्री दमामे नगारे चौघडे । श्रीराघवापुढें सर्वकाळ झडे । गगन-चुंबित उभाविले झेंडे । अति चोखडे नवमी उत्साव गाजाविती॥५६॥ आइका श्रीसमर्थचरित्र जालें । स्वामी शिष्यसमुदायेसीं निघाले। दोन प्रहर भरतां अंबराईंत उतरले । शिष्य पाठविले निकट नगरीं भिक्षेसीं ॥ ५७ ॥ निगरीं शिष्यसमुदाव येतां । ग्रामा-धिकाऱ्या कोप भरला चित्ता । कुबड्या झोळ्या हिसकावोनि केली वाच्यता । नगरामधुनी घालविले ॥ ५८ ॥ शिष्यसमूह स्वामी जवळी आला । जाला प्रकार श्रीचरणीं निवेदिला । श्रीसमर्थ ह्मणती पळा पळा । विशेष घाला वोढवेल न कळे ॥ ५९ ॥ श्रीसमर्थ सशिष्य धांवती । तंव नगरीं विपरीत जाली गती । विशाळ वानर भव्याकृती । गृहागृहाप्रती अग्नी चेतवीतसे ॥ ६० ॥ घरोघरीं अग्नी झोंबला । नगरीं हाहाःकार भरला । जो तो जीव लपों लागला । हाका बोंबेला धीर न पुरे ॥ ६१ ॥ तंव वृद्ध वृद्ध मिळाले । ह्मणती रे व्यर्थ साधूसीं छळिलें । तेणें गुणें हें विघ्न ठाकोनि आलें । जातां भलें शरण त्यासीं ॥ ६२ ॥ सकळां मनीं मानलें । साधुदर्शनासीं धांवलें । माग घेत टाकिती पाउलें । साधू भले नाडळती ॥ ६३ ॥ श्रीसमर्थ जों जों गती धांवती । तंव तंव उदंड अग्नी झोंबे नग-राप्रती । नरनारी बाळें हाक बोंब ठोकिती । कवणाही चित्तीं धीर न पुरे ॥ ६४ ॥ जन आवर्वे दीन वदन जालें । श्रीसमर्थ-देवा दुरूनि देखिलें । अत्यंत वेगें पाठलाग केले । तरीही श्रीसमर्थ धांवती अतिवेगें करूनी ॥ ६५ ॥ जन दीनवदनें हांकारिती । साधूसीं बहुतांपरी विनविती । अत्यंत कष्टें श्रीस-मर्थसन्निध येती । साष्टांगें वंदिती श्रीसमर्थचरणां ॥ ६६ ॥

चुकलों चुकलों ह्मणती । श्रीसमर्थचरणीं गडबडां लोळती । नाना करुणावचनीं स्तविती । जीवदान मागती अतिदीन वदनें ॥ ६७ ॥ तंव तो श्रीसमर्थप्रभू दयाळ । ह्मणीं बोळला करुणाकल्लोळ । आश्वासिले जन सकळ । स्वामी सांगती अळु-माळ नगरा पहा परतोनी ॥ ६८ ॥ ते जन नगर परतोनी पाहती । तंव विशाळ वानर विझविताहे नगराप्रती । अग्नी विझाला जैशा तैशा रीती । स्वामीचरणा निगुती शरण येतां ॥ ६९ ॥ सकळही नगरवासी आनंदले । श्रीस्वामीचरणीं लोळूं लागले । ह्मणती स्वामींनीं नगरासि पाहिजे आलें । अपराध घडले क्षमा करोनी ॥ ७० ॥ विशेष जन आग्रह पडिला । श्री-समर्थस्वामी शुद्धभावार्थें बोळला । घेतलें सकळांच्या पूजेला । भक्तिपंथाला जन लाविले ॥ ७१ ॥ नागरिकीं श्रीसमर्थस्वामी पूजिले । शिवछत्रपतीचे श्रीगुरू कळले । अत्यंत गजरीं नाम-सप्ताह केले । श्रीसमर्थ मिरविले विशेष सोहळीं ॥ ७२ ॥ विशेष टाळ घोळ मृदंग धुमाळी । जन नाचती श्रीरामनामकल्लोळीं । श्रीसमर्थतीर्थप्रसाद ग्रहण केलें सकळीं । अनुग्रहीत जाले श्री-समर्थरायाचे ॥ ७३ ॥ श्रीसमर्थदेवें हरिकथा केली । जनमांदी श्रीरामगुणीं रंगविली । जनीं सांडिली अपवित्र चाली । सर्व-भावें धवळली भक्तिमार्गें ॥ ७४ ॥ सकळांसी श्रीसमर्थ सांगती । बापहो नित्य पुजावें साधुसंत मूर्ती । ज्यांसी वंदितो श्रीरमा-पती । हृदयावरी वत्सलांछन मिरवे ॥ ७५ ॥ सकळीं श्रीसमर्थ-आज्ञा मानिली । सर्वकाळीं श्रीसाधुसंतसेवे मिनलीं । श्रीसमर्थप्रभू-वरदवाणी निघाली । जे अग्नघाला न होय इया नगरा ॥ ७६ ॥ सकळीं श्रीसमर्थप्रताप देखिला । भगवद्रूप साधू कळला । असो ऐसी श्रीसमर्थलीला । धन्य ते श्रवणाला सादर श्रोते ॥ ७७ ॥ गांवकरियांचा निरोप घेतला । श्रीसमर्थ आले परळी-गडला । शिवभूपही दर्शनासि धांवला । श्रीसमर्थलीलाश्रवणीं

कवतुक वाटलें ॥ ७८ ॥ शिवरायासी श्रीसमर्थ सांगती । जे आह्मी जावोनि येतो गंगातिराप्रती । बंधूमातेसीं भेटीची खंती । सत्वरगती जावोनि येतों ॥ ७९ ॥ शिवराज वंदी श्रीसमर्थचरण । ह्मणे सेवकासही करावें आज्ञापन । परिवार सेनासमूह घेवोन । जांबभुवन आह्मी विलोकूं ॥ ८० ॥ तंव श्रीसमर्थदेवें वारिलें । आह्मीं अल्पशिष्यपरिवारें जाऊं ह्मणि-तलें । शिवरायासीं श्रीसमर्थवचन मानलें । लोटांगण घातलें श्रीसमर्थचरणीं ॥ ८१ ॥ भूप विनवी त्वरित यावें परतोन । आह्मी परदेशीं पडों हीन दीन । ऐसें ह्मणतां नेत्रीं प्रेमाश्रु भरोन । शिवराज गहिंवरोन श्रीसमर्थचरणीं लागला ॥ ८२ ॥ परिवारजन श्रीचरणीं नमस्कारी । सकळां विरहातिदुःख दाटलें अंतरीं । देवें संबोखिलें ज्या त्यापरी । प्रयाण सत्वरीं आदरिलें ॥ ८३ ॥ कांहीं शिष्यसमुदाय सवें घेतला । श्रीसमर्थ चालिले जांबेला । ठाईं ठाईं जन उद्धारिला । हरिकथेला ठाईं ठाईं केलें ॥ ८४ ॥ श्रीशिवराय श्रीसमर्थ कीर्तिमहिमान । घरोघरीं जाणवलें परिपूर्ण । याजलागीं श्रीसमर्थप्रभूचें होतां आगमन । नगरजन श्रद्धापूर्ण महापूजन करिती ॥ ८५ ॥ ठाईं ठाईं नामसप्ताह जाले । अन्नदानीं प्राणिजात तृप्त केले । ठाईं ठाईं रथोत्साह मिरविलें । श्रीरामनाम गाजलें ठाईं ठाईं ॥ ८६ ॥ श्रीसमर्थ-रायाच्या दर्शना । पिपीलिका रीघ न मिळे जनां । कितीएक दुरूनीच नमिती श्रीचरणा । अंतःकरणा श्रीसमर्थ जडले ॥ ८७ ॥ जनमनीं हरुष भरला । धन्य ह्मणती श्रीसमर्थ प्रभू प्रगटला । तेणें तरी छत्रपती पदवीला । शिवरायाला भूषविलें ॥ ८८ ॥ उदंड आयुष्य व्हावें श्रीसमर्थाला । उदंड भाग्य सम्पदा मिळो शिवरायाला । विघ्नधाडी घडो अविंधमैंदाला । श्रीचरणाला आह्मी कदापि न विसरिजे ॥ ८९ ॥ ऐसी ज्या त्या मुखींची वदंती । सर्वकाळ श्रीरामनाम स्मरती । श्रीसमर्थ

श्रीरघुनाथ कीर्ती वर्णिती । जड मूढ उद्धरिती ठाईं ठाईं ॥ ९० ॥ उदंड भाविक समुदाय मिळाला । मार्गीं श्रीरामनामगजर चालिला । नाचत छंदें वर्णिती श्रीसमर्थगुणलीला । आनंदकल्लोळीं जांब भुवन ढाकलें ॥ ९१ ॥ दिंड्या पताकांचे भार । वैष्णव थैकारती अपार । टाळ मृदंग ध्वनी अपरंपार । जांब नगर दणाणिलें ॥ ९२ ॥ एकचि टाळ मृदंग धुमाळी । वैष्णव नाचती प्रेम सम्मेळी । अंबरीं उडाली चरणरजधुळी । अमरीं तत्काळीं शिरीं वंदिली ॥ ९३ ॥ जांबेचे जन सामोरे धांवले । श्रीसमर्थप्रभू आले जाणवले । ब्रह्मानंदें श्रीसमर्थ लोटांगणीं गेले । वैष्णव वंदिले साष्टांगेसी ॥ ९४ ॥ श्रीरामनाम आइकिला गजर । तैसेचि धांविन्नले स्वामी गंगाधर । बंधू बंधूसी भेटीं कोटि आनंद अपार । श्रीरघुवीर उभयभागीं सारिखा ॥ ९५ ॥ श्रीसमर्थें श्रीश्रेष्ठस्वामी साष्टांगें वंदिले । शिष्यवर्गही लोटांगणीं धांविन्नले । भाविकीं श्रीश्रेष्ठचरणीं मस्तक ठेविलें । गौरवें आले सदनासी ॥ ९६ ॥ माता राणाऊ बाहेरी आली । देखतां श्रीसमर्थें साष्टांगें वंदिली । ब्रह्मानंदीं टाळी लागली । देहबुद्धि हरली मातेची ॥ ९७ ॥ क्षणीं आली शुद्धीवर । आनंदें चालिले कुशळोत्तर । धन्य नारोबाचा भक्तियोग अपार । ऐसी वारंवार जननी वदे ॥ ९८ ॥ नारोबा तुझा भक्तिपुरुषार्थ देखोन । माझें चित्त जालें सुप्रसन्न । हे तुझे समुदाईजन देखोन । मज अमरगण भासती जननी ह्मणे ॥ ९९ ॥ तंव सकळांसी प्रेमाश्रुपूर भरले । सकळीं वारंवार जननीचरण वंदिले । जननीनें सकळांसीं आसिर्वाद दिधले । आनंदले परिवारजन ॥ १०० ॥ श्रीसमर्थ आले जांबनगरीला । तंव पुढें नवमीउत्साव आला । नवमी नउ दिवस नवरात्राला । जांब नगरीला उत्साव भारी ॥ १ ॥ श्रीश्रेष्ठप्रभूचा भक्तियोग । वर्णिला भक्तिरहस्य कथारंग । गंगातीरस्थ श्रवण मनन करिती

चांग । सर्वकाळ श्रीरंग आठविती ॥ २ ॥ श्रीनउमीउत्सवा-कारणें । अपरिमित भक्तगण येती धांवोन । दिंड्यापताका हरि-कीर्तन । रसाळ निरूपण होतसे ॥ ३ ॥ अपरिमित यात्रा लोटे । उत्साव करिती अत्यंत नेटे । श्रीरामनाम गर्जती घडघडाटें । एकनिष्ठ एकविध श्रद्धा अंगीं ॥ ४ ॥ जांबेचा प्रतिवार्षिक उत्साव चाले । संप्रती विशेष श्रीसमर्थ आले । तेणेगुणें हरुषभरलें । विशेष मिळाले भक्तपाळ ॥ ५ ॥ श्रीसमर्थ करिती हरिकीर्तन । तेणें प्रेमें डोलती भाविकगण । श्रीरघुवीरनाम अत्यंत गहिंवरोन । गगन गर्जोन गर्जविती ॥ ६ ॥ नामघोष करटाळी । एकचि टाळ घोळ मृदंग धुमाळी । थैकारती प्रेम सम्मेळीं । हातोंपाळी श्रीरामनाम घेती ॥ ७ ॥ श्रीरामनामाच्या गर्जनें । श्रीसमर्थ घेती थैकार उड्डाण । भाविक भोळे नाचती अति सत्राण । जांब भुवन श्रीराममय जालें ॥ ८ ॥ श्रीसमर्थकीर्तनाच्या मेळीं । भाविक प्रेमें पिटिती करटाळी । नामस्मरणें धवळलीं अंतरमेळी । हृदयकमळीं श्रीराम आला ॥ ९ ॥ श्रीरामनामस्मरणें । एकाकी देहभावातें विस्मरणें । परब्रह्मपदवीतें पावणें । यवढें महिमान नामाचें ॥ १० ॥ श्रीस-मर्थें श्रीरामनाम वाढविलें । श्रीरामनामीं प्रगट सामर्थ्य दाविलें । असंख्य जडजीव उद्धरिले । भवजळनिधी तारिले चराचर ॥ ११ ॥ श्रीसमर्थरामदास कीर्तन करिती । मातुश्री श्रेष्ठ श्रवणा बैसती । अपरिमित भाविक श्रवणा धांवती । अनुभव सप्रचीती कीर्तन चाले ॥ १२ ॥ श्रीरामावतार महिमान । श्रीसमर्थ वर्णिती निजांगें आपण । सप्रचीत निजानुभव दाऊन । श्रीरघुनन्दन वर्णिती ॥ १३ ॥ आइका नवमी उत्साव चालिला । दशमीं पारणीं भोजनसमारंभ आला । घृत यावया विलंब लागला । पंगती तिष्ठल्या घृताकारणें ॥ १४ ॥ कारभारी पडिले चिंतावर्ती । घृतास्तव तिष्ठल्या पंगती । श्रीसमर्थ विलंबाकारण

पुसती । कारभारी सांगती घृत बोलाविलें न आलें ॥ १५ ॥ श्रीसमर्थ कारभारियांसी सांगती । हे आधींच पाहिजे तरतुदी । ऐसे ह्मणोनि मागती कुंभाप्रती । मंगळपूजनें जळें भरविला ॥ १६ ॥ ह्मणीं कुंभपूजन केलें । कानवडें न करितां जळ काढविलें । तें होतें जळ घृत झालें । पुरोनि उरलें असंख्य पंगती ॥ १७ ॥ सकळ उत्सवासीं घृत । एकल्या कुंभांतील पुरत । उदंड उचंबळोनि शिगे भरत । अत्यंत कौतुक श्रीसमर्थें दाविलें ॥ १८ ॥ आनंदें उत्साव सम्पादिला । श्रेष्ठपुत्र सांगती श्रेष्ठस्वामीला । विशेषें वर्णिती जळमय घृताला । दाविती कुंभाला ज्या त्या लागुनी ॥१९॥ श्रीश्रेष्ठ ह्मणती सांप्रत कोण महती । समर्थें केली परंपरेची निश्चिती । काळजी जतन करावें कुंभाप्रती । श्रीसमर्थकृती काय एक न करील ॥ २० ॥ तो अद्यापवरी कुंभ रक्षिला । घृत पुरवितसे उत्सवाला । प्रत्यक्ष पहावें प्रचीतीला । जांब नगरीला नवमी उत्सवीं ॥ २१ ॥ जांबेंत नवमी उत्साव जाला । श्रीसमर्थें कृष्णातिरा यावया निरोप घेतला । नगरजन वंदिती श्रीसमर्थ प्रभूला । आनंद सकळां श्रीसमर्थ भेटी ॥ २२ ॥ श्रीसमर्थ जांबेहून चालिले । ते मातापूर ठाकोनि आले । तेथें अपूर्व चरित्र केलें । अवधारिलें पाहिजे श्रोतीं ॥ २३ ॥ मातापुरी मातेचें दर्शन केलें । श्रीदत्तात्रयस्थान पावले । तंव तेथ द्विज अनुष्ठानीं बैसले । श्रीदत्तात्रयदर्शनाला इच्छिती ॥ २४ ॥ श्रीसमर्थें द्विजवरां प्रश्ण केला । जी कोण कारण अनुष्ठान योगाला । द्विजवर सांगती इच्छितों श्रीदत्तात्रयदर्शनाला । मनीं आवडला तोचि प्रभू ॥ २५ ॥ बरें तरी तुह्मा पुण्यवंता संगती । श्रीसमर्थ ह्मणती आह्माही घडो त्याची भेटी । ऐसें ह्मणोनि ध्यानस्त होती । उद्धव कल्याण बैसती ध्यानस्त ॥ २६ ॥ एक मुहुर्तमात्र गेला । श्रीदत्तात्रय परिवारेसीं आला । धरिलें

मलींग फकीर वेषाला । विचित्र वर्तनाला आदरिलें ॥ २७ ॥ स्त्री मुलें लेंकुरें । बैसवोनि आणिलीं रेडयावर । कोंबडया श्वान परिवार । चिळसी फार उपजविती ॥ २८ ॥ द्विजवर बैसले गाभारीं । मलंग उतरले मंडपाभीतरीं । कांतेलागीं आज्ञा करी । पाकसिद्धी करीं कां ॥ २९ ॥ क्षणीं स्त्रियेनें आज्ञा वंदिली । वैलावरी हंडी चढविली । कवण पाकनिष्पत्ती पुसिली । मलिंगें सांगीतल्या कोंबडया ॥ ३० ॥ तंव हंडी रितीच उरली । बकरीं शिजवावया आज्ञा केली । तरीही हंडी रिती उरली । मलिंगें लेंकुरें कांपिली शिजवावया ॥ ३१ ॥ तरीही हंडी रिती देखिली । येरीनें भर्त्यासीं निवेदिली । तंव मलिंगें हांक फोडिली । जें हीं ब्राह्मणें शिजविलीं पाहिजे आतां ॥ ३२ ॥ तो शब्द द्विजवरीं कानीं आइकिला । तंव पोटीं अत्यंत धाक भरला । शरीरीं अत्यंत कंप भरला । जो तो पळाला अनुष्ठान सांडुनी ॥ ३३ ॥ भक्ति कठिण सुळावरील पोळी । कहीं एकादा निवडे वैष्णव बळी । जयाचेनि भजनें प्रगटे वनमाळी । विघ्न कळिकाळां करवेना ॥ ३४ ॥ भगवद्भ-जन आरंभितां । विघ्नें उचंबळती सभोवता । त्यांसी अंतर्बाह्य व्यापकता । भक्तचित्ता भंडाविती ॥ ३५ ॥ करूं ह्मणतां भग-वद्भजन । पिशुनें ताडिती निरुत्साह वचनें करोन । धरूनि बैसतां भगवद्ध्यान । कठोर वचनें ध्यानातें भंगविती ॥ ३६ ॥ उपदेशिती प्रपंच नेटका करीं । द्रव्य मेळवावें राशीवरी । पुढें नि-वांत चित्तें श्रीहरी । वार्धक्यामाझारीं आठवे कां ॥ ३७ ॥ अहो जी कठिण संसारबंधन । हरिभजनीं विघ्नें वोढवती अति दारुण । आलस्य निद्रा निरुत्साह येवोन । मन विषयीं भरोन भक्ति अंतरवी ॥ ३८ ॥ भक्ति करितां दंभ उपजे । तेणेंगुणेंही भग-वंत अंतरिजे । महंतीचा अहंकार शिरीं गाजे । संसारीं सहजें हांसती ॥ ३९ ॥ सत्छास्त्र आणि सत्संगती । येणें मार्गें आकळे

श्रीपती । याविण भ्रमता कल्पांतीं । श्रीरघुपती न भेटिजे ॥४०॥ लौकिक ज्ञान उदंड जाले । परी तें भक्तीविण वायां गेलें । भक्तिवंत वैकुंठीं चढले । संसारीं बुडाले रवरवीं ॥ ४१ ॥ श्रीगुरुपदीं लीन व्हावें । तेणें श्रीरघुनाथ अंतरीं ठसावें । याविण करितां व्यर्थ शिणावें । फेरे फिरावे कोटिजन्मवरी ॥ ४२ ॥ असो द्विजवर ध्यानीं बैसले । परी ते माईक ध्यानें भरिले । विघ्न श्रवणीं पडतां पळाले । अनुष्ठान राहिलें ठाईंच्या ठाईं ॥ ४३ ॥ भगवत्प्राप्ती लागून । पाहिजे निर्वाण निर्धार भजन । गृहदारापुत्रार्पण । सर्वस्वेसीं प्राण तोही वेंचावा ॥ ४४ ॥ तो भक्तियोग नाहीं ठावा । ह्मणती आह्मांसी अत्रितनय भेटावा । येथ श्राद्धपितरभोजनयोगाचि बरवा । देह पुष्ट तुष्ट करावा परान्न भोजनीं ॥ ४५ ॥ कैचें द्विजवरासीं भजन । वृथा अहंकार ताठा भरोन । नुसतें करिती वेद पारायण । द्रव्यालागून भजिन्नलें ॥ ४६ ॥ माइक भाव धरिती । श्रीमद्भागवत सांगती । केवळ शब्दप्रवाहें वागूजलपती । अनुभव नेणती ग्रंथगर्भींचा ॥ ४७ ॥ असो ऐसे ते द्विजवर । अनुष्ठान सांडोनि पळाले दूरवर । केवळ त्रिवर्ग मात्र उरले निर्धार । उद्धव कल्याण दातारश्रीसमर्थ प्रभू ॥ ४८ ॥ द्विजवर पळतां श्रीदत्तात्रय प्रगटले । श्रीसमर्थांसन्निध आले । त्रिवर्गीं नेत्रीं भरोनी पाहिले । साष्टांगें वंदिले त्रिवर्गीं ॥ ४९ ॥ श्रीसमर्थ ह्मणती श्रीदत्तात्रया । द्विजवरां धाक दाविला कासया । श्रीदत्तात्रय सांगती द्विजभाव माईक माया । भेटावया मी न प्रगटे ॥ ५० ॥ तुह्मी निग्रही त्रिवर्ग भले । मज तुह्मां कारणें येणें घडलें । ऐसें ऐकतां श्रीसमर्थें साष्टांग दंडवत घातिलें । उद्धवें कल्याणें वंदिलें साष्टांगेंसी ॥ ५१ ॥ श्रीसमर्थें दत्तात्रया विनविलें । जे द्विजवरां पाहिजे दर्शन दिल्हे । द्विजवरां आणावया उद्धवा पाठविलें । तंव ते द्विजवर भ्याले पळ काढिती

॥ ५२ ॥ उद्धवें बहु बहु कष्टें भेटी घेतली । श्रीसमर्थचरणीं विप्रें घातिलीं । श्रीसमर्थें श्रीदत्तात्रय दर्शना राहविलीं । चमत्कार बोलीं द्विजवर राहिले ॥ ५३ ॥ सकळ द्विजवरां स्नानें करविलीं । पाकनिष्पत्ती अकस्मात प्रगटविली । द्विजवरीं श्रीसमर्थचरणीं साष्टांग नमनें अर्पिलीं । अनुग्रह घेतिले श्रद्धापूर्ण ॥ ५४ ॥ श्रीसमर्थप्रभूचा अनुग्रह घेतिला । तेणें प्रत्यक्ष श्रीअत्रितनय प्रगटला । सकळ विप्रां ब्रह्मानंद कोंदला । परब्रह्म पदवीला संतकृपें पावलें ॥ ५५ ॥ यापरी द्विजवर भजनीं लाविले । श्रीदत्तात्रय वंदोनि श्रीसमर्थ चालिले । पंथ क्रमितां ठाकोनि आले । इंदुरबोधन नगराला ॥ ५६ ॥ श्रोतीं सावधान चित्त करावें । श्रीसमर्थलीलाचरित्र परिसावें । नानाचमत्कार लीला स्वभावें । श्रीसमर्थ देवें दाविल्या ॥५७॥ इंदुरबोधनीं आवर्षण पडिलें । ग्रामाधिकारी द्विजवर अनुष्ठानीं वैसविले । सुवर्ण दक्षणा दान विशेष संकल्पिलें । द्विजवरांसी सांगितलें पर्जन्य आणा ॥ ॥ ५८ अनुष्ठानावरी अनुष्ठान । करितां पडेचिना पर्जन्य । विप्रवर कंटाळले मनांतून । परी द्रव्यलोभ दारुण न सुटेचि ॥ ५९ ॥ धिग् धिग् द्रव्यलोभ खोटा । द्रव्याकारणें भांडती हटा तटा । बंधू बधूसीं विकल्प फांटा । होवोन उफराटा भांडती ॥ ६० ॥ द्रव्याकारणें विरुद्ध आलें । द्रव्याकारणें वैरत्व वाढलें । द्रव्याकारणें विभक्त जाले । द्रव्यें नागविलें परमार्था ॥ ६१ ॥ द्रव्याकारणें मायबाप छळी । द्रव्याकारणें भगवद्भक्ती टाळी । स्त्री घेवोनियां वेगळी । सर्वकाळीं द्रव्यार्जन आवडे ॥ ६२ ॥ असो द्विजवरां कष्ट जाले । पर्जन्यें विरुद्ध केलें । तंव तेथ चमत्कार लीले । श्रीसमर्थ आले ठाकोनी ॥ ६३ ॥ श्रीसमर्थ पुसती द्विजवरांसी । कोण कारण अनुष्ठानासीं । द्विज सांगती पर्जन्यवृष्टीसी । सर्वकाळ मानसीं इच्छितों ॥ ६४ ॥ श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । ह्मणती काल-

मान किती क्रमिलें । विप्रीं दशमास निवेदिलें । वेदमंत्र बौद्ध जाले पर्जन्य नयेची ॥ ६५ ॥ तंव श्रीसमर्थें अभय दिधलें । सांगती आह्मी बैसतों अनुष्ठानीं भले । तुह्मी श्रीरामनाम गर्जा निर्मळ । मुसळधारा जळ वाहऊं आजी ॥ ६६ ॥ श्रीसमर्थें द्विजवरा बाहेरी पाचारिलें । आंत आपण प्रवेशले । पाषाणीं प्रतापरुद्र रेखाटिले । छाटीसीं घातिलें झांकाळोनी ॥ ६७ ॥ बाहेरी येउनी द्विजवरांसी सांगितलें । जें आह्मी प्रतापरुद्रासी आणिलें । तुह्मी त्यांसी लघुरुद्र करा वहिलें । पर्जन्य तत्काळ वर्षेल ॥ ६८ ॥ तंव विप्रीं लघुरुद्र केला । पर्जन्य मुसळधारीं वर्षला । श्रीसमर्थें श्रीहनुमंत उघडोनि दाविला । सकळीं अवलोकिला हरुषभरीं ॥ ६९ ॥ जणूं पाथरवटीं घडिला । ऐसा श्रीहनुमंत मुर्तीतें पालटला । विप्रवरां कोटि आनंद वाटला । उत्साव मांडिला ग्रामाधिकारीं ॥ ७० ॥ श्रीसमर्थ बैसले जेथें । पर्जन्य वर्षेना तेथें । ग्रामाधिकारी आले धांवत । द्विजवरां आनंद संतुष्ट करावया ॥ ७१ ॥ ग्रामाधिकारी द्विजवरां स्तविती । तंव ते झणीं त्यांसी वारिती । ह्मणती हे पावली श्रीसंतमूर्ती । पूजन संप्रती करा ययांचें ॥ ७२ ॥ जनांसीं श्रीहनुमंत दाविला । द्विजवरीं साद्यंत वृत्तांत निवेदिला । श्रीसमर्थ रामदास कळले सकळांला । लोटांगणाला वारंवार घालिती ॥ ७३ ॥ श्रीशिवछत्रपतींचा श्रीगुरू । तोचि हा श्रीसमर्थ दातारू । वारंवार जननम्रभावें करिती नमस्कारू । पूजा संभारू आणविला ॥ ७४ ॥ श्रीसमर्थांकारणें उत्साव गाजला । श्रीसमर्थकृपें पर्जन्य वर्षला । श्रीसमर्थवचनीं जन सुपंथीं लागला । श्रीसमर्थमहिमेला काय ह्मणोनि वर्णावें ॥ ७५ ॥ श्रीरामनामाच्या कल्लोळीं । जन लोळती श्रीसमर्थचरणातळीं । सौख्य पावले जाहले बळी । हातोफळीं कळिकाळासीं घेऊं ह्मणती ॥ ७६ ॥ उदंड भक्त मातले । श्रीसमर्थनामीं देहबुद्धीतें विसरले । परमानन्दीं रि-

घाले । विषय चाळे नेणती ॥ ७७ ॥ एक गर्जती नामस्मरण । एकास लागलें स्वरूपध्यान। एकास अखंड दंडायमान । कीर्तनश्रवण आवडलें ।।७८।।एक एकाकार होवोनि राहिले । एकें असते चिठाईं गुप्त जाले । एक हेळामात्रें वैकुंठीं चढले । कलीं दाविलें आश्चिर्य सकळां ।।७९।। सत्संग आणि नामस्मरण । येणें तत्काळचि उद्धरण । श्रीसमर्थरामदास वोळला पूर्ण । इंदुरबोधन पवित्र केलें ॥ ८० ॥ नगरजनीं आग्रह धरिला । यालागीं श्रीसमर्थें मठ संस्थापियला । अल्पकाळ राहिले वसतीला । मठ निरविला श्रीउद्धवस्वामीप्रती ॥ ८१ ॥ श्रीउद्धवस्वामी महंत । सिद्धपदवीचा प्रतापवंत । श्रीसमर्थप्रभूचा नित्यांकित । मठीं राहत श्रीसमर्थआज्ञें ॥ ८२ ॥ मागां टाकळीं चरित्र जालें । श्रीसमर्थदेवें प्रेत उठाविलें । साध्वीनें पुत्ररत्न अर्पिलें । ते हे भले श्रीउद्धवस्वामी ॥८३॥ उद्धवा विरहव्यथा दाटली । देवें समाधान वचनें वोलिलीं । नवमी उत्सवासीं चाफळीं । यावें अळुमाळीं श्रीसमर्थें सांगितलें ॥ ८४ ॥ इंदुरबोधनीं मठ संस्थापिला । उद्धवस्वामीसीं तो निरविला । श्रीसमर्थ आले कृष्णातटाला । शिवरायाला परमानंद ॥ ८५ ॥ श्रीसमर्थ भेटीसीं शिवराय आले । श्रीसमर्थप्रभू साष्टांगेंसी नमिले । श्रीचरणीं कार्य सिंहावलोकन केलें । श्रीसमर्थें दिधले धन्यवाद ॥ ८६ ॥ श्रीसमर्थकीर्तीचें महिमान । दूरवर गेलें पसरोन । कामुक दुःखी कष्टी येती धांवोन । दुःख परिहरण इच्छिती ॥ ८७ ॥ पैठणींचा एकनाथ ब्राह्मण । व्हावया आला दरिद्रपरिहरण । श्रीसमर्थचरणीं घाली लोटांगण । त्यासीं श्रीसमर्थें राहवोन घेतिलें ॥ ८८ ॥ चमत्कारलीला द्रव्य पाठविलें । तें एकनाथ विप्रासीं नाहीं कळलें । दुःखकष्टें गृहीं जातां जाणवलें । अपरिमित देखिल्या द्रव्यराशी ॥ ८९ ॥ कौतुकें परिवारेंसीं द्विज धांवला । परतोनि श्रीचरणीं लागला । लागवेगीं घेतलें अनुग्रहाला । सर्वकाळ

स्मरला श्रीरामनाम ॥ ९० ॥ आइका कैसें चरित्र जालें । श्रीसमर्थ श्रीजयराम मिरजेसीं आले । श्रीजयरामीं रात्रौ कीर्तन आदरिलें । श्रीसमर्थ बैसले कीर्तनमेळीं ॥ ९१ ॥ कीर्तनीं अत्यंत रंग भरला । श्रोतयां मनीं भक्तिभाव बिंबला । तंव समनापीरदर्शनाला । खान निघाला परिवारेसीं ॥ ९२ ॥ तेणें हुजरियांसीं पुसिलें । जे हे कोण तमाशे चालिले । हिंदुफकीरकीर्तन कळलें । श्रवणा राहिले किंचित्‌मात्र ॥ ९३ ॥ श्रीजयराम स्वामीचें निरूपण । सिद्धपुरुष आणि भक्तियोग परिपूर्ण । कीर्तनीं केलें निरूपण । मुख्य प्रतिपादन सत्संगें श्रीराम तत्काळ भेटे ॥ ९४ ॥ खानें इतुकेंचि मनीं धरिलें । परीदर्शनोत्तर निजमंदिरीं आले । येरीकडे कीर्तन आटोपलें । जन गेले आपुलाल्या स्थळा ॥९५॥ श्रीसमर्थ गेले कृष्णास्नाना । श्रीजयराम आले विश्रांतिसदना । तंव खानें काय केली विचारणा । स्वामीसीं सुखासन पाठविलें ॥ ९६ ॥ श्रीजयरामा सुखासन पाठविलें । आदरें निज दरबारीं पाचारिलें । श्रीजयरामें श्रीसमर्थांसीं स्मरलें । सुखासनीं गेले दरबारीं ॥९७॥ श्रोते हो आइका नवलविंदान । प्रथम भेटीं आदरयुक्त संभाषण । क्षणींच आणिलें ताटीं मांस भरोन । स्वामी पुढें ठेविलें ॥ ९८ ॥ सत्संगें तत्काळ श्रीरामदर्शन । होय ऐसें आपुलें निरूपण । अजि मजही घडला सत्संग परिपूर्ण । श्रीरघुनन्दन दाखवा खान ह्मणे ॥ ९९ ॥ जयराम सांगती सत्संग कीजे । उपरी साधन अभ्यास आदरिजे । तेणें अल्पकाळें भेटे रघुराज । द्वैताचें फुंज मावळतां ॥२००॥ खान विकल्पी मनीं । स्वामीवाक्य तो न मनी । स्वामीपुढें ठेविलें मांस आणुनी । यवनत्वा लागुनी स्वीकारा ह्मणे ॥ १ ॥ जयराम ह्मणती आमुचा स्वामी । श्रीसमर्थरामदास बोलावितों आह्मी । तो तुह्मां करवील भेटी श्रीरामीं । सत्य समर्थस्वामी श्रीरामदास ॥ २ ॥

तंव गोपाळ शिष्य पाठविले । तिहीं कृष्णेंत श्रीसमर्थ वंदिलें । जालें वर्तमान निवेदिले । श्रीसमर्थ हांसले वेणाई कल्याणा देखोनी ॥३॥ आलिया शिष्यालागून । श्रीसमर्थ कांहीं न बोलती वचन । तो श्रीगुरू व्यथेनें पिडिलासे दारुण । श्रीसमर्थ अंतःकरण जैसें तैसें ॥ ४ ॥ त्यासीं वेणाबाईनें खुणविलें । श्रीसमर्थ येतील जाणविलें । ऐकतांचि गोपाळ धाविन्नला । नवल पूर्वींच प्रगटलें श्रीसमर्थसंकटीं ॥ ५ ॥ श्रीसमर्थ पुसती खानासी । तूं ह्मणीं श्रीरामदर्शन इच्छिसी । हा तरी संतोष असुचे मानसीं । चलावें सज्जासीं तटबंदीं ॥ ६ ॥ परिवारेसीं तटावरी आले । तंव सफेवरुनी श्रीसमर्थ उडाले । तळींहूनि जयरामासीं खुणाविलें । जयराम उडाले श्रीसमर्थरीती ॥ ७ ॥ उभयतां तळीं खान तटावरी । खान चमत्कारचित्तें पोटीं थरारी । श्रीसमर्थ सांगती येचि मार्गें येईं सत्वरीं । श्रीकोदंडधारी उभा येथें ॥ ८ ॥ हें तरी खानासीं न चले । हिंदुसाधुत्व त्यासीं मानलें । लोटांगणीं श्रीसमर्थ श्रीजयराम वंदिले । वारंवार विनविलें क्षमा करा ह्मणोनी ॥ ९ ॥ खानें अत्यंत आग्रह घेतला । श्रीसमर्थ प्रभूचा अनुग्रह चिंतिला । श्रीसमर्थ कृपाळु बोलला । यवन लाविला श्रीरामभजनीं ॥ १० ॥ श्रीसमर्थदेवें कौतुक दाविलें । यवनदरबारीं श्रीरामनाम गर्जाविलें । श्रीसमर्थ जयराम साधू गाजले । यवन वोशाळलें अत्यंत मानसीं ॥ ११ ॥ ऐसा मिरजेसीं चमत्कार केला । श्रीसमर्थ आले चांफळाला । वारंवार उजाळिती भक्तिपंथाला । विश्वजनाला तारकू ॥ १२ ॥ श्रीसमर्थें चमत्कार केला । कल्याणासीं दिव्य कित्ता दिधला । एकाकीं झोळींतूनि काढिला । त्या दिव्य वाणीला कवणाही नेणवे ॥ १३ ॥ एक श्रीसमर्थ जाणती । कां ते कल्याण वाचिती । इतरां पडे गुंतागुंती । अक्षर पंगती दिव्यवाणी ॥ १४ ॥ श्रीकल्याण मठीं आहे । जा डोळांभरी कित्ता पाहे । श्रीसमर्थ

समर्थप्रभू निःसंदेहे । विश्वाचि हें उद्धरिलें ॥१५॥ आइका भूपतीसीं दिव्य अश्व नजर आला । तेणें तो श्रीसमर्थप्रभूसीं समर्पिला । अत्यंत चपल न करवे आरोहणाला । श्रीसमर्थें स्वारीला केलें ॥१६॥ अश्वावरी स्वार जाले । नदी पर्वत वोलांडिले । बहू दुरी जातां तृषेनें पीडिलें । तेथें अकस्मात पुरविलें उद्धवें जळ ॥१७॥ तेथें श्रीसमर्थ प्रभू संतुष्टले । उद्धवा शिवनामें भूषविलें । उद्धवें निजकाव्यलेखन केलें । शिवनाम ठेविलें पदपदांतरीं ॥ १८ ॥ श्रीसमर्थरायाची कथा । संतोष वाटे गातां ऐकतां । तरी सावधान चित्त असावें श्रोता । श्रीसमर्थकथा परिसावया ॥ १९ ॥ चांफळीं श्रीसमर्थ मुख्यासनीं । परिवार भक्तगण बैसले येवोन । शिवराज आले श्रीसमर्थदर्शनालागून । लोटांगणीं श्रीसमर्थ वंदिले ॥ २० ॥ बहुमोल आभरणें आणिलीं । तीं श्रीसमर्थअंगीं लेवविलीं । सुदिव्य आसनीं विजविलीं । श्रीसमर्थमाउली कृपाळू ॥ २१ ॥ तंव श्रीसमर्थें दाविला चमत्कार । थबथबां भिजले श्रीसमर्थ वस्त्रालंकार । सभा देखतां चकित जाली अरुवार । शिवराज स्वामीसमोर सरसावले ॥ २२ ॥ शिवरायें श्रीसमर्थवस्त्र पिळिले । श्रीसमर्थें तें जळ जिव्हेवरी घेवविलें । तें अत्यंत क्षार जाणवलें । जिव्हेवरी न धरवेची ॥ २३ ॥ देवें दिनमान सांगितलें । तिथीवार ध्यानीं धरविलें । समुद्रीं देवें चरित्र कीर केलें । तारवा तारिलें समुद्र वादळीं ॥ २४ ॥ तो तारिला भक्त भेटीं आला । श्रीसमर्थचरणीं अपरीमित्य द्रव्यभाग समर्पिला । शिवराय मनीं चमत्कारला । धरिलें आठवलें दिनमान ॥ २५ ॥ भक्त समुद्रजळीं पीडिला । अत्यंत करुणा श्रीसमर्थ स्मरला । श्रीसमर्थप्रभूसभे बैसोनि पावला । श्रीसमर्थलीला काय एक न करी ॥ २६ ॥ सकळीं श्रीसमर्थनामघोष केला । सकळीं श्रीसमर्थप्रभू साष्टांगें अभिवंदिला । भाविकां श्रीसमर्थ परमात्मा वोळला । कळिकाळाला चरणातळीं ठेंचिती ॥ २७ ॥ श्रीसमर्थचरित्र

विस्तार । उदंड आणि अपरंपार । तें मंथोनि काढावें सार । आज्ञा निर्धार श्रीसंतांची ॥२८॥ आवडी माझिये मनीं । उदंड गावें चरित्रालागुनी । पुढतपुढती गुणकीर्तनीं । अनुदिनीं म्यां रमावें ॥ २९ ॥ येणें मनकामना पुरतील । बाप श्रीसमर्थकृपा वोळेल । श्रीसमर्थकथा विस्तरेल । पारणें होईल भगवज्जना ॥ ३० ॥ श्रीसमर्थचरित्र ऊण खूण । एक श्रीसमर्थ जाणती आपण । कां वेणाई उद्धव कल्याण । चरित्र गुह्य परिपूर्ण ते जाणती ॥ ३१ ॥ मी तंव शुद्ध मतिमंद पामर । श्रीचरणींचा कनिष्ठ किंकर । श्रीसमर्थनाम स्मरावें निरंतर । कथा गुणगंभीर किंचित्‌मात्र गातों ॥ ३२ ॥ ते माझे बोबडे बोल । श्रवण करितां श्रीसंत देती डोल । गातां ऐकतां श्रीसमर्थ तारील । श्रीसंत सखोल बोलती ॥ ३३ ॥ श्रीसंतवचनीं विश्वासलों । श्रीसमर्थनामगुणीं रंगलों । श्रीसमर्थनामीं तृप्ती धालों । धन्य धन्य जालों चरित्र गातां ॥ ३४ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ २३५ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत । भिमूविरचितायाम् जांबपुनरागमनन्नाम द्वादशप्रसंग संपूर्ण

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥ ७ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १३ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



मनचि हातीं यावें । मनेंचि भगवंता शरण रिघावें । मनेंचि सर्व कांहीं दुऱ्हावें । पांगिलें व्हावें भगवंता ॥ १ ॥ मनाचि इंद्रियांचा राजा । ययाचीच आधीं सर्वभावें पूजा । येणें पूजनें गरुडध्वजा । बरवें वोजा पाविजे ॥ २ ॥ सकळ इंद्रियांत सहजपणीं । मनाचि

विराजे मुगुटमणी । एक्या मनाची करितां मनधरणी । चक्र-
पाणी वोळंगिजे ॥ ३ ॥ यया मनाचें एक बरवें । जें देखिलिया
ठायासी लोभावें । येणें करितां सर्वभावेंसीं गुंतवावें । भजन-
भावें सर्वकाळीं ॥ ४ ॥ मन मुरडल्या इंद्रियें मुरडती । मन
आकळल्या इंद्रियें आकळती । मन स्थिरावल्या इंद्रियें स्थिरा-
वती । सत्य प्रचिती मन आकळल्या ॥ ५ ॥ मनें केल्या सिद्ध
होय । मनें अव्हेरिल्या विघडोनि जाय । यालागीं मनासीच
लावावी सोय । भगवंतपाय प्राप्तीसीं ॥ ६ ॥ मनासीं लाविजे
छंद । वाचे सर्वकाळ गोविंद गोविंद । येणें करितां निर्द्वंद्व ।
भेदाभेद मन विसरे ॥ ७ ॥ मनासी नामस्मरण करवावें । अवि-
श्रतां तेंचि असों द्यावें । मनेंचि वस्तुरूप होआवें । प्रत्यक्ष अनु-
भवावें आत्मस्वरूप ॥ ८ ॥ संतीं सांगीतली खूण । हातीं टाळी
मुखीं नामस्मरण । आवडीं करावें नर्तन । निर्लज्यपण हरि-
भक्ती ॥ ९ ॥ यया मनाचें स्वैर वर्तन । आकळावया मुख्य
साधन । व्हावें संतचरणीं लीन । मन आकलन सहज होये
॥ १० ॥ सत्संगेंविण साधन नाहीं । सत्संगेंविण परमार्थ नाहीं ।
सत्संगेंविण कांहींच नाहीं । सत्संगें सोई मन लागे ॥ ११ ॥
अलभ्यतावस्तू जोडती । व्याघ्रसिंहदुग्धही ये हातीं । प्रयत्नें
चंद्रामृताची प्राप्ती । परी संत भेटीप्रती अति दुर्लभता ॥१२॥
अलभ्यतावस्तू जोडती । वैकुंठ कैलास ये हातीं । परी ह्या
सत्संगतीची प्राप्ती । कदा कल्पांतीं घडेना ॥१३॥ कोटी जन्म-
वरी भगवंत आराधिजे । कोटी जन्मवरी तीर्थक्षेत्रा जाइजे ।
निष्कामता पुण्य कोडी वरी सम्पादिजे । तरीच पाविजे श्रीसं-
तचरण भेटी ॥ १४ ॥ यया सत्संगतीकारणें । योगिये शिणती
रात्रंदिनें । ब्रह्मादिकां दुर्लभ श्रीसंतचरण । यमधर्म आपण
भेटीस्तव तिष्ठतू ॥ १५ ॥ यालागीं संतदर्शनीं । मन विरे मन-
पणीं । निजस्वरूपानुसंधानीं । सहजें सहजपणीं स्थिरावें

॥ १६ ॥ क्षणएक होतां सत्संगती । मनासीं नामस्मरणीं उपजे प्रीती । सर्वभावें आवडे साधन संपत्ति । अहोरातीं भगवंत आवडे ॥ १७ ॥ तेचि एक परम भाग्याचे नर । ज्यासीं सत्संगती निरंतर । सर्वकाळीं नाम घोष गजर । पळभर विश्रांती नाहीं ॥ १८ ॥ यापरी सर्वकांहीं मनाधीन । तें मन करावें श्रीसंतचरणीं लीन । सर्वभावें श्रीसंतभजनीं अनन्य । ब्रह्म पूर्ण अनुभवासि ये ॥ १९ ॥ असो आतां बहू भाषण । मागील प्रसंगीचें अनुसंधान । श्रीसमर्थें समुद्रीं केलें भक्त संरक्षण । सभे बैसोन अवलीळा ॥ २० ॥ श्रीस्वामीलीला अपार अपरंपार । तितुकी आकळावया मज सामर्थ्य ना धीर । चरित्र मंथोनि काढावें सार । सत्य साचार संताज्ञा ॥ २१ ॥ शक्तिसामर्थ्य पाहोन । वोझें उचलिजे निवडून । वृथा हांव धरिलिया अडखळोन । अंगें आदळोन श्रम पावावें ॥ २२ ॥ आपुलिया भक्तिभावें । भगवंत गुणानुवाद गावे । येणें भक्तिस्तव भगवंत संतोष पावे । भक्ति दुणावे यथानुक्रमें ॥ २३ ॥ असो श्रीसमर्थश्रीरामउपासना । भेदोनि चालिली गगना । नेणती अन्य भजन अन्य तीर्थाटणा । श्रीरघुनन्दनावांचोनी ॥२४ ॥ लवपळ क्षणमात्र कांहीं । श्रीसमर्थदेवा विश्रांति नाहीं । दुरी दूरस्थ येती पायीं । तयांच्या दुरींत डोहीं उडी घालिती ॥२५॥ देशोदेशीं अवकळा उठी । धांवण्या धांवती श्रीसमर्थ संकटीं । भजन चमत्कार उठाउठी । भयसंकटीं क्षेम देती ॥ २६ ॥ श्रीसमर्थप्रभूसीं पळभरी । स्थिरता नाहीं निर्धारीं । दुःख दुरिता निवारीं । चराचरीं संरक्षिता ॥२७॥ श्रीसमर्थदेवा नाहीं अन्नपान । नित्य निरंतर फळभोजन । निद्रा नाहीं पळ अर्धक्षण । गिरिकंदरीं बैसोन जनदुःखपरिहार पाहती ॥ २८ ॥ देशोदेशींचे दुःखिस्त येती । श्रीसमर्थ कुशळ प्रश्ण पुसती । विघ्नारिष्ट ऐकतां तत्काळ धांवती । दुरितें वारिती निजसामर्थ्यें ॥ २९ ॥

जीवभूत होता जाजावला । त्याचा श्रीसमर्थदयाळें कैवार घेतला । महाराष्ट्रदेशीं मंगळघोष दाटला । श्रीरामनामाला सकळ स्मरती ॥ ३० ॥ चंद्रभागा वाळुवंटीं । श्रीविठ्ठलें श्रीसमर्थ आणिलें उठाउठी । वैष्णवा दृढालिंगनीं भेटी । स्नेहपरिपाटीं घेतल्या ॥ ३१ ॥ श्रीसमर्थसामर्थ्य भारी । श्रुत जालें हो दूरवरी । ते श्रीसमर्थ प्रगट दिसतां चंद्रभागेतिरीं । संत निर्धारीं पूजूं धांवले ॥ ३२ ॥ श्रीसमर्थप्रभूचे स्नेहांकित । श्रीतुकाराम धांवले त्वरीत । लोटांगणीं श्रीसमर्थप्रभूसीं वंदीत । श्रीसमर्थ आलिंगिती श्रीतुकाराम ॥ ३३ ॥ वैष्णवजनीं श्रीसमर्थ पूजन केलें । उपरी दिंड्यापताका गरुडटके उभविले । एकादशीं नगरप्रदक्षिणे चालिले । मध्यें घेतलें श्रीसमर्थदेवा ॥ ३४ ॥ उंच उंच पताका शोभती । टाळमृदंगनाद उमटती । पंढरी श्रीविठ्ठलनामें दुमदुमविती । श्रीसमर्थ श्रीतुकाराम विराजती दिंडीमध्यभागीं ॥३५॥ नरदेहीं जन्मासि यावें । तेणें एकवेळ वैकुंठ पंढरीक्षेत्र पहावें । साधुसंतमेळीं लीन व्हावें । कौतुक देखावें पालखीसमारंभीं ॥ ३६ ॥ पंढरी ह्मणिजे भूवैकुंठ । तें भजनमार्गींचें आद्यपीठ । हरिनामकीर्तनीं दणाणे वाळुवंट । प्रत्यक्ष प्रगट मुक्ति सायुज्यता ॥ ३७ ॥ पंढरीचें महिमान । सांगो जातां असाधारण । क्षेत्रदर्शनें जाय भवभय पळोन । नामस्मरणीं वृत्ति जडे ॥ ३८ ॥ पंढरी ऐसें कीर्तन नाहीं । पंढरी ऐसा सोहळा नाहीं । पंढरी ऐसें क्षेत्र नाहीं । त्रिभुवनीं नाहीं ऐसा हरिदिनीं मेळा ॥ ३९ ॥ पंढरीसीं जावें । परब्रह्म उभाउभी पहावें । देह विदेह पदवीपावे । जिवशिवा आलिंगन ॥ ४० ॥ टाळ मृदंग एकचि धुमाळी । वैष्णव नाचती प्रेमकल्लोळीं । एक एकासवें घेती हातोफळी । गदारोळीं आनंदें नामगर्जती ॥ ४१ ॥ धन्य दैवाचे तेचि जाती । जे पंढरीपेठ पावती । मुक्ति सायुज्यता वरिती । हरिनामकीर्ति श्रवणमार्गीं ॥४२॥ ऐसा दिंडीसमारंभ चालिला । तो श्रीपुंड-

लीकदर्शना आला । श्रीसमर्थप्रभूची अपूर्वलीला । उपासनेला प्रगट दाविलें ॥ ४३ ॥ संतीं श्रीसमर्थदेवा विनाविलें । श्रीसमर्थदेवा संतवचन मानलें । प्रेम पडिभरें अभंग बोलिले । पालटविलें पंढरी पुंडलीक श्रीविठ्ठल ॥ ४४ ॥

॥ अभंग ॥ येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥१॥
काय केली अयोध्या नगरी । येथें वसविली पंढरी ॥ २ ॥
काय केली शरयूगंगा । येथें आणिली चंद्रभागा ॥ ३ ॥
काय केलें धनुष्य बाण । येथें करकटावर ठेऊन ॥ ४ ॥
काय केली सीताबाई । येथें राही रखुमाबाई ॥ ५ ॥
काय केला हनुमंत । येथें पुंडलीक भक्त ॥ ६ ॥
काय केलें वानरदळ । येथें मेळविले गोपाळ ॥ ७ ॥
जैसा रामदासीं भाव । तैसा झाला पंढरीराव ॥ ८ ॥

ऐसा श्रीसमर्थ अभंग बोलतां । पंढरी पालटली तत्वता । वैष्णव थकीत जाहले चित्ता । देखत देखतां अयोध्याभुवन जाहलें ॥ ४५ ॥ पंढरींत श्रीसमर्थसामर्थ्य प्रगटलें । प्रत्यक्ष पंढरी अयोध्याभुवन जाहलें । श्रीविठ्ठला श्रीरामरूपीं नटविलें । हातीं धरविलें चापबाण ॥ ४६ ॥ श्रीसमर्थप्रभूकारणें । श्रीविठ्ठला श्रीरघुनाथरूपीं नटणें । उभयभागीं अभेदत्व प्रगट दावणें । द्वैतभेद छेदणें उभय उपासनीं ॥ ४७ ॥ श्रीराम श्रीविठ्ठल उपासना । मुळीं अभेदभक्ती शुद्धभावना । प्रत्यक्ष दाविली वैष्णवजनां । श्रीपंढरीराणा श्रीसमर्थांकित ॥ ४८ ॥ श्रीसमर्थस्वामी पंढरीं आले । शुद्ध उपसनासामर्थ्य प्रगटलें । सकळ वैष्णवजना मानलें । सकळीं घातलें लोटांगण ॥ ४९ ॥ ह्मणती धन्य वैष्णव श्रीरामदास । आजि लोटांगण घालूं त्यास । सकळ बंधनें तोडील आशापाश । श्रीविठ्ठलास तेणेंचि वश केलें ॥ ५० ॥ श्रीरामाची करितो उपासना । त्यासीं अभेदत्वें वश श्रीपंढरीराणा । नवल जालें वैष्णवजना । श्रीसमर्थरामदासचरणा वंदिती ॥ ५१ ॥ वारंवार श्रीसमर्थपूजन केलें । श्रीसमर्थ वारंवार अभि-

वंदिलें । वारंवार श्रीसमर्थस्तुतीस्तवन जालें । श्रीसमर्थें केलें पूर्ववत् श्रीपंढरीक्षेत्र ॥ ५२ ॥ पंढरी होती अयोध्या केली । परस्पर हेचि वार्ता वैष्णवमेळीं । श्रीसमर्थदर्शनार्थ धांवती अळुमाळी । वैष्णवमेळीं श्रीसमर्थ गुणचर्चा ॥ ५३ ॥ संतीं श्रीसमर्थदेवा विनविलें । श्रीसमर्थप्रभू कीर्तनीं उभे ठेले । भक्तिवैराग्य सुलभध्यान वर्णिलें । नवविध प्रतिष्ठिलें भजनमार्ग ॥ ५४ ॥ श्रीसमर्थकीर्तनशैली । वैष्णवीं प्रीतीनें मान्य केली । श्रीसमर्थपदवी प्रगट कळली । वैष्णवमेळीं श्रीसमर्थ रामदास गाजले ॥५५॥ देवें नित्यनूतन कीर्तन केलें । श्रीसमर्थप्रभू सकळां पूज्यमान जाहलें। जांबेंतील भाविक धांविन्नले । चरणीं लागले श्रीसमर्थांच्या ॥५६॥ श्रीश्रेष्ठस्वामी मातुःश्री कुशळ पुसिलें । श्रीसमर्थदेवें पत्रार्थ लिहिले । काला सम्पादोनि वैष्णवनिरोप घेतिले । कृष्णातिरीं चालिले स्वलीला ॥ ५७ ॥ श्रीसमर्थभेटीकारण । मल्हारीदेव आडवा आला धांवोन । निखिळ शिवराजवेश धरोन । श्रीसमर्थांलागोन निजस्थळा नेलें ॥५८॥ खंडेरायाचा हेत कळला । श्रीसमर्थें मल्हारीदेव पूजिला । कीर्तनीं कीर्तिगुण वर्णिली लीला । श्रीमल्हारीला आरती केली ॥ ५९ ॥ श्रीसमर्थप्रभूचा पुण्यप्रताप भारी । गुप्तत्वें विचरती चराचरीं । विश्रांती नाहीं पळभरी । चराचरीं तारकू ॥ ६० ॥ आले कृष्णातट ठाकोन । शरणागताचें करीत उद्धरण । ठाईं ठाईं वाढविलें नामस्मरण । जडउद्धरण ठाईं ठाईं केलें ॥ ६१ ॥ श्रीसमर्थप्रभू येतां सज्जनगिरीं । काय दाविली चमत्कार थोरी । ते श्रवण करावी सादरें चतुरीं । नवलपरी देवाची ॥ ६२ ॥ श्रीसमर्थें शिष्यवर्गा पाचारिलें । गुप्त अंधारीं बैसोन दार लावाविलें । दिनमानातें नेमिलें । गुप्त जाले तेथुनी ॥ ६३ ॥ श्रीसमर्थमाता खंगली । जीर्णज्वरें जर्जर जाली । देहप्रारब्धें अंतकाळ घटिका आली। खेद पावली

श्रीसमर्थभेटीकारणें ॥ ६४ ॥ तें मातृदुःख श्रीसमर्थी जाणवलें। त्वरितगती अदृश्य जाहले। नारोबा ह्मणतां वो देतचि गृहीं प्रगटले। मातेसीं आलिंगिलें जांबनगरीं ॥ ६५ ॥ नारोबा ऐसा उच्चार करितां। श्रीसमर्थ प्रगटले वो ह्मणता। धन्य धन्य वाटलें मायेच्या चित्ता। पुत्रा उभयतां देखोनि ॥ ६६ ॥ उभयतां पुत्र सन्निध बैसलें। तिहीं मातेसीं श्रीरामनामीं जागविलें। देह विदेहत्वें वैकुंठपदीं पाठविलें। धन्य धन्य माय राणाऊ ॥ ६७ ॥ राणाऊमायेचा अंत्यविधी केला। श्रीसमर्थसंकेत दिनमान उगवला। शिष्यवर्गीं उघडिलें कपाटाला। श्रीसमर्थप्रभूला विपरीत देखिलें ॥ ६८ ॥ शिष्यवर्गीं प्रश्ण केला। स्वामी जटाभार कां त्यागिला। देवें मातृअंतकाळ निवेदिला। जांबेला जावोनि आलों ह्मणती ॥ ६९ ॥ जांबेसीं कैसें केलें गमन। कैसें कळलें मातृनिधन। शिष्य जाहले विस्मित मन। श्रीसमर्थचरण लोटांगणीं वंदिती ॥ ७० ॥ श्रीसमर्थस्वामी लीलाविग्रही। द्वंद्वातीत देही विदेही। मीतूंपणासीं अवकाश नाहीं। समसाम्य महीं विचरती ॥ ७१॥ भूतमात्रीं भगवद्भावो। चराचरीं मी ऐसाचि निर्वाहो। प्रारब्धीं टाकिला देहो। होवो जावो कांहीं कां ॥७२॥ निर्द्वंद्व पुरुष दुर्लभ जगतीं। कठिण अंगीं बाणणें वृत्ती। धन्य ते संत समसमान वृत्ती। भूतमात्रीं भगवद्भावना ॥ ७३ ॥ जयासीं निखिळ शब्द-निंदा न साहे। तो आघातीं कैंवि उगला राहे। दुर्लभ ते संत सहनशीळ देहे। सुलभ नोहे संतपदवी ॥ ७४ ॥ जें आकाश वर पडो अंगीं। नाना विघ्नें उचंबळोत लागवेगीं। झणीं देहा-सीं झोंबो कृतांत आंगीं। परी धैर्यप्रसंगीं संत डळमळतीना ॥ ७५ ॥ मऊ तरी मेणाहुनी। कठिण तरी वज्राहुनी। मायाळु तरी मायबापाहूनी। शत्रूहूनी घात पात करिते ॥ ७६ ॥ ऐसा संतांचा निर्द्वंद्व सहनशील भावो। तेणेंचि त्यांसीं सुप्रसन्न

देवाधिदेवो । येती आघात होती वावो । भगवंत स्वयमेव अंत-र्बाह्य व्यापिला ॥ ७७ ॥ भगवंत भक्तामागेंपुढें । रुततील ह्मणुनी वेंची खडे । पितांबर छाया करी वाडे कोडें । अत्यंत लाडिवाळ भक्त प्रेमळ भगवंता ॥ ७८ ॥ आइका श्रीसमर्थ सह-नशीळ लीला । घेवोनि निघाले शिष्यसमुदाय मेळा । चालिले निगडीहूनि परळीला । विश्रांतीला शिष्य इच्छिती ॥ ७९ ॥ शिष्य परिवार भागला । श्रीसमर्थ बैसले विश्रांतीला । क्षुधेनें पीडीलें ज्याला त्याला । हुर्ड्याला आणावें ह्मणती ॥ ८० ॥ श्रीसमर्थआज्ञा घेतली । शिष्यवर्गी हुर्ड्याचीं कणसें आणिलीं । तृप्तीढेंकरें क्षुधाहरिली । श्रीसमर्थ एकांतीं विश्रांती घेती ॥ ८१ ॥ श्रीसमर्थांसीं नाहीं अन्नपान । केवळ फळमूळभोजन । अविश्रामता वाचे नामस्मरण । श्रीरघुनन्दन हृदयस्थ ॥ ८२ ॥ शिष्यवर्ग रतला हुर्डासेवनीं । तें दूरूनि अवलोकी शेतधनी । जवळी आला धांवोनी । क्रोध मनीं प्रखर वाढला ॥ ८३ ॥ उद्दंड शिष्यसमुदाव देखोन । विचार केला तेणें । ह्मणे शि-ष्यासीं व्यर्थ काय बोलोन । मुख्य मुखरण गुरू दंडिजे ॥ ८४ ॥ क्रोधें ताटें घेतलीं हातीं । धांवोनि गेला श्रीसमर्थांव-रती । क्रोधें पृष्टीं वोपितां वळ उठती । निर्लज्यचित्तीं कुळंबी खवळला ॥ ८५ ॥ तेणें तृप्तीवरी ताडिलें । श्रीसमर्थ श्रीरा-मरूपीं जडले । आठव नाहीं कोणें कोणाशीं ताडिलें । नाहीं कळलें कोण कोणावरी खवळला ॥ ८६ ॥ श्रीसमर्थप्रभू वृत्ती-वरी आले । कुळंबिया शांतचित्तें नमिलें । ह्मणती बापा तुवां पाहिजे क्षमा केलें । शिष्यवर्गासीं आवडलें हुरडा भोजन ॥८७॥ आतां यथोनि पुढती । ऐसा अपराध न करूं निश्चिती । ऐसें ह्मणोनि कुळंबिया नम्रपणें विनविती । शिष्यासीं आज्ञा-पिती चलावें ह्मणोनी ॥ ८८ ॥ येथें एक आशंका उठिली । जे श्रीसमर्थीं आपदा केंवि साहिली । शिष्यवर्गीं मौनवृत्ती केंवि

धरिली । श्रीसमर्थमाउली शीण पावता ॥ ८९ ॥ आइका देवें गुह्य आधींच आज्ञापिलें । जें निर्द्वंद्व आघातीं सहावें भलें । निर्द्वंद्व श्रीरामनाम गर्जावें चांगलें । यालागीं तटस्थ ठेले शिष्यवर्ग ॥ ९० ॥ ऐसिया वचनीं आशंका फिटली । श्रोतीं स्वानंदें टाळी पिटिली । ह्मणती धन्य वक्ता रसाळ बोली । श्रद्धा खोली विशेषागळी ॥ ९१ ॥ श्रीसमर्थदेवा व्यथा विशेष जाली । देवें शिष्यसमुदाय मंडळी आज्ञापिली । जें पुसतांही न सांगावी दुःखआपदा घडली । श्रीसमर्थमाउली क्षमावान ॥ ९२ ॥ तैसे आले सातारनगरीं । शिवराज मार्गप्रतिक्षा करीत होता भारी । महाराजांची येतां देखोनि स्वारी । श्रीसमर्थचरणावरी उडी घाली ॥ ९३ ॥ बाप भाग्याचा छत्रपती । ज्यासीं सत्संग श्रीसमर्थसांगाती । तेणें मंगळमय जालें त्रिजगती । श्रीरघुपती निजांकिला ॥ ९४ ॥ श्रीगुरुचरणाची सेवा । शिवराज इच्छी परम दैवा । सर्व पूजनीं उपजे हेवा । जिवाभावा श्रीगुरू आवडे ॥ ९५ ॥ श्रीगुरुचरणींच्या पादुका । शिवराज हातीं घेता न ये आशंका । सेवाधर्मीं हीनदीनाहूनि अवांका । सेवाकौतुका सर्वस्व मानी ॥ ९६ ॥ श्रीगुरूचें आणिकासीं न सांगेचि काम। शिवराज निजांगें करी सेवासंभ्रम । छत्रपती शिवराज उत्तमोत्तम । श्रीसमर्थ परम स्वामी ज्यासी ॥ ९७ ॥ श्रीसमर्थासीं अभ्यंगस्नान । शिवराज निजांगें घाली आपण । नाना परिमळ सुगंध उटी लेपन । जळ क्षाळण निजांगेंचि करी ॥ ९८ ॥ नित्य नियमापरी । श्रीसमर्थ आणिले चवरंगावरी । शिवरायें हस्तस्पर्श करावा जंव पाठीवरी । तंव वळ अंगावरी देखिले ॥ ९९ ॥ मांस रक्त बाहेरी आलें । श्रीसमर्थपाठीं वळ देखिले । शिवराज मनीं भयकम्पित जाले । स्वामीसीं पुसिलें देवा कोण हे व्यथा ॥ १०० ॥ श्रीसमर्थ ह्मणती देहप्रारब्ध भोगणें । त्याची व्यथा कवणें कवणासीं सांगणें । निर्द्वंद निर्वेध तें साहणें।

श्रीरामस्मरणें निजानंदें ॥ १ ॥ श्रीसमर्थ व्यथा न सांगती । शिष्यवर्गी श्रीसमर्थधाक चित्तीं । परस्परींच कुजबुजती । तंव एका चित्तीं धैर्य फुटलें ॥ २ ॥ श्रीसमर्थप्रभूचें स्नान जालें । तिहीं नित्य नियमातें सारिलें । भोजनोत्तरीं सुखासनीं पहुडले । शिवरायें पुसिलें एकांतीं शिष्यासीं ॥ ३ ॥ तेणें सकळ व्यथा सांगितली । कुणबियानें बोहरी जे मांडिली । ऐकतां शिवराया क्रोध उचंबळी । ढालाईत तत्काळीं धरणेकरी पाठविले ॥४॥ राजदूत येतां देखोनी । कुणबी भयकम्पित जाला मनीं । ह्मणे शिवराज अपराध कठीण दंडणी । राजा दंडणीं निर्दोष ॥ ५ ॥ मजचि अपराध घडला । म्यां साधू कठोरत्वें ताडिला । शिवराज साधूंचा अंकिला । माझें घडलें अनुचित कृत्य ॥ ६ ॥ नगरजन मिळाले । कुणबिया अश्रुपूरें भरले डोळे । शब्द चांचरी अडखळे बोले । कुटुंबी सगळे आक्रोश करिती ॥ ७ ॥ जन ह्मणती मूर्खा तुंवां अपराध केला । तुंवां छत्रपतींचा स्वामी ताडिला । निर्लज्याधिग् चांडाळ तूं महीला । अधोगतीला क्षणीं जासील ॥ ८ ॥ तो मूर्तिमंत धर्मात्मा शिवछत्रपती । धन्य स्वामी श्रीसमर्थ त्रिजगतीं । तुज मरण अवकळा उपजली कवण्या रीतीं । अधोगतीनें मरण आणिलें ॥९॥ आतां एकचि उपाव करी । श्रीसमर्थप्रभू साष्टांगें नमस्कारी । तेणेंचि उपजेल त्यासीं दया अंतरीं । तुज निर्धारीं वांचवील ॥ १० ॥ ढालाइती कुळंबी चतुर्भुज केला । त्वरें श्रीछत्रपती सभेसीं आणिला । श्रीसमर्थ येउनी बैसले सभेला । कौतुकाला पंतप्रधान सरदार देखती ॥ ११ ॥ शिवभूप अत्यंत संतप्त मनीं । शिक्षा द्यावया विचारिती निवडुनी । श्रीसमर्थ बोलती आज्ञापुनी । आजि अपराधिया निर्धारूनि शिक्षा आह्मी करूं ॥१२॥ रायें तत्काळ श्रीचरण वंदिले । जी आज्ञा प्रमाण ह्मणितलें । अपराधिया सन्मुख उभें केलें । देवें देखिला चतुर्भूज कुळंबी ॥१३॥

कुळंबी मनीं भयकम्पित जाला । त्यासीं नेत्रीं अश्रुपूर भरला । श्रीसमर्थासन्मुख दंडप्राय पडिला । श्रीसमर्थाला वारंवार स्तवीतसे ॥ १४ ॥ आतां हाल हाल व्यथा होईल । शिवराज आपणा दंडील । येथोनि कोणी न सोडवील । कुळंबिया भरला धाक पोटीं ॥ १५ ॥ तंव तो अत्यंत कृपाळू श्रीरामदास । आज्ञापन करी शिवभूपतीस । ह्मणीं हातीं घेई ह्मणती तांम्रपटास । सांगूं शिक्षेसीं लिहावें ॥ १६ ॥ नृपें श्रीसमर्थआज्ञा वंदिली । तांम्रपटीं श्रीसमर्थआज्ञा लिहिली । श्रीसमर्थवचनें निघालीं । श्रोतीं अवधारिलीं पाहिजे ॥ १७ ॥ शिउबा यासीं न पुसतां हुर्डा खादला । हाचि थोर अपराध आह्मी केला । तेणेंगुणें आह्मासीं देहदंड प्राप्त जाला । कुळंबी भला दोषानिर्मुक्त कीजे ॥ १८ ॥ दोषनिर्मुक्त आह्मासीं कुळंबियानें केलें । अल्पचि शिक्षा करूनी तेणें सोडिलें । यालागीं उतराई व्हावयालागीं पाहिजे दिल्हें । भूमिदान वहिलें वंश परम्परा ॥ १९ ॥ ह्मणीं कुळंबियासीं मुक्त करावें । भूमिदान करूनी शेला पागोटें अर्पावें । गौरवें त्यासीं निजनगरासीं पाठवावें । शेत चालवावें वंशपरम्परा ॥ २० ॥ ऐसी श्रीसमर्थरामदासवाणी । थक्कित सभा सर्वस्वमनीं । शिवराज थक्कीत निजमनीं । श्रीसमर्थवचनीं अघटित घडलें ॥२१॥ सभेमाजीं जयजयकार गाजला । कुळंबी मरणापासोनि सुटला । श्रीसमर्थचरणीं वारंवार घालीं लोटांगणाला । श्रीशिवछत्रपतीला वारंवार वंदी ॥ २२ ॥ कुळंबीसंभावना जाली । त्यासीं निर्दोषत्वें आज्ञा मिळाली । शेत इनामवृत्ती चालिली । अद्यापवरी आली वंशपरम्परा ॥२३॥ श्रीसमर्थप्रभूचें करणें । न भूतो न भविष्यती चांगुलपणें । विश्वजन इच्छिती श्रीसमर्थचरण । उदार करणी श्रीसमर्थरायाची ॥ २४ ॥ देशोदेशीं नवल जालें । श्रीसमर्थ कृपाळू गाजले । शिवछत्रपती सकळांसीं मानले । प्रजा वर्ते साधुसंतभजनीं ॥२५॥

श्रीसमर्थस्वामींसीं उपचार केला। अल्पकाळेंचि श्रमपरिहार झाला। नृपनिरोप घेवोन आले सज्जनगिरीला। श्रीसमर्थलीला सुखदाई ॥ २६ ॥ पुढें आइकावें चरित्रविंदान। सादर संतश्रोतीं होवोन। तुमचें अवधानामृतसिंचन। कथाकोंभ स्फुरण तेणेंचि मज ॥ २७ ॥ श्रीसमर्थशिष्य समुदाव भारी। माजी विशेष वेणाईची थोरी। श्रीरामनाम सर्वकाळ अंतरीं। निजनिर्धारीं स्मरतसे ॥ २८ ॥ महंतसामर्थ्य अंगीं बाणलें। श्रीसमर्थप्रभूसीं मानलें। काव्यप्रतिभेसीं सम्पादिलें। सीतास्वयंवर चांगलें ठाउकें सकळां ॥ २९ ॥ श्रीसमर्थें मिरजेसीं मठ केला। तो श्रीवेणाईसीं निरविला। वेणाईनें कोल्हापूर प्रांताला। श्रीसमर्थभजनाला लाविलें ॥ ३० ॥ स्त्रीदेहो परी सामर्थ्य भारी। कीर्ती प्रगटली चराचरीं। महानुभाव लोळती चरणांवरी। सत्य साच खरी श्रीसमर्थकृपा ॥ ३१ ॥ श्रीवेणाईपरम्परा गाजली। परम्परेनें महंती रूढली। श्रीसमर्थकृपा पूर्णपणें फळली। प्रचिती आली वेणाईसीं ॥ ३२ ॥ चाफळीं नउमीकारणें। वेणाईसीं प्रतिवार्षिक येणें। उत्साव यथासांग सम्पादणें। परोपरी सहाय्य करणें अक्काईसीं ॥ ३३ ॥ आइका एकवार नवमी उत्सवासीं। वेणाई आली चांफळासी। अक्का साहित्य सम्पादण्या गेली कऱ्हाडासीं। तंव वेणाईसीं हिंवज्वर दाटला ॥ ३४ ॥ व्यथा बाणली परम दारुण। उभें राहवेचिना उठोन। नवमीसाहित्य राहिलें अंतरोन। दिनमान अल्पमात्र उरले ॥ ३५ ॥ वेणाईनें कोणी एकासी पाचारिलें। आपणा परमकष्टें श्रीसन्निध उभें केलें। न राहतां स्तंभासीं बांधविलें। श्रीराघवा आळविलें करुणा अभंगीं ॥ ३६ ॥

अभंग

पतितपावना जानकीजीवना। अरविंदनयना रामराया ॥ १ ॥
अक्का गांवा गेली मज व्यथा जाली। दयाळा राहिली नउमी तुझी ॥

अक्का गांवा जातां निरविलें समर्था । तें भाक रघुनाथा साच करी ॥
नउमीसमारंभ पाहूं द्यावा बरवा । मग देह राघवा जावो राहो ॥४॥
एकोनि करुणा अयोध्येचा राणा । मूर्तिच्या नयना अश्रु आले॥ ५ ॥
ऐकोनि वचन पतीतपावन । कृपेचें पोषण वेणूवरी ॥ ६ ॥

या परी वेणाई अभंग वचनें बोलिली । तेणें श्रीरघुनाथमूर्ती गहिंवरली । शुद्ध पाषाण मूर्ती नेत्रीं आश्रुढाळी । व्यथा पळाली वेणाईची ॥ ३७ ॥ तंव अकस्मात श्रीसमर्थ प्रगटले । वेणाईसीं हें कोण कृत्य पुसिलें । केवळ देहसौख्यार्थ श्रीसीं श्रमी केलें । हेंचि पढविलें आजवरी आह्मी ॥ ३८ ॥ तंव वेणाईनें साष्टांग दंडवत घातिलें । देहसौख्यार्थ नाहीं जी ह्मणितलें । उत्साव सम्पादण्या श्रीसीं आळविलें । क्षमा केलें पाहिजे देवा ॥ ३९ ॥ तंव श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । धन्य वेणाई गर्जोनि बोलिले । भाविकीं वेणाईसीं साष्टांगें अभिवंदिलें । वेणाई गर्जिन्नली श्रीरामनाम ॥ ४० ॥ असो वेणाईची व्यथा हरली । अक्का कऱ्हाडाहूनि आली । नउमीसमारंभेसीं गाजली । कीर्ति प्रगटली वेणीस्वामी ॥ ४१ ॥ श्रीसमर्थदेवें महंत पढविले । महंतपदवीनें मंडित केले । देशोदेशीं विखुराविले । धर्मसंस्थापन कार्य सम्पादिलें अत्यंत कुशळत्वें ॥ ४२ ॥ श्रीसमर्थ काव्यग्रंथ सम्पादिती । महंत शिष्य झणीं उतरोनि घेती । श्रीसमर्थवचनीं अंगीं महंती बाणविती । सत्य प्रचिती अनुभउनी ॥ ४३ ॥ श्रीसमर्थें दिव्य ग्रंथराज निर्मिला । श्रीदासबोधनामीं गौरविला । येणें आबाळसाबाळां तरणोपाव जाला । सिद्धपदवीला ग्रंथराज पाववी ॥ ४४ ॥ सर्वोत्तम गुणालंकृत । ब्रह्मनिरूपणीं विख्यात । श्रीमद्दासबोध नामें गौरवीत । महाराष्ट्रीं वेदतुल्य ग्रंथराज हा ॥ ४५ ॥ श्रीसमर्थदेवाचें समर्थवचन । महाराष्ट्रियां लाधलें श्रीदासबोधनिधान । अमृतसंजीवनी श्रीसमर्थवचन । श्रीसमर्थ निर्मोनि तें गेले ॥ ४६ ॥ सिद्धश्रीज्ञानेश्वरें । निर्मिलीं दिव्य गीताटीकाक्षरें । श्रद्धापूर्ण आदरिती लहानथोर । तैसाचि नि-

धार श्रीसमर्थग्रंथीं ॥ ४७ ॥ श्रीएकनाथप्रभू बोलला। बोलिला आदरें एकादशाला। विश्वजनीं पावला महिमेला। श्रीसमर्थ-वचनाला तत्तुल्य मानिती ॥ ४८ ॥ श्रीसमर्थकाव्य प्रसवणें। सप्रचित जग उद्धरणें। ठाईं ठाईं भजन वाढविणें। सुपंथ उजळणें नित्य नवा ॥ ४९ ॥ श्रीरामदासकथासारामृत। सावधान संतश्रोते परिसोत। श्रीधरचरणीं भिमू विनवीत। निजकृपामृत। तुमचें हें ॥ १५० ॥ इति श्रीरामदासकथासारामृत। भिमूविरचितायाम् हुर्डाकथन वेणाईनवलविंदान नाम त्रयोदश प्रसंग सम्पूर्ण ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १४ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम्।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



रामदासचरित्र नव्हाळी। परम पवित्र अत्यंत रसाळी। द्यावें जी अवधान श्रोतीं प्रेमळीं। धन्य महीतळीं श्रीरामदासकथा ॥ १ ॥ आइका चरित्र जालें। श्रीसमर्थप्रभू भिक्षाटणा निघाले। हिंडतफिरतां राजनगरीं प्रवेशले। प्रगटले राजांगणीं ॥ २ ॥ श्रीसमर्थप्रभू गिरागंभीर। गर्जिन्नले जय जय श्रीरघुवीर। नृपभवनीं चाकाटले लहानथोर। राव सत्वर धाविन्नला ॥ ३ ॥ भिक्षार्थ श्रीगुरू अंगणीं देखिलें। रायें धांवत वेगीं लोटांगण घातिलें। भिक्षादानार्थ पदार्थ मनीं चिंतिले। निर्धारिलें समूळ

राज्यभार श्रीचरणीं समर्पू ॥ ४ ॥ रायें स्वामी हेमासनीं बैसविले । भिक्षादानपत्र स्वहस्तें लिहिलें । श्रीचरणीं सर्वभावेसीं सर्वस्व आर्पिलें । निजांगें विकिलें सेवेवरी ॥५॥ धन्य श्रीगुरुभजनमार्गीचा राजा । उभविल्या शुद्धभावार्थाच्या ध्वजा । सर्वभावेसीं आकाळिलें श्रीसमर्थ अधोक्षजा । सुरवरसमाजीं शिवराज वंद्य ॥ ६ ॥ इयें मृत्यलोकींचिये नगरीं । श्रीगुरुभजनेंचि पाविजे थोरी । शिवराज वर्म हें जाणें अंतरीं । सेवा बरी तोचि जाणें ॥ ७ ॥ श्रीसमर्थें दानपत्र पाहिलें । पाहोनि स्मितहास्य केलें । ह्मणती शिउबा जडभिक्षा आह्मासीं न चले । मुष्टि एक इच्छिले पदार्थ भोजना ॥ ८ ॥ तंव रायें श्रीचरणीं दंडवत घातलें । ह्मणे स्वामी आतां दिलें तें आर्पिलें । आजि माझें भाग्य फळलें । स्वामी बोळले भिक्षागुणें ॥९॥ माता जिजाई आली । श्रीचरणीं लोटांगण घाली । ह्मणे देवें आजि बरवी कृपा केली । सेवा घेतली निज तान्हयाची ॥ १० ॥ श्रीसमर्थ आग्रह करितां । शिवराज न मनींच चित्ता । मग श्रीसमर्थें राज्य आमुचें ह्मणतां । शिवराजचित्ता धीर आला ॥ ११ ॥ श्रीसमर्थ ह्मणती शिउबा तूं धन्य महीवरी । तुज उपमा उणी चराचरीं । जनक रुक्मांगद हरिश्चंद्र गाजले सत्वधारी । कलीमाझारीं शिउबा तूं धन्य ॥ १२ ॥ धन्य सत्ववृत्ती सम्पादिली । निर्लोभता प्रगट दाखविली । कलीं न होय तोचि वर्तणूक केली । धन्य प्रसवली माता जिजाई पुत्ररत्न ॥ १३ ॥ आमुचें राज्य शिउबा तुज चालवणें । श्रीसमर्थवचनीं शिवराज साशंकित मनें । श्रीचरणीं घाली लोटांगणें । श्रीराज्यचिन्ह कोण ह्मणे स्वामी ॥ १४ ॥ श्रीराज्याचें विशेष लक्षण । कांहीं स्वामींनीं द्यावें निवडून । तंव श्रीसमर्थ बोळले संतोषोन । श्रीराज्यलक्षण सांगती ॥ १५ ॥ श्रीसमर्थ ह्मणती शिउबा अवधारीं । जन हे जोहार उच्चारिती वैखरीं । ते तुंवां

चाली मोडावी निर्धारीं । राम राम सत्वरीं रूढवीजे ॥ १६ ॥ आणीक एक वचन अवधारावें । आमुचें हुर्मुजी वस्त्र निशाणीं उभारावें । भगवाझेंडा नामीं संबोखावें । येणें चिन्हीं वोळखावें श्रीरघुनाथराज्य ॥ १७ ॥ श्रीसमर्थवचनीं शिवराज तोषला । श्रीचरणीं लोटांगणीं गेला । श्रीसमर्थें असीर्वचनीं नृप गौरविला । शिवरायाला जन वर्णिती ॥ १८ ॥ शिवश्रीसमर्थकीर्ति विस्तारली । श्रीसमर्थकृपा पावन जाली । श्रीसमर्थपूजा मंगळ गजरें आरंभिली । मंगळें गाजलीं नृपभवनीं ॥ १९ ॥ आइका श्रीसमर्थप्रभूच्या भेटीस्तव । दुरूनि येती महानुभाव । देखोनि सामर्थ्य करिती गौरव । हा श्रीहनुमंत स्वयमेव ह्मणताती ॥ २० ॥ ते काळीं श्रीवामन पंडित । विद्वान परम विख्यात । सकळही शास्त्रीं पारंगत । परी शरणागत श्रीसमर्थासि जाले ॥ २१ ॥ ब्रह्मसंबंधानुग्रहें श्रीतुकयासी नमिलें । तिहीं श्रीसमर्थ रामदासा निरविलें । श्रीसमर्थें त्यांसीं बद्रिकाश्रमीं पाठविलें । सगुण साक्षात्कार पावले श्रीबद्रिकाश्रमीं ॥ २२ ॥ श्रीनारायणानुग्रहें निघाले । चाफळीं श्रीसमर्थदेवा भेटले । आत्मानात्म निजानुभव सुख पावले । महाराष्ट्र ग्रंथ केले अपरिमित ॥ २३ ॥ श्रीसमर्थकृपेसीं पात्र जाले । श्रीसमर्थाज्ञें प्राकृत ग्रंथ निर्मिले । विशेष गीतार्थ बोलिले । नामें गौरविलें यथार्थदीपिका ॥ २४ ॥ आइका एकवार नवल दाविलें । श्रीसमर्थें पिसाटरूप प्रगट केलें । शिष्य परिक्षूनि निवडिले । कल्याण उतरले शुद्धभक्ती ॥२५॥ शिष्यसमुदाव वाढला । इच्छी केवळ मिष्टान्नभोजनाला । शुद्ध सात्विक भजनाला । वैराग्याला नेणती ॥ २६ ॥ ते दांभिक शिष्यमांदी शोधिली । पिसाटपणीं परिक्षिली । श्रीसमर्थकृपा फावली । श्रीकल्याणा लाधली सर्वकाळीं ॥ २७ ॥ देवें असिलता हातीं धरिली । क्षणीं वोवरीवरूनि उडी घेतली । सभोंवार

विद्युल्लतेसम भोवंडिली । हांक फोडिली अति अक्रोशें ॥ २८ ॥ शिष्य परिवार घाबिरा जाला । जो तो जीव लपवों लागला । स्वामी अंगावरी धांवती वधायाला । ज्याला त्याला भेडसाविती ॥ २९ ॥ सज्जनगडावरी प्रळय वोढवला । लागवेगीं गेले स्वामी तळाला । तैसें धांवत सोई गेले अरण्याला । आश्रमीं वाढला कोलाहल ॥ ३० ॥ स्वामी समर्था पिसें लागलें । जो तो शिष्य ऐसेंचि बोले । शिरगांवाहूनि कल्याण आले । तिहीं देखिलें नवल ऐसें ॥ ३१ ॥ कल्याण देवें स्मितहास्य केलें । येरां शिष्यवर्गासीं आश्वासिलें । निजांगें श्रीस्वामी-भेटीं प्रयाण आदरिलें । उमुंडी उगमीं श्रीसमर्थभेटी ॥ ३२ ॥ बहु कठिण अरण्यीं । श्रीसमर्थासि देखती शोधोनी । तंव उमुं-डी उगमस्थानीं । कड्यामधुनी शोधिलें ॥ ३३ ॥ परम कष्टें श्रीसमर्थ देखिले । श्रीसमर्थ कल्याणावरी असिलतेसीं धांवले । येरें साष्टांग दंडवत घातिलें । श्रीसमर्थें हासडिलें अति आवेशें ॥ ३४ ॥ श्रीसमर्थ ह्मणती कल्याणा । तुज मी हालहाल करीन जाणा । ऐसिया स्वामीनिर्वाणवचनीं निर्भय मना । कल्याण साष्टांग नमना अर्पिती ॥ ३५ ॥ कल्याणें श्रीचरणीं देहे अर्पि-ला । सर्वभावेसीं सेवेवरी विकिला । ह्मणे स्वामीच्या जें जें येईल मनाला । मन कामनेला पुरवावें ॥ ३६ ॥ कल्याणशुद्ध-भाव देखिला । श्रीसमर्थस्वामी स्नेहातिभरें बोळला । झणीं कल्याण सर्वांगेंसीं आलिंगिला । आले मठाला उभयतां ॥३७॥ श्रीसमर्थें केलें कवतीक । शुद्धभावार्थी निवाडिले एकेक । पुढें आइकावें जी चरित्र आणीक । अत्यंत रसीक नवलकथा ॥३८॥ वासुदेवशास्त्री महाविद्वान । सकळ शास्त्रीं पारंगत परिपूर्ण । झणीं आले शिवराजसभा ठाकोन । विजयपत्रिका सम्पूर्ण पुढें ठेवि-ल्या ॥ ३९ ॥ प्रयागीहूनि श्रीसेतुबंधापर्यंत । वासुदेवें हरविले सकळ पंडीत । दिवसा आले चुडी पेटवीत । मही विचरत

अहंमन्य गर्वभारें ॥ ४० ॥ श्रीछत्रपती बैसले सभा करून। आश्रित पंडित बोलाविले निवडून। गागाभट्टादि आले वेदज्ञ ब्राह्मण। परी वासुदेव न मनी ययां सकळां ॥४१॥ ह्मणे यांसी मज चाड नाहीं। वाद करीन समर्थासीं कांहीं। विशेष दुराग्रह धरिला देहीं। सभा सर्वही विचारीं पडिली ॥४२॥ शास्त्रीदुराग्रह विशेष देखिला। भूप परिवारें चांफळी श्रीसमर्थदर्शना आला। श्रीसमर्थ होते रामघळीला। कल्याणाला ग्रंथ सांगती॥४३ श्रीसमर्थें वासुदेवशास्त्री अभिवंदिला। त्यासी पंडितपणीं ताठा भरला। तो अहंकार ह्मणींच देवें उतरिला। मोळीविक्याकरवीं ॥ ४४ ॥ वासुदेवशास्त्री अहमन्यपणीं। श्रीसमर्थासि बोले ताठा धरुनी। श्रीसमर्थें कवतुकें करुनी। अत्यंज पाचारोनि कार्य साधिलें ॥ ४५ ॥ कल्याणाहातीं कुबडी दिधली। रेषामात्र वोढविली। अंत्यजा रेषेआंत यावया आज्ञा केली। तेणें पुसतां सांगीतली शूद्र यातीं ॥ ४६ ॥ पुनरपी रेषामात्र वोढिली। त्यासी आंत यावया आज्ञा दिधली। कोण जाती ह्मणोनि पुसिली। वैश्य याती ह्मणितली निर्भयें तेणें ॥ ४७ ॥ पुनरपी रेषा मात्र वोढिली। आंत यावया आज्ञा दिधली। ज्ञाती कोण ह्मणोनि पुसिली। क्षत्रिय सांगीतली चमत्कारें तेणें ॥ ४८ ॥ पुन्हां रेषामात्र वोढिली। आंत यावया आज्ञा दिधली। ज्ञाती कोण कल्याणें पुसिली। द्विज षड्शास्त्रज्ञ सांगीतली अंत्यजें तेणें ॥ ४९ ॥ आधिला तो अंत्यजचि निर्धारीं। परी श्रीसमर्थें केली नवल परी। पंडितासीं वादविवाद सरोत्तरीं। परस्परीं करविला ॥ ५० ॥ पंडितासवें वाद करविला। तयाचा समूळ अहंकार छेदिला। ह्मणीं वासुदेवशास्त्री देहनिर्वाणीं प्रवर्तला। श्रीसमर्थें वारिला कृपाळुपणें ॥ ५१ ॥ मोठा चमत्कार जाला। देवें अंत्यजाचा द्विज केला। त्यासीं षड्शास्त्रपंडितासीं वाद करविला। गर्वहत केला स-

कळां देखतां ॥ ५२ ॥ तंव वासुदेवें श्रीसमर्थचरणीं लोटांगण घातिलें । अत्यंत नम्रमणें श्रीसमर्थस्तवन केलें । श्रीसमर्थप्रभूंनीं कृपापूर्ण अवलोकिलें । स्वामी बोळले वासुदेवपंडिता ॥ ५३ ॥ नृपाश्रित पंडित थक जाले । श्रीसमर्थसामर्थ्य अगम्य देखिलें । सकळीं श्रीचरणीं लोटांगण घातिले । स्तुतीस्तवन केलें श्रीसमर्थरायाचे ॥ ५४ ॥ नूतन द्विज श्रीसमर्थचरणीं लोटांगण घाली । ह्मणे बरवी देवा संधी सांपडली । येणें काळें मुक्ती द्यावी भली । अटाअटी सरली शाप निर्मुक्तता ॥ ५५ ॥ अंत्यज बोले निज वर्तमाना । स्वामी मी चित्रसेन गंधर्व जाणा । चुकी होतां पावलों नारदशापवचना । पशू अंत्यज जन्मधारणा करणें आली ॥ ५६ ॥ तंव श्रीनारदमुनीचरणीं । म्यां बहुवार घेतली लोळणी । करुणा उपजोनि वदले उःशाप वाणी । शाप मोचनी सुखदाई ॥ ५७ ॥ तो मज प्रथम जन्म जयपाळ घरीं । तेथें श्रीभांव मुकुंद अश्वयोनीतूनि उद्धरी । दुजें प्रतिष्ठानीं द्विजाचे घरीं । पाणी भरी रेडा पखाली ॥ ५८ ॥ तेथें सिद्ध श्रीनिवृत्ती ज्ञानराज आले । मज रेडिया वेदवचनीं अहोरात्र गर्जविलें । क्षेत्रस्थ द्विजवरां गर्वहत केलें । तेथोनि सोडविलें श्रीज्ञानराज माउलीनें ॥ ५९ ॥ श्रीनारदवाणी साच देखिली । जे आजि श्रीसमर्थरामदासमाय भेटली । तेणें मज कृपापाखर केली । आपदा हरली शापवाणी ॥ ६०॥ तंव श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । कृपाकटाक्षें न्याहाळिलें । पद्मकर शिरीं ठेविले । मुक्तिपदीं बैसाविलें नूतन द्विजा ॥ ६१ ॥ स्वामी परिवारेंसीं मठीं आले । अंत्यजा समाधिस्थान सन्मुख दिधलें । समारंभें समाधी बैसविलें । श्रीरामनाम गाजले अंत्यज समाधीं ॥६२॥ वासुदेवशास्त्रीअहंकार झडला । अंत्यजाचा उद्धार केला । नृप परिवारेंसी थकीत जाला । श्रीचरणाला लोटांगणें घालिती॥ ६३ ॥ वासुदेवशास्त्री अत्यंत लीनपणें । श्रीसमर्थ

चरणीं घाली लोटांगणें । श्रीसमर्थसन्निध राहिले दास्यपणें । श्रीचरण जीवीं धरिले ॥ ६४ ॥ आइका मिष्टान्न भोजनीं द्विज शरण आला । तेणें लोभें श्रीसमर्थप्रभूचा अनुग्रहो घेतिला । श्रीसमर्थें जंव अरण्यपंथ क्रमिला । सवेंचि निघाला द्विज संगें ॥ ६५ ॥ प्रभूसंगतीं अरण्यांत आला । क्षुधेनें अत्यंत व्याकूळ जाला । अंतरीं परम खेद पावला । श्रीसमर्थजीला सरोत्तरीं बोलतसें ॥६६॥ जी मज ऐसा श्रीगुरू नमने। परतोनि घ्यावी। आपलीं अनुग्रह वचनें । मी तुह्मावरी उबगलों जिवेंप्राणें । तुमच्या मंत्रगुणें व्यथा वाढली ॥ ६७ ॥ देवें त्यासीं चुळोदक घेवविलें । निकट पाषाणीं गुरळीसीं सांडविलें । गुरळीसरसीं त्रयोदशाक्षरी मंत्र प्रगटला । द्विजवचन खुंटलें वाणी गेली ॥ ६८ ॥ द्विज थोर कष्टें, निघाला । येऊनि श्रीतुकयाचरणीं लागला । तंव तिहीं अत्यंत निषेध केला । त्यासी संगें घेवोनि आले चाफळीं ॥ ६९ ॥ द्विज श्रीसमर्थचरणीं अर्पिला । श्री-तुकयानें श्रीसमर्थप्रभू स्तविला । देवें श्रीतुकारामस्नेहें द्विज उद्धरिला । पावविला पूर्ववत वाणीतें ॥ ७० ॥ आइका श्रीरंग-नाथ परम विख्यात । महंत पदवीनें सुशोभित । परी बाहेर-ख्यालीं रत । पूर्वसंस्कार प्रारब्ध भोगिती ॥ ७१ ॥ चाफळीं नउमी उत्सवीं । कीर्तनीं उभे श्रीरंगोबा गोसावी । कीर्तनशैली रंगली बरवी । श्रीसमर्थस्वामी संतुष्ट जाले ॥ ७२ ॥ श्रीरंगो-बानीं कीर्तन सम्पादिलें । श्रीसमर्थचरणीं साष्टांगें अभिवंदिलें। श्रीसमर्थें रंगोबासीं स्नेहभरें अवलोकिलें । प्रसन्नलें चित्त ह्मणती ॥७३॥ श्रीसमर्थ ह्मणती रंगोबा मी प्रसन्न पूर्ण। आजी मागतील तें देईन । रंगनाथ ह्मणती तरी सांडवावा जी अवगुण। जें उणे-पण या शरीरा ॥७४॥ श्रीसमर्थें स्मितहास्य केलें । जा ह्मणती तुज दोषमुक्त केलें। तुझिया छाटीचें तीर्थ अडल्या स्त्रीशीं दिधलें । तरी प्रसूतिवेदनेला ते न पवेल ॥ ७५ ॥ यापरी श्री-

समर्थलीला । परम सौख्य देई जनां सकळांला । सर्वभावेसीं शरण असावें श्रीचरणाला । महदपराधाला क्षमा करिती ॥७६॥ पूर्वी महदपराध केले । कालांतरें शुद्ध वैराग्य उपजलें । तेणेंगुणें समूळ पातक लया गेले । श्रीसमर्थ पावले सुखकारी ॥ ७७ ॥ आइका छत्रपती एकवार मनीं विचारी । जे श्रीसमर्थें सांगितली आत्मानात्मविचारपरी । ते अनुभऊन पाहतां नित्य निरंतरीं । प्रत्ययांतरीं अनुभवीतसों ॥ ७८ ॥ श्रीसमर्थप्रभूसीं अवकाश कांहीं । लव पळमात्र नाहीं । यालागीं भूप श्रीतुकयासीं पत्र लिही । सहवास कांहीं घडावया ॥ ७९ ॥ राजपत्र प्रधानपंतीं घेतलें । तिहीं श्रीतुकारामचरणीं अर्पिलें । तिहीं राजआशय निवेदिले । श्रीतुकारामीं दिधलें अभंगोत्तर ॥ ८० ॥

अभंग

" विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजीं खेळ नानायुक्ती ॥
" युक्तीचे चालक तपोनिष्ठ ज्ञानी । गुरूभक्त मनीं विश्वासी ॥ २ ॥
" ऐका तुझा प्रेमा कळला हा एक । पाहुनियां लेख पत्रींचे कीं ॥३॥
" शिव नाम तुझें ठेविलें पवित्र । छत्रपती सूत्र विश्वाचें कीं ॥ ४ ॥
" व्रत तप नेम ध्यान योग केला । करूनी मोकळा झालासी तूं ॥५॥
" हेत हा लागला आमुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि बहु ॥६॥
" याचें हें उत्तर ऐकेगा भूपती । लिहीतो विनंती हेताची हे ॥ ७ ॥
" अरण्यवासी आह्मीं फिरू उदासीन । दर्शने हें हीन अमंगळ ॥ ८
" वस्त्राविण काया जाहली मळीण । अन्नाविण जिणें फळाहारी ॥९
" रोड हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १०
" तुका ह्मणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥

२

" ऐसी माझी वाणी दीन रूप आहे । करुणा त्या पाहे हृदयस्थाशीं ॥
" न हो केविलवाणा न हो आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥२
" पांडुरंग आह्मां पाळिता पोशिता । आणिकाची कथा काय आतां ॥
" तुझी भेटी घेणें काय हो मागणे । आशेचें ही शून्य केलें तेणें ॥ ४
" निराशेचा गांव दिधला आह्मासीं । प्रकृती भावासीं सोडविलें ॥५
" पतिव्रतामन पतिशीच भेटो । तैसें आह्मी विठो माजीं बसों ॥६॥

" विश्व हें विठ्ठल नाहीं दुजे कांहीं । देखणें तुझेंही तुजमाजीं ॥ ७ ॥
" तुजही विठ्ठल हवा ऐसा वाटे । परी एक मोठी आवडीची ॥ ८ ॥
" सद्गुरु श्रीरामदासाचें भाषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ९ ॥
" बहुताची वृत्ती चाळविली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे केवीं ॥१०
" तुका ह्मणे बाबा चातुर्य सागरा । भक्ति एक थारा भाविकासीं ॥११

( ३ )

" आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा हा वीट मानूं नये॥
" जेणें योगें तुह्मा लागूं पाहे दोष । असा हा सायास करूं नका ॥२
" निंदक दुर्जन सांगाती असती । त्यांचया युक्ती चित्तीं आणूं नका॥
" परीक्षावे कोण राज्याचे सेवक । विवेकाविवेक पाहूनियां ॥ ४ ॥
" सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथाच्या काजा साह्य होसी ॥५
" हेंचि ऐकूनियां पावावें समाधाना । आतां या दर्शना काज नाहीं॥
" घेवोनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिवस गेले गेले ॥७
" एक दोन कर्मे जाणोनियां वर्मे । आपुलिया श्रमें राहो आतां ॥ ८॥
" कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वाभूतीं देख एक आत्मा ॥९॥
" आत्मारामीं मन देऊनियां राहे । रामदास पाहे आपणची ॥ १० ॥
" तुका ह्मणे राया धन्य धन्य स्थिती । त्रैलोकीं हे ख्याती कीर्ती तुझी

४

" राया छत्रपती ऐकावें वचन । रामदासीं मन लावी वेगीं ॥ १ ॥
" रामदासस्वामी सोइरा सज्जन । त्यासीं तूं नमन अर्पी बापा ॥ २ ॥
" मारुती अवतार स्वामी प्रगटला । उपदेश केला तुजलागीं ॥ ३ ॥
" रामनाम मंत्र तारक केवळ । जालासे शीतळ उमाकांत ॥ ४ ॥
" उफराटें नाम जपतां वाल्मीक । जाला पुण्यश्लोक तात्काळीक ॥५
" तोचि बीज मंत्र वसिष्ठ उपदेश । याहूनि विशेष काय आहे ॥ ६ ॥
" आतां धरूं नको भलत्याचा संग । राम पांडुरंग कृपा करीं ॥ ७ ॥
" धरूं नको आशा आमुची भूपाळा । रामदासीं डोळा लावीं वेगीं॥
" तुह्मी चाड आह्मा नाहीं छत्रपती । आह्मी पत्रपती त्रैलोक्याचें ॥९
" चारी दिशा आह्मा भिक्षेचा अधिकार । नेमिली भाकर भक्षावया॥
" पांडुरंगीं झाली आमुची हे भेटी । हातांत नरोटी दिली देवें ॥११॥
" आतां पडूं नको आमुचिये काजा । पवित्र तूं राजा रामभक्त॥१२॥
" विठ्ठलाचे दास केवळ भिकारी । आह्मा कधीं हरी उपेक्षीना॥१३॥
" शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घाली त्यासीं ॥ १४
" तुका ह्मणे राया तुज असो कल्याण । सद्गुरु शरण राहे बापा॥१५

टीका:—ऐसें हें पत्र शिवरायानें वंदिलें। उपरीं सिंहगडीं आगमन जालें। श्रीतुकाराम पुण्यनगरींत आले। कीर्तन आदरिलें शितोळे सरदारगृहीं ॥ ८१ ॥ तया कीर्तन श्रवणीं। शिवराज आले धांवोनी। आनंदले परम समाधानीं। श्रीतुकारामीं एकांत भेटी इच्छिली ॥ ८२ ॥ उभयता एकांतीं बैसले। श्रीतुकयानें भूपासीं नाना करुणा वचनीं संतुष्ट केलें। ह्मणती श्रीसमर्थीं आत्मानात्म जें तुज निरूपिलें। त्याहूनि आगळें आणीक नाहीं ॥ ८३ ॥ तंव तेथ अकस्मात श्रीसमर्थ प्रगटले। उभयतीं साष्टांगेंसीं अभिवंदिलें। शिवराज मनीं थकीत जाले। प्रेम संभाषण जालें त्रिवर्गीं ॥ ८४ ॥ त्रिवर्गीं आनंद चर्चा केली। भूपा परमार्थ प्रचिती विशेष बाणली। श्रीसमर्थें उभयतांसी आज्ञा पुसिली। अदृश्य जाले तत्काळ ॥ ८५ ॥ श्रीसमर्थ प्रभूचें महिमान। सांगोजातां असाधारण। धन्य धन्य ते काळींचें विश्वजन। श्रीसमर्थालागोन भजिन्नले ॥ ८६ ॥ श्रीसमर्थ प्रभूचें एकांतीं आगमन। शिवराज थरकती रोमांच भरोन। त्रिवर्गीं ब्रह्मानंदीं मिठी पडोन। देहभान विसरलें ॥ ८७ ॥ श्रीसमर्थरामदास जगजेठी। देखतां राया श्रीतुकारामा परमानंद पोटीं। नृपवराची पळाली भेदाभेद दृष्टी। संशय अटाटी पळों सरली ॥ ८८ ॥ श्रीसमर्थ श्रीतुकाराम एक स्वरूप। हें भूपा कळों सरलें निर्विकल्प। श्रीसमर्थ यशमाहिमानप्रदीप। भवजळताप निवारी ॥ ८९ ॥ श्रीतुकाराम साष्टांगें नमिला। उपरी राव आले राजगडाला। श्रीसंतपुरुषमाहिमा विशेष आठवला। माता जिजाईला निवेदिती ॥ ९० ॥ आइका छत्रपती अनुदिनीं। वारंवार आठवी मनीं। जें जावें जांबभुवनीं। श्रद्धाभावें करुनी श्रीश्रेष्ठचरण वंदावे ॥ ९१ ॥ श्रीसमर्थ प्रभूचा अधिकार। तैसाच श्रीश्रेष्ठींही निर्धार। श्रीसमर्थ वर्णिती वारंवार। प्रत्यंतर पाहों ह्मणे ॥ ९२ ॥ प्रसंगीं राज-

कारण घडलें । शिवराज राक्षसभुवना आले । येथोनि जांब निकट आइकिलें । नेम नेमिलें जांबेसि जाऊं ॥ ९३ ॥ रात्रौ भूप सुखासनीं पहुडला । तंव स्वप्नीं श्रीश्रेष्ठ प्रभू देखिले डोळां । छत्रपतीसीं दिधलें श्रीफळाला । प्रसादमाळा हातीं दिधली ॥ ९४ ॥ श्रीश्रेष्ठ ह्मणती शिउबा यावें । येथोनि निकट जांब-भुवन देखावें । श्रीरघुनाथ प्रसाद ग्रहण करावें । उपरी सुखें जावें निजदेशीं ॥ ९५ ॥ ऐसीं दृष्टांत वचनें आइकोनी । शिवराज देखती सावधपणीं । तंव माळा श्रीफळाचि दे-खती नयनीं । याविण कोण्ही दिसेना ॥ ९६ ॥ श्रीश्रे-ष्ठप्रभू स्वप्नीं देखिले । प्रेमपूर्ण नेत्रीं अश्रू भरलें । रायें सकळांसीं जाणविलें । सकळां जाणविलें जांबे चला ॥ ९७ ॥ श्रीसमर्थप्रभूची मातृभूमी । आजि डोळाभरीं देखों आह्मी । अत्यंत प्रेम संभ्रमीं । जांबभूमी ठाकोनि चालिले ॥ ९८ ॥ जांब देखतांचि रायें घातिलें लोटांगण । तैसेंचि अनुक्रमें घा-लिती सैनिकगण । चमत्कार राव सेना करिती धुळी वंदन । तें कौतुकपूर्ण अमरगण देखती ॥ ९९ ॥ शिवराज सेनासमुद्र तुंबळ भरला । तो देखतांचि जांबेचा जनलोक चाकाटला । शिवराज कठिण दंडक सैनिकाला । नगरीं उपद्रवाला न करिती ॥ १०० ॥ आमुच्या स्वामीचें जांबनगर । तें हे आमुचे जी मुख्य माहेर । आजि भाग्यें पावलों सधर । जांबनगर धन्य धन्य त्रिभुवनीं ॥ १ ॥ महाराज श्रीसमर्थप्रभू अवतरला । तो ह्या जांबेमधींच जन्मला । येथोनीच तो कृष्णातिरा आला । जांब-भुवनाला धन्य धन्य ह्मणती ॥ २ ॥ रायें कटक ठेविलें दूरवर । अल्प परिवारेंसीं प्रवेशला जांबनगर । चाकाटोनि धांवती पाहती नारीनर । शिवनृपवर पहा पहा ह्मणती ॥ ३ ॥ शिव-रायाची दिव्य कांती । दिव्य तेज झळके श्रीमुखावरती । त्यासीं पहावया नारी नर बाळें लोधोनि पडती । लोटांगणें

घालिती चरणावरी ॥ ४ ॥ शिवराज जांबेचिया सानथोरां प्रेमपडिभरीं । अदरें साष्टांगेंसी नमस्कारी । श्रीसमर्थ स्वरूप देखे जांबनगरीं । आनंदपरी वर्णवेना ॥ ५ ॥ दोन प्रहर भरतां पूर्ण । राव आला श्रीश्रेष्ठ सदन ठाकोन । अनन्य प्रीती घातिलें लोटांगण । स्नेहाश्रुपूर्ण नेत्रीं श्रवती ॥ ६ ॥ रायें घालितां लोटांगण । झणींच श्रीश्रेष्ठप्रभूनीं घेतिलें उचलोन । कुशलप्रश्णीं करिती संभाषण । भोजना लागून आज्ञा श्रीश्रेष्ठांची ॥ ७ ॥ राव जांबेस अल्प परिवारें आला । सेना संभार आंबराईंत ठेविला । तो सकळही भोजनासीं बोलाविला । श्रीश्रेष्ठ विलंबाला न करावें ह्मणती ॥ ८ ॥ अल्प साहित्य पाकसिद्धी होती केली । सेना तरी अपरिमित भरली । स्वामींनीं आग्रहें ते सकळ पाचारिली । तृप्ती जेवविली नवलाकारें ॥ ९ ॥ अयाचित शिवराय आला । तो परिवारें तृप्तीवरी जेवविला । विस्मय भरला शिवरायाला । श्रीश्रेष्ठ श्रीशिवरायाला समसाम्य मानिलें ॥ १० ॥ श्रीश्रेष्ठप्रभूचें सामर्थ्य कळलें । शिवरायें श्रीश्रेष्ठां साष्टांगें नमिलें । श्रीश्रेष्ठीं शिवराया वस्त्राभरणीं गौरविलें । असीर्वाद दिधले नानापरी ॥ ११ ॥ शिवराज जांब नगरीं आला । श्रीश्रेष्ठप्रभूसीं धन्यवाद वाटला । शिवरायें वर्णिली श्रीसमर्थलीला । सानथोराला परमाश्चर्य जाहलें ॥ १२ ॥ श्रीश्रेष्ठ ह्मणती नृपवराला । माझा नारोबा धन्य ह्या महीतळाला । तूं ही धन्य भूप त्यासीं शरण गेला । धर्म संस्थापनेला गाजविलें ॥ १३ ॥ देवकार्य तुह्मीं साधिलें । अविंधमाजातें जिरविलें । साधुसंतासीं संतोषविलें । मंगळ केलें विश्व तुह्मी ॥ १४ ॥ तंव रायें श्रीश्रेष्ठचरणीं लोटांगण घातिलें । श्रीरघुनाथा मुलुख तोडोनि दिधले । ते वंशपरम्परा चालत आले । शिवराज भले धर्ममूर्ती ॥ १५ ॥ श्रीश्रेष्ठप्रभूचा निरोप घेतला । शिवराज आले निजस्थळाला । श्रीसमर्थचरणीं वृत्तांत निवे-

दिला । श्रीश्रेष्ठ सप्रचीतीला आले ह्मणती ॥ १६ ॥ रायासीं श्रीसमर्थ पुसती । जे जिउबा तुज आली श्रीश्रेष्ठप्रचीती । शिवराज सलज्यपणें हो ह्मणती । श्रीश्रेष्ठश्रीसमर्थीं समसाम्य जालें ॥ १७ ॥ आतां आणीक आइका श्रोतेहो चरित्रविंदान । श्रीवेणीस्वामी अधिकारी परिपूर्ण । वारंवार विनवी श्रीचरणा लागोन । परंधामीं गमन करावया ॥ १८ ॥ यापरी वेणाईनें बहुवार विनाविलें । देवें बहुकाळ राहविलें । चमत्कार भाषण कवणाही नकळे । सिद्धप्रेमळे जाणती उद्धव कल्याण ॥ १९ ॥ पुनरपी वेणाईनें श्रीचरणीं विनाविले । श्रीसमर्थ देवें दिनमान पाहिलें । अक्काईस सन्निध पाचारिलें । आज्ञापिलें वेणाई निजधामागमन आजीं ॥ २० ॥ ऐकतां वेणाई निजधामागमन । अक्का मूर्च्छित पडली पूर्ण । सकळांचे आले नेत्र भरोन । वेणाई निधान जातसे ह्मणती ॥ २१ ॥ श्री ज्ञानराजाची मुक्ताई । तैसीच श्रीसमर्थप्रभूची वेणाई । अधिकारी पूर्ण श्रीसमर्थपदवी । महानुभाव सिद्धाई परिपूर्ण ॥२२॥ आनंदें भोजन समारंभ जाला । वेणाई ठाकली कीर्तनाला । प्रेमपडिभरें भगवंत गुणलीला । अवलीला श्रीरघुनाथ वर्णिला ॥ २३ ॥ वेणाईचे कीर्तनीं महिमान । श्रीसमर्थकृपें वाढलें असाधारण । एका वेणाई वाचोन । अन्य स्त्रीदेहालागून श्रीसमर्थ आज्ञा नव्हती ॥ २४ ॥ श्रीसमर्थ स्त्रीशिष्यपरिवारामाजीं । विशेष वेणाई निवडली गाजी । सिद्ध पदवी अधिकार सहजी । श्रीसमर्थप्रभूची कृपा पूर्ण ॥ २५ ॥ कीर्तन प्रेमकल्लोळीं केलें । माजीं श्रीरामनाम विशेष गर्जविलें । आरती करोनि साष्टांग दंडवत घातिलें । श्रीसमर्थचरणीं ठेविलें देहासीं ॥ २६ ॥ धन्य धन्य भाग्याची वेणाई । समतुक अन्य उपमा नाहीं । हळ हळले महानुभाव सर्वही । कीर्तनीं पाही कलेवर ठेविलें ॥ २७ ॥ सकळीं डोळा पदर लाविलें । अक्का हंबर्डा फोडोनि गडबडां

लोळे। ह्मणे माझ्या वेणाईनें मज सांडिलें। विरहदुःखकल्लोळें सकळ रडती ॥ २८ ॥ श्रीसमर्थ प्रभूनें सकळांसीं वारिलें। श्रीरामनामीं घोष गाजविले । वेणाईचे समाधिस्थान निकट केलें। वृंदावन शोभलें आद्यापवरी ॥ २९ ॥ वेणीस्वामी काल जाला। वेणाईकीर्तिप्रताप गाजला। श्रीसमर्थचरणीं कीर्तनीं देह ठेविला। धन्य माउली वेणाई ॥३०॥ आतां आणीक कथा विं-दान। गंगातिरीं श्रीश्रेष्ठप्रभूचें महिमान । गंगातीर गाजविलें शुद्धभक्तिभावें करोन। सान थोर जन उद्धरिलें ॥ ३१ ॥ सप्र-चीत भक्तिमहिमा। वश तेणेंचि मुख्य परमात्मा। अयाचित-वृत्ती नितष्कामकर्मा। कवण उपमा उपमेसीं ॥३२॥ श्रीश्रेष्ठप्रभूनीं शिष्यपरिवार केला। शुद्ध भक्तिमार्ग उजळिला। श्रीरामउपा-सना गंगातिराला। श्रीश्रेष्ठ आबालवृद्धाला परमपूज्य जाले ॥ ३३ ॥ ऐसा श्रीश्रेष्ठ भक्तियोग चालिला। श्रीश्रेष्ठकालस-मय ठाकोनि आला। तो प्रसंग पाहिजे आइकिला। श्रोतीं श्रवणाला सावधान व्हावें ॥ ३४ ॥ शिवळीं प्रांताधिकारी। ज्यांसीं निकटदास्य श्रीश्रेष्ठचरणावरी। विवाह समारंभ त्या-चिये गृहीं। आग्रहावरी आग्रह श्रीश्रेष्ठां ॥ ३५ ॥ श्रीश्रेष्ठीं बहुपरी नाकारिलें। पुढील भविष्यमान जाणीतलें। विशेष आग्रहमान पाहोन बोलिले। श्लोकचरणागळे भुजंगप्रयाती ॥३६॥

श्लोकः

कळेना पुढें काय होणार आहे। कळेना देहे कोठपर्यंत राहे।
कळेना मरावें स्वदेशीं विदेशीं। कळेना पुढें वेळ येणार कैसी॥

यापरी श्रीश्रेष्ठ श्लोकचरण बोलिले। उपरी समारंभीं परिवारें चालिले। लग्नसमारंभ निर्विघ्न पार पडले। परतोनि आले दहिफळ मुक्कामीं ॥ ३७ ॥ दहीफळ मुक्कामीं येतां। श्रीश्रेष्ठ आ-ज्ञापिती समस्तां। संध्यावंदन भोजनादि आटोपा ह्मणती सत्वरता। त्वरा तत्वता विशेषें परी ॥ ३८ ॥ रामचंद्र बाबांनीं

प्रश्ण केला । जी देवा कोण कारण त्वरेला । श्रीश्रेष्ठ ह्मणती साधावें ह्मणीं अन्हिकाला । कारणाला पुढें सांगू ॥ ३९ ॥ भोजनोत्तरीं शिष्यपरिवार पाचारिला । भजन समारंभ उभा केला । सन्निध पाचारिलें रामचंद्र बावाला । आह्मी परंधामाला जातों सांगीतलें ॥४०॥ तंव रामचंद्रबावा परम दुःख दाटलें । श्रीश्रेष्ठीं त्यांसीं ह्मणीं वारिलें । आत्मानात्म विचारें समाधान केलें । समाधान दिधलें कृपाकटाक्षें ॥ ४१ ॥ येरीकडे श्रीरामनामीं घोष दाटला । श्रीश्रेष्ठप्रभू रामनामीं समाधी गेला । सर्वत्र एकचि हाहाःकार दाटला । श्रीश्रेष्ठगुणलीला आठवती ॥ ४२ ॥ शके पंधराशें नव्व्याण्णवोत्तरीं । पिंगलनाम संवत्सरीं । फाल्गुनवद्य त्रयोदशी माझारीं । दोन प्रहरीं श्रीश्रेष्ठ परंधामीं गेले ॥ ४३ ॥ अंत्यविधी समारंभ जाला । तो रामचंद्रबावांनीं सम्पादिला । पत्र पाठविलें जांबेला । शामजीबावा बाईला आणविले ॥ ४४ ॥ बाईअधिकार सामर्थ्य भारी । श्रीश्रेष्ठ अंतकाल ऐकतां सत्वरी । देह ठेविला निर्धारीं । श्रीरामनाम गजरीं गर्जोनी ॥ ४५ ॥ धन्य श्रीश्रेष्ठांचें भजन । धन्य श्रीश्रेष्ठपत्नी पुण्यार्चन । धन्य धन्य सूर्याजीपंतकुळ सम्पूर्ण। श्रीरघुनन्दन सबाह्य अभ्यंतरीं कोंदला ॥४६॥ श्रीश्रेष्ठ सपत्नीक वृंदावन केलें । जयाचे अद्यापवरी पूजन अर्चन चाले। शिवरायें वेतन तोडोनि दिधलें । श्रीश्रेष्ठ पावले पुण्यफलदाई॥४७॥ हे श्रीश्रेष्ठनिजधामवार्ता । ह्मणीं जाणवली श्रीसमर्थचित्ता । आज्ञापिती कल्याणा उद्धवा त्वरिता । जाऊं ह्मणती माहुलीसंगमीं स्नाना ॥ ४८ ॥ अकालीं स्नाना कोण कारण । उद्धवें पुसिलें श्रीसमर्थांलागोन । श्रीसमर्थ ह्मणती श्रीश्रेष्ठ परंधामीं गमन । आजींच निर्वाणदेहे तिहीं ठेविला ॥ ४९ ॥ श्रीसमर्थवचनीं घालिती लोटांगण । ह्मणती अगाधप्रभूचें ज्ञान । पूर्वीं जाणविलें मातृनिधन । आजि श्रीश्रेष्ठपरंधामगमन जाणविलें ॥ ५० ॥ शिवराज उद्धव कल्याण ।

परिवारेंसीं देवें केलें माहुली स्नान। उपरी उद्धव पाठविले जांबेलागून। श्रीश्रेष्ठपुत्र सुखासनीं आणवीले ॥ ५१ ॥ त्यासीं बहुकाळ घेतलें ठेवोन। श्रीरामउपासना पढविली ऊण खूण। नानापरी ज्ञान बोधोन। शहाणपण शिकविलें ॥ ५२ ॥ उभयतां पुत्रांनीं इच्छा केली। देवें समारंभें बोळवण केली। जातां श्लोकचरण पत्रिका हातीं दिधली। श्रोतीं अवधारिली पाहिजे ॥ ५३ ॥

श्लोक

बरें सत्य बोला यथातथ्य चाला। बहू मानिती लोक येणें तुह्माला।
धरा बुद्धि पोटीं विवेकें मुलें हो। बरा गूण तो अंतरामाजि राहो॥१
सदा दांत घासोनि तोंडा धुवावें। कळाहीन तें शूद्र मूर्खीं नसावें।
सदा सर्वदा यत्न सोडूं नये रे। बहुसाल हा खेळ कामा नये रे ॥२
दिसामाजिं कांहीं तरी तें लिहावें। प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें।
गुणश्रेष्ठ ऊपास्य त्यांचें करावें। बरें बोलणें सत्य जीवीं धरावें ॥३॥
बहु खेळ खोटा मदालस्य खोटा। समस्तांसि भांडेल तोची करंटा।
बहुतां जनालागीं जीवीं भजावें। भल्यासंगती न्याय तेथें भजावें॥४॥
हिशोबीं सदा न्याय सांडूं नये रे। कदाचीत अन्याय होतां दगा रे।
जनीं सांडितां न्याय रे दुःख होतें। महासुख तें ही अकस्मात जातें॥
प्रचीतीविणें बोलणें व्यर्थ वाया। विविकेविणें सर्वही दंभ माया।
बहु सज्जला नेटका साज केला। विचारेंविणें सर्वही व्यर्थ गेला॥६॥
वरी चांगला अंतरीं गोड नाहीं। तया मानवाचें जिणें व्यर्थ पाहीं।
वरी चांगला अंतरीं गोड आहे। तयालागिं कोणी तरी शोधिताहे॥
सदा अंतरीं गोड तें सांडवेना। कदा अंतरीं वोखटें देखवेना।
ह्मणोनी बरा गूण आधीं धरावा। महा घोर संसार हा नीरसावा॥
भला रे भला बोलती तें करावें। बहूतां जनाचे मुखें यश घ्यावें।
परी शेवटीं सर्व सोडोनि द्यावें। मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥९॥
बरा वोखटा सर्व संसार जाला। अकस्मात येईल रे काळ घाला।
ह्मणोनी भले सांगती सत्य चाला। जनीं दास तो बोधिताहे मुलाला

श्रीसमर्थप्रभूंनीं लेंकुरां जवळ घेतिलें। त्यांसीं स्नेहभरें आलिंगिलें। उभयता पुत्रांनीं श्रीसमर्थचरण वंदिले। शिरसावंदिलें श्रीसमर्थ-

श्लोकपत्र ॥ ५४ ॥ ऐसें श्रीश्रेष्ठपरंधामगमन । मी बोलिलों अल्प साधारण । हृदयस्थस्वामी श्रीसमर्थ आपण । चरित्रलेखन तो करवी ॥ ५५ ॥ आतां पुढील प्रसंगीचें निरूपण । विविशे आगळें नवल विंदान । श्रीसमर्थस्वामी हृदयस्थ होवोन । काव्यस्फुरण तो करवी ॥ ५६ ॥ धन्य सोनियाचा दिवस पाहिला । चतुर्दश प्रसंग मियां लिहिला । श्रीसमर्थबाप कृपा वोळलात्याश्रीचरणाला हृदय सम्पुटीं सांठऊं ॥ ५७ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमू विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ १५८ ॥ इतिश्रीरामदासकथासारामृत । भिमूविरचितायाम् । श्रीचरणींशिवराज राज्यसमर्पण । श्रीवेणाई श्रीश्रेष्ठकालवर्णन्नामचतुर्दश प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १५ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणंच वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



रामदास कृपेचें दान । तें हें श्रीसमर्थचरित्रलेखन । रसना रंगली स्थिरावलें मन । सस्वरूपावलोकन करीतसे ॥ १ ॥ राहिला विषय विषाचा चाळा । ठाईंच स्थिरावला इंद्रियमेळा । कुतर्क कुबुद्धि सरली अवकळा । श्रीरामदास डोळा बिंबला ॥ २ ॥ श्रीरामदासकृपादान । तेणें तुटलें संसारबंधन । आवडीं आलें चरित्रलेखन । समरस होवोन रंगीं रंगलों ॥ ३ ॥ करूनि श्रीसमर्थचिं-

तन । वंदूनि श्रीगुरु श्रीधरचरण । चालऊं आतां कथानुसंधान । श्रोतीं अवधान मज द्यावें ॥ ४ ॥ मागां चतुर्दश प्रसंगींचे अंतीं । श्रीश्रेष्ठ गेले परंधामाप्रती । पुढें सावधान व्हावें श्रोतीं । कथा त्रिजगतीं अति रम्य ॥ ५ ॥ श्रीसमर्थसमकाळीं ठाईं ठाईं । सिद्ध गाजविती सिद्धाई । माजीं श्रीमौनींची विशेष नवाई । शिष्यसमुदाईं विशेष प्रतिष्ठा ॥ ६ ॥ श्रीसमर्थसिद्धीचें महिमान । दूरवर गेलें पसरोन । तें श्रीमौनीशिष्यांसीं नमने जाण । अप्रमाण दंतकथन मानिती ॥ ७ ॥ सहजें सांगतां श्रीसमर्थमाहिमान । त्यासीं झिडकारिती हेळसोन । एका श्रीगुरूमौनी वांचोन । सिद्धपण न घडे ह्मणती ॥ ८ ॥ यापरी बहुकाळ लोटला । तंव ग्रहण पर्वकाळ आला । मौनीशिष्यवर्गीं नेम नेमिला । श्रीसमर्थ महिमेला पर्वकाळीं पाहूं ह्मणती ॥ ९ ॥ तिहीं बहुवार पुसिलें श्रीमौनीप्रती । पूर्वीं तिहीं सम्मती दिधली नव्हती । ग्रहण पर्वकाल आणूनि चित्तीं । माहुलीसंगमाप्रती शिष्यसमुदाय पाठविला ॥ १० ॥ श्रीसमर्थ पर्वकाळ पाहती । सवें यावया कल्याणा आज्ञापिती । थालिपीठ वेवाविलें फलाहाराप्रती । पर्वकाळ त्वरित माहुलींत आले ॥११॥ श्रीसमर्थ कल्याण हुमुंजी बाणा । दिव्य कांती दिव्य तेज नयना । जो तो धांवोनि वंदी श्रीचरणा । मौनी शिष्यगणां टकमक जालें ॥ १२ ॥ श्रीसमर्थदयाळें विरुद्ध केलें । पर्वकाळीं थालीपीठ भक्षीत बैसले । मौनी शिष्यवर्गीं कोण ऐसें जनां पुसिले । श्रीसमर्थ कळलें राजगुरू ॥ १३ ॥ तें देखोनि ह्मणती धिग् धिग् राजगुरू । आचारविहीन भ्रष्टाकारू । निःशंक दिसोनि येतो असद्गुरू । याहूनि श्रीगुरू मौनी भला ॥ १४ ॥ इतुकियांत देवें केलें नवलविंदान । ह्मणीं आज्ञापी शिष्य कल्याण । ह्मणती थालीपीठ आडकलेरे तोटरालागोन । दुग्ध कालवण आणीं कां ॥ १५ ॥ तंव निकट माहुलीं ब्राह्मण घरीं ।

एक दुधड धेनू होती भारी । कवणाचा वारा पडों न दे अंगावरी । ब्राह्मण निरंतरीं जपतसे ॥ १६ ॥ विप्रस्त्रियेनें अविचारें सोडिली । ते न सांवरत सैराट निघाली । पळतां कृष्णेंत दरडीवरूनि आदळली । मृत्यु पावली तत्काळ ॥ १७ ॥ धेनू आदळतां प्राण गेला । तंव विप्र स्त्रियेनें शोक मांडिला । ह्मणीं देवें आज्ञापिलें कल्याणाला । मृतधेनुदुग्धाला आणावें ह्मणती ॥ १८ ॥ श्रीसमर्थआज्ञा प्रमाण । कल्याण आले मृत धेनू ठाकोन । विनविती मृतधेनु लागून । जे दुग्ध कालवण श्रीगुरू इच्छिती ॥ १९ ॥ ते मृत धेनू दरडीवरूनी पडिली । मरतां विश्वजनीं डोळां देखिली । द्विजस्त्री कल्याणा वदली । बाबा मृतधेनुदुग्ध केंवि मिळे ॥ २० ॥ कल्याणें मृतधेनूसी शिरसा वंदिलें । जन हांसतां धेनूसीं दुग्ध द्यावें ह्मणितलें । कल्याणें धेनूसीं हस्तस्पर्श करितां चैतन्य भरलें । उभीं राहिली अति शांत वृत्ती ॥२१॥ मृतधेनू उठोनि उभी राहिली । कल्याणें सकळां देखतां दुहिली । श्रीसमर्थां दुग्धतपेली अर्पिली । तृप्ती पावले श्रीसमर्थस्वामी॥२२॥श्रीसमर्थांनिकट धेनू आली । श्रीसमर्थप्रभूनें प्रीती गोंजारिली । खस्याळ होती सौम्यता पावली । विश्वजनीं देखिली डोळांभरी ॥२३॥ ऐसा नवलाव देखिला । श्रीमौनीशिष्यसमुदाव चाकाटला । अति लज्जायमान घालिती लोटांगणाला । श्रीसमर्थ प्रभूला वारंवार स्तविती ॥ २४ ॥ जे आमुचे मनीं विकल्प होता । तो दूर गेला जी निर्धारिता । आमुची जळोनि गेली विकल्पव्यथा । श्रीसमर्थसामर्थ्य प्रत्यक्ष देखिलें ॥ २५ ॥ तंव श्रीसमर्थ बोलिले अमृतवचनीं । ह्मणती साच महासिद्ध श्रीमौनीच स्वामी । मी एक दीन रंक त्यांचे चरणीं । श्रद्धा लोळणीं घालूं ह्मणतों ॥ २६ ॥ धन्य भाग्याचे तुह्मीच जनीं । धन्य तुह्मां श्रीगुरुस्वामी मौनी । तुमचिया भाग्यासि तुळणा नाहीं त्रिभुवनीं । धन्य धन्य जनीं श्रीमौनी प्रभू ॥ २७ ॥ तो

मौनीशिष्यवर्ग ओशाळला । श्रीसमर्थचरणीं लोटांगणीं आला । सलज्ज श्रीसमर्थ निरोप घेतिला । स्वाश्रमाला आले ॥ २८ ॥ तिहीं देखिलें तें श्रीमौनीप्रती निवेदिलें । गलितगर्व जालों ऐसें निवेदिलें । श्रीमौनीप्रभूंनीं निज शिष्यासीं धिक्कारिलें । मूर्ख ह्मणितलें वारंवार ॥ २९ ॥ अरे प्रत्यक्ष श्रीहनुमंत । स्वामी अवतरला श्रीसमर्थ । तुह्मी मूर्ख अविवेकी तेथ । श्रीसमर्थ अंत पाहों गेलां ॥ ३० ॥ ह्मणौनि श्रीमौनी परिवारें निघाले । श्रीसमर्थ प्रभूच्या भेटी आले । श्रीसमर्थचरण साष्टांगें नमिले । श्रीसमर्थें घातिलें लोटांगण ॥ ३१ ॥ परस्परीं कोटि आनंद वाटले । परस्परीं परमार्थ संवाद केले । परस्परीं प्रेम पूर्ण निरोप घेतले । समसाम्य दाविलें परस्परीं ॥ ३२ ॥ देवें खट्याळ मृत धेनू उठविली । ते तिची खट्याळ चाली उजरिली । ज्याची त्यासीच निरविली । द्विजवरें वंदिलीं श्रीसमर्थचरणयुगुलें ॥ ३३ ॥ श्रीसमर्थ अंतरसाक्षी सर्वां ठाईं । त्यांची किती वर्णावी नवल नवाई । श्रीसमर्थसामर्थ्यपदवी । श्रीसमर्थगोसावीच चालविती ॥ ३४ ॥ शिवरायासीं नित्य सुखसुख सम्पादणें । नित्य नूतन गडकोट किल्ले बांधणें । ठाईं ठाईं नूतन युद्ध नूतन कार्य उभाविणें । श्रीसमर्थ दाखविणें राज्यसमृद्धी ॥३५॥ छत्रपतीचें सामर्थ्य वैभव । अवर्णनीय अत्यंत अपूर्व । वैकुंठसम्पत्ती उतरली स्वयमेव । सामर्थ्य वैभव श्रीसमर्थ कृपें ॥ ३६ ॥ शिवरायाचे सैनिकगण । युद्धीं विक्राळ भय दारुण । शत्रू भयकम्पित करिती पलायन । भीमरूपी पूर्ण शिवराज सेना ॥ ३७ ॥ रायें आरंभिली गडकोट तटबंदी । असंख्यकामकरी मेळविली जनमांदी । तें नृपवर देखे परमानंदीं । धीरबुद्धी विशेष एक ॥ ३८ ॥ जें हा जनलोक लक्षावरी । मीच यासीं पुरविता अन्न सिदोरी । धन्य माझी सामर्थ्यथोरी । धन्य चराचरां शिवराज मी ह्मणे

॥ ३९ ॥ इतुकाचि शिवराजमनीं भाव प्रगटला। तो क्षणीं श्रीसमर्थ देवा जाणवला। आकस्मात प्रगटले गडकोटतटाला। शिवरायाला भेटी दिधली ॥ ४० ॥ शिवरायें घातिलें लोटांगण। सर्वभावेसीं पूजिले श्रीचरण। श्रीसमर्थें पुसिले कुशलप्रश्ण। रायें नूतन कार्य पहावें विनविलें ॥ ४१ ॥ संगें नृप सपरिवार श्रीसमर्थ चालिले। गडकोट किल्ले काम सूक्ष्म निरखिलें। ठाईं ठाईं सूचना संकेत निवेदिलें। व्यक्त केलें समाधान ॥ ४२ ॥ मध्येंच विशाळ पाषाण देखिला। देवें छत्रपतीसीं प्रश्ण केला। जे पाषाण कोण कारण आड राखिला। अडणुकीला युक्तही नव्हे ॥४३॥ राव नम्रत्वें ह्मणे प्रसंगानुसार। यासी काढणें आहे सत्वर। श्रीसमर्थ ह्मणती नलगे कालांतर। येचक्षणीं सत्वर काढावा ॥ ४४ ॥ श्रीसमर्थ आज्ञा जाली। रायें सत्वर पाथरवटें बोलाविलीं। श्रीसमर्थें रेषमात्र मारूनि दिधली। पाषाण फोडविला कुशळत्वें ॥ ४५ ॥ पाषाण फोडितां कवतूक जालें। आंत जळीं मेंडकी खेळे। जिवंत जळ क्रीडे अळुमाळ। नृप जन डोळां देखती ॥ ४६ ॥ पाषाणामाजीं पाणी। कवणे सांठविलें कोठुनी। आंत मेंडकी सांठऊनी। जिवंतपणीं कैसी कोणें राखिली ॥ ४७ ॥ रायें श्रीचरणीं लोटांगण घातिलें। श्रीसमर्थां अतिविनीत भावें पुसिलें। ह्मणे देवाधिदेवा कैसें हें कौतुक घडलें। कृपाळूपणें विवेदिलें पाहिजे स्वामी ॥ ४८ ॥ श्रीसमर्थें स्मितहास्य केलें। ह्मणती शिउबा तुंवांचि येथ जळ सांठविलें। तुंवांचि मेंडकीप्रती प्रतिपाळिलें। तुजविण वेगळा कोण संरक्षिता ॥ ४९ ॥ तंव राव देखे दीन वदन। ह्मणे नव्हे माझें हें करणें। मी मतिमंद बुद्धिहीन दीनपणें। पाषाणीं पाणी केंवि सांठवीन ॥ ५० ॥ स्वामी ह्मणती तुज आतां बरवें कळलें। आणि लोकां पोषितां बरवें मानवलें। वृथा अहंकार वृत्तीनें नागविलें। वृथा मानिलें मी कर्ता ॥ ५१ ॥ स्वामी-

वचनीं छत्रपतीगर्व गेला अभिमान। श्रीचरणीं नम्रत्वें घाली लोटांगण। ह्मणे स्वामी क्षमा करावी पूर्ण। वृथाभिमान गेला जी ॥ ५२ ॥ श्रीसमर्थें शिवरायाचा गर्व हरिला। तो विश्वजनीं चमत्कार देखिला। श्रीरामनामीं गजर केला। श्रीसमर्थलीला अपार अपरंपार ॥ ५३ ॥ तेथ श्रीसमर्थ प्रभूनें। आवडीं गाइलें गाणें। श्रोतीं सादरें करावें श्रवण। श्रीसमर्थमहिमान न वर्णवे ॥ ५४ ॥

श्रीसमर्थांचें पत्र

आह्मी काय कुणाचें खातों रे। तो राम आह्माला देतो रे ॥ धृ० ॥
बांधिले घुमट किल्ल्याचे तट। तयाला फुटती पिम्पळवट।
येथें कोण लावितो मोट। बुडाला पाणी घालितो ॥ आ० १ ॥
खडक फोडिता सजिव रोडकी। पाहिली सर्वांनीं वेडकी।
सिंधु नसतां तियेचे मुखीं। पाणी कोण घालितो ॥ आ० ॥ २ ॥
पहा रे पहा मातेचियेस्तनीं। चिंतिता रक्त मांसल खाणी।
तेथें विमळ दुग्ध घालोनी। कोण पोशितो ॥ आ० ॥ ३ ॥
नसतां पाण्याचे बुड बुडे। सदा सर्वदा गगन कोरडें।
दास ह्मणे जीवन चहुंकडे। पाडुनी सडे पीक उगवीतो ॥ ४ ॥

टीकाः—शिवराजअहंकार गळाला। श्रीरामकर्ता अंगीं बोध पूर्णपणें बाणला। श्रीराम साक्षी चराचराला। श्रीसमर्थ प्रभूला सर्वसाक्षी ह्मणे ॥ ५५ ॥ दैवें शिवराजहृदय परिक्षिलें। सप्रचीतें अनुभऊनि घेतिलें। वृथा शरीरव्याधीनें पीडूनि दाविलें। सकळां जाणवली श्रीसमर्थव्याधी ॥ ५६ ॥ बहु उपचार केले। बहू राजवैद्य पाचारिले। परंतु कांहीं एक गुण शरीरा न आले। गजबजिले भक्तगण ॥ ५७ ॥ तेथ शिवराज सेवेवरी। सर्वकाळ श्रीचरणां निकट निर्धारीं। वारंवार श्रीचरणीं विनंती करी। उपचार परी कोण स्वामीसीं ॥ ५८ ॥ स्वामी ह्मणती। शिउबा न घडे रे उपचार। पळ क्षण आतां न राहेल हें शरीर ऐसें ह्मणतां फोडिली दुःख हांक थोर। जय जय श्रीरघुवीर

ह्मणोनी ॥ ५९ ॥ पुनरपी रायें काकुलती विनाविलें । श्रीसमर्थ ह्मणती तुंवा जरी निःशस्त्रीं व्याघ्रदुग्ध आणिलें । आणोनि आह्मां प्राशन कराविलें । तरीच राहेल नेणों कलेवर हें ॥ ६० ॥ राव तत्काळ उठिला । निःशस्त्र आला अरण्याला । शोधोनि काढिले भयाण व्याघ्रजाळीला । वाघिणीला अवलोकिलें ॥६१॥ आइका श्रीसमर्थसेवेकारण । शिवराजें विकिला जिव प्राण । वाघिणीसी घाली लोटांगण । श्रीसमर्थांकारण दुग्ध द्यावें ह्मणे ॥६२॥ अहो चित्त शुद्ध असतां । व्याघ्रसिंहाची काइसी कथा । विषाचें अमृत ही होतां । विलंब तत्वतां नलगेचि पै ॥ ६३ ॥ शुद्धचित्तें शिवराज नमस्कारी । निःशंक प्रवेशला व्याघ्रजाळीभीतरीं । वाघिणीसी कुरवाळी परोपरी । स्तन करीं पिळों पाहे ॥ ६४ ॥ श्रीसमर्थप्रभूकारणें । रायें व्याघ्रमुखीं देह अर्पणें । तंव तये निर्धारीं श्रीसमर्थां तत्काळ धावणें । संरक्षणें निज तान्हया ॥ ६५ ॥ श्रीसमर्थदेवें नवल केलें । व्याघ्रदेह मावळोनि आपणचि प्रगटले । शिवराज एकाकी चमत्कारले । आलिंगन पडलें गुरुशिष्यां ॥ ६६ ॥ नृपराज भक्तिप्रेमकसोटीं उतरले । श्रीसमर्थें शिवराज प्रेमपडिभरें कवटाळिले । उभयतां ब्रह्मानंदीं समरस जाले । श्रीसमर्थ प्रसन्नले शुद्ध भक्तिभावार्थें ॥ ६७ ॥ स्वामी ह्मणती शिउबा तूं पूर्ण प्रतीतीसी आला । तुझा शुद्ध भावार्थ आह्मीं आजि पूर्ण देखिला । धन्य धन्य तूं श्रीगुरुभक्तिपद पावला । तुझिया महिमेला तुळणा नाहीं ॥ ६८ ॥ शिवराज हातीं धरिला । श्रीसमर्थ आले मठाला । सकळां देखत भूप गौरविला । चमत्काराला साकल्य निवेदिलें ॥ ६९ ॥ पर्वकाळीं स्वामी माहुलीं स्नाना आले । पर्वकाळीं दक्षिणार्थ द्विजगण धांवले । देवें सकळां संकल्प बोलविले । दक्षिणार्थ दिधले पाषाण वाळुका ॥ ७० ॥ स्नानोत्तर देवें प्रयाण केलें । श्रीसज्जनगिरीं ठाकोनि आले । विप्रवर्ग

विकल्पीं बुडाले । ओशाळले वाळु पाषाण देखतां ॥ ७१ ॥ ह्मणती स्वामींनीं उपहती केली । आशेची नैराश्यता जाली । राजगुरु अंगीं पद्वी मिरविली । दातृत्वें बोळली पाषाण वाळुका ॥ ७२ ॥ तंव कोणीएक विप्रें भाव धरिला । दिला पाषाण पदरीं बांधिला । सहजें तरी तैसाचि पद्रीं राहिला । धुणावळीला भिक्षुभार्या निघाली ॥ ७३ ॥ तंव त्या अंगवस्त्रा-पद्रीं । चमत्कारें गांठ देखे सुंद्री । सोडोनि पाहतां नेत्रांतरीं । तेज परोपरी सुवर्ण झळकलें ॥ ७४ ॥ ते धांवत सोयीं गृहीं आली । भर्त्यासी आनंदभरें बोलिली । हे सुवर्णप्राप्ती तुह्मां कैसी जोडली । भली फिटली दैन्य दारिद्रता येणें ॥७५॥ आतां करीन कंकण पाटल्या । कानीं लेईन बुगड्या बाळ्या । झणीं न फिरवा पंचांग झोळ्या । आनंद उकळ्या स्त्रीपुरुषां ॥ ७६ ॥ विप्र सांगे स्त्रियेला । अगे आपणा राजगुरु बोळला । मियां त्याचिया पाषाणीं भाव धरिला । तोचि हा जाहला सुवर्ण पाषाण ॥ ७७ ॥ तंव हांहां ह्मणतां भिक्षुमांदी मिळाली । श्री-समर्थपाषाणलीळा प्रगट कळली । परस्परीं हेवावृत्ती दुणावली । अधोमुखें कष्टलीं एकेक ॥ ७८ ॥ मग सकळीं संकल्प केला । चला जाऊं ह्मणती श्रीस्वामीदर्शनाला । पाहूं कांहीं कृपें बो-ळला । दारिद्र्याला तो शमवील ॥ ७९ ॥ धांवोनि आले श्री-सज्जनगिरीं । जो तो श्रीसमर्था साष्टांगें नमस्कारी । कौतुकें सांगती सुवर्णपाषाणपरी । आह्मी भिकारी राहिलों अश्रद्धें ह्मणती ॥ ८० ॥ तरी क्षमा करोनि कृपेनें पहावें । आह्मां भिक्षुकांचें दैन्य दारिद्र्य हरावें । यापरी विप्रवरीं गहिंवरोनि विनवितां स्वभावें । श्रीसमर्थदेवें आश्वासिलें ॥ ८१ ॥ श्रीसमर्थं कृपापूर्ण अवलोकिलें । द्विजवरां तृप्तीवरी जेवविलें । जातां उर्मुडींतील वाळु पाषाण न्यावें ह्मणितलें । अंग-बळें आपुलाल्या ॥ ८२ ॥ द्विजवरां परमानंद जाला ।

भोजनोत्तरीं द्विजवर्ग उमुर्डींत आला। जो तो धांवें पाषाण उचलावयाला। आपणाला तोलेल ऐसा ॥ ८३ ॥ विप्रीं उमुर्डी पाषाण घेतले। निजसदनासी ठाकोनि आले। गृहीं प्रवेशतां सुवर्णपाषाण देखिले। दारिद्र्य गेलें जन्मांतरींचें ॥ ८४ ॥ ऐसी श्रीसमर्थ माय कृपाळु। दीन अनाथांची स्नेहाळु। कठिण विषम काळीं प्रणितपाळु। भाविकां सर्वकाळीं रक्षीतसे ॥८५॥ आइका श्रीसमर्थदेवें कवतुक केलें। शिष्यवर्गअंतःकरण शोधिलें। आपणा बेंड जालें जाणविलें। लटिकी दाविली व्यथा अनिवार ॥ ८६ ॥ स्वामी ह्मणती बेंड चोखितां वदनीं। आमुची व्यथा दुरावेल तत्क्षणीं। चोखी त्यासी पीडील अंगीं येउनी। व्यथा दारुण तो भोगी ॥ ८७ ॥ वरी वरी यासी धीर न धरवे। कल्याणें चोखिलें जिवें भावें। चोखितां आंब्रफळ आढळलें स्वभावें। कल्याणदेवें सकळां दाविलें ॥ ८८ ॥ तों शिष्यवर्ग ओशाळला। श्रीकल्याणदेव परिक्षेंत उतरला। श्रीसमर्थें कल्याणा धन्यवाद दिधला। नेम नेमिली श्रीरामदासदीक्षा ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥

भव्य रूप अति सुंदर दीक्षा। रामनामस्मरणें करि भिक्षा।
वृत्ति होइल उदासिन जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ १ ॥
नाठवे धन सुता सुत जाया। मृगजळापरि मानित काया।
परवधू जननीसम जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ २ ॥
करि कथा परि न वांछित कांहीं। चित्तवृत्ति अवघी हरिपायीं।
कल्पना समुळ तोडिल जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ३ ॥
शुद्धभक्ति हरिची करि पूजा। विश्व पाहि आपणासम वोजा।
शांति पूर्ण बरवी धरि जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ४ ॥
नित्यनेम बरवा जगिं ज्याचा। निशिदिनीं हरिचिये भजनाचा।
गुरुपदीं अति सादर जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ५ ॥
सर्व लोक भजनाप्रति लावी। लालची धन कदापि नसावी।
बोलण्यासम घडे कृति जेव्हां। रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ६ ॥

विमलज्ञान वदे जगिं स्पष्ट । ब्रह्म निर्गुण कळे जगिं स्पष्ट ।
सर्व मार्मिक असें कळे जेव्हां । रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ७ ॥
बोलणें प्रचितिचें जगिं मान्ये । निवडुं जो सकळांप्रति जाणे ।
वांच्छिती जन सज्जन जेव्हां । रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ८ ॥
निश्चयें करि रामउपासना । रामनामिं रघूत्तमपूजना ।
तृप्त होति याचक जेव्हां । रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ ९ ॥
यत्न साधुनि करी पुढें पाठ । अर्थ जाणुनि वदे जगिं स्पष्ट ।
मागिली उजळणी करि जेव्हां । रामदास ह्मणणें मग तेव्हां ॥ १० ॥

श्रीसमर्थ ह्मणती रे ज्यासी रामदास होणें । तिहीं सर्वकाळीं जीवीं धरावींत हीं वचनें । येणेंकरितां रामदास्यपदवी अंगीं बाणे । नातरी दंभीं वरपडा होणें महंती व्यर्थ ॥ ९० ॥ आइका भागानगरीचे महाभागवत । श्रीकेशवस्वामी परम विख्यात । श्रीसमर्थकीर्ती नित्य श्रवण करीत । उत्कंठा बहुत श्रीसमर्थभेटी ॥ ९१ ॥ तिहीं श्रीसमर्थां पत्रार्थ लिहिलें । तें निजशिष्याहातीं पाठविलें । अल्प शिधा सामुग्री पदरीं बांधिली । चालतां पुरली चांफळावरी ॥ ९२ ॥ श्रीकेशवशिष्य चांफळीं आले । येवोनि स्वामीचरणीं लोटांगण घातिलें । श्रीकेशवस्वामीपत्रार्थ पुढें ठेविलें । श्रीसमर्थें वंदिलें श्रीकेशवपत्र ॥

श्रीकेशवस्वामीपत्रः—

" ॐ नमोजी सच्चिदानंदा । पदत्रय स्वरूपसिद्धा ।
बीज बीजारविंदा । स्वयें अमोदा परिमळेसीं ॥ १ ॥
त्या स्वानंदामृताची चाखवटी । तूंचि तुझिया पोटीं ।
निरसोनियां अंध्रभेटी । स्वानंददृष्टीं अवलोकणें ॥ २ ॥
श्रीरामदासपद सखया । स्वानंदपाना गुरुवर्या ।
केशवविज्ञप्ती व्हावया । हेचि कारण असे पां ॥ ३ ॥

अभंगः—

निजानंदडोहीं । बुडों गेलों पाहीं ॥ १ ॥
तनुत्याग होतां त्याची । मग सांगूं भेटी कैंची ॥ २ ॥
देहबुद्धि वाटुनी प्यालों । जीतचि ब्रह्म तें जालों ॥ ३ ॥
केशव ह्मणे डोळां । तें पाहेन वेळोंवेळां ॥ ४ ॥

टीकाः— देवें श्रीकेशवपत्र सन्मानिलें। श्रीकेशवशिष्यआ-दरातिथ्य केलें। श्रीकेशवपदपदार्थ पूर्ण मनन केलें। पत्रार्थ वंदिलें अत्यंत प्रीतीं ॥ ९४ ॥ श्रीकेशवशिष्य बहुकाळ राह-विला। आज्ञा पुसतां सन्मानें गौरविला। संगें एक श्लोक लेहोन दिधला। श्रीकेशवाला द्यावा ह्मणती ॥ ९५ ॥

श्रीसमर्थश्लोकः—

पदातीत वाक्यार्थ शोधीं समाधी। क्षमातीत जो निर्विकल्पावबोधी।
तया ऊगमीं जन्म नाहीं जिवासी। मिळे संगमीं दास त्या केशवासीं॥१

टीकाः— श्रीसमर्थें श्लोक चरण लिहिले। लेहोन श्रीकेशव-शिष्या हातीं दिधले। देवें स्नेहभरें त्यासी पुसिलें। जे वाट-खर्ची दिधलें काय केशवीं ॥ ९६ ॥ एक दिनमान पुरें साहित्य केशवीं दिल्हें। त्यावरीच येथवरी मार्गक्रमण घडलें। श्रीसमर्थें शेर एक तंदूल गांठीं दिधले। ते पुरोनि उरले भागानगरावरी ॥ ९७ ॥ शुद्धभजनीं सामर्थ्य सारिखें। येर दांभिक विषमत्व देखे। त्यांसी दोषदृष्टीच खिळिली अत्यंतिक। श्रीसंतकौतुक संतां कळे ॥ ९८ ॥ पूर्णब्रह्म जिहीं आकळिलें। तयांचे भेदाभेद मावळले। वोखटें सर्व कांहीं निवळलें। सस्वरूपीं ठेले निश्च-ळत्वें ॥ ९९ ॥ आइका देवें उद्धवा पाचारिलें। त्यासी कीर्तन करण्या आज्ञापिलें। स्वयें सभे येउनी स्वामी बैसले। श्रवणीं बैसले संत साधू ॥ १०० ॥ उद्धवें कीर्तन आदरिलें। श्रीरघुनाथगुणानुवाद परोपरी वर्णिले। प्रेमळ भक्त भावीक डोलूं लागले। प्रेम उचंबळे श्रीसमर्थां ॥ १ ॥ परम प्रीतीं श्री-रघुनाथ आळविला। उद्धवकीर्तनीं अत्यंत रंग भरला। तेणें प्रेमें श्रीहनुमंत धृपद धरूं आला। भक्तिभावाला भुलोनि ॥ २ ॥ उद्धवें कीर्तनरंगणीं नर्तन केलें। फेरी घेतां झग्यासी सिंदूर झोंबलें। कीर्तनोत्तर श्रीसमर्थां साष्टांगें अभिवंदिलें। सिं-दूर देखिला श्रीसमर्थस्वामींनीं ॥ ३ ॥ कवणाही नेणवे सिं-

दूरमात । श्रीसमर्थं जाणविला धृपद धरितां श्रीहनुमंत । प्रेम-पडिभरें उद्धवासी आलिंगीत । आज्ञापिती कीर्तनमर्यादा ॥ ४ ॥ श्रीसमर्थ ह्मणती उद्धवासी । यापुढें बैसोनि करावें कीर्तनासी । ऐसें न करितां श्रीहनुमंता श्रम पावविसी । तुझिया कीर्तनासी श्रीहनुमंत येतील ॥ ५ ॥ बाप श्रीउद्धवकीर्तन-महिमान । जेथ प्रत्यक्ष धृपद धरिती श्रीहनुमान । बाप श्रीसमर्थकृपा फळली परिपूर्ण । दशसहस्र कुळउद्धरण श्रीउद्धवें केलें ॥ ६ ॥ श्रीसमर्थस्वामी नित्यांकित । श्रीउद्धवस्वामी परम सामर्थ्यवंत । महंतपदवी अंगीं वागवीत । पुण्य अद्भुत जन्मांतरींचें ॥ ७ ॥ श्रीसमर्थ प्रभू हृदयस्थ जाणती । कर्तुमकर्तुसामर्थ्य अंगीं वागविती । विश्वजनासी हे तंव प्रत्यक्ष प्रचिती । श्रीसमर्थ जगतीं सर्वसाक्षी ॥ ८ ॥ वीरवैष्णवपंथीं । कोणी एक सिद्धपुरुष गाजती । श्रीसमर्थकीर्ति वारंवार श्रवण करिती । वृथा मानिती जनवार्ता ॥ ९ ॥ ऐसिया विचारें बहुकाळ लोटला । मग निज शिष्य प्रचितीसी पाठविला । शिष्य मार्ग क्रमितां चमत्कार घडला । पानगा भक्षिला श्वानमुखींचा तेणें ॥ १० वीरवैष्णवसोवळें । सोवळियामाजीं होती वोवळें । त्यांसी सुचिस्मंत ब्राह्मणही न चले । सोवळें सोवळें करितां भ्रमताती ॥ ११ ॥ नसतीं कर्मं करिती अविचार । सोवळें मिरविती वरवर । त्यांसीं निश्चयें अंतरला श्रीरघुवीर । दंभभक्तीवर भगवंत कल्पांतीं न भेटे ॥ १२ ॥ वैष्णवशिष्यें वाळुवंटीं स्नान केलें । आहारार्थ दोन पानगे पाडिले । जळ आणों जातां एक श्वानें नेलें । तें कष्टें सोडविलें वैष्णवशिष्यानें ॥ १३ ॥ क्षुधा लागली दारुण । पानगे पाडिले तेहीं दोन । कोणी पाहती कां पाहिलें चहुंकडून । न देखती ह्मणोन पानगा सोडविला ॥ १४ ॥ तृप्ती भोजन केलें । उपरी सज्जनगिरीसी आले । श्रीसमर्थें त्यासी सन्मानें राहविलें । आग्रह केलें भो-

जनीं ॥ १५ ॥ वैष्णवसोवळें विशेष देखिलें । देवें कल्याणाकरवीं साहित्य देवाविलें । पंगतीं बैसतां श्रीसमर्थ बोलिले । आजि घृत भलें आह्मीं वाढूं ॥ १६ ॥ श्रीसमर्थ सकळां घृत वाढिती । भक्तगण जेवणार कौतुक पाहती । श्रीसमर्थ नेणपणें वैष्णवपात्रीं घृत वोगरिती । तेणें क्षोभला चित्तीं वैष्णव भारी ॥ १७ ॥ ह्मणे आमुचें पात्र जी विटंबिलें । हें वृथा स्वामींनीं घृत वोगरिलें । आतां क्षणीं मज उपोषण पडलें । आह्मां न चले आणिकां हातींचें ॥ १८ ॥ वैष्णवशिष्य विकल्प वचनीं वदतां । देवें देहे धरणीं सांडिला न सांवरितां । अति आक्रोशें आक्रंदितां । सांवरितां न सांवरती ॥ १९ ॥ श्रीसमर्थदेवा व्यथा जाली । भक्तमंडळी अत्यंत हळहळली । कल्याणदेवें व्यथा पुसिली । देवें सांगीतली मम हीन काया ॥१२०॥ श्रीसमर्थ ह्मणती धिग् धिग् हें शरीर । व्यर्थचि तगलें रे भूमिभार । याहूनि भलें वाळुवंटींचें श्वान साजिरें । पवित्र भाकर श्वानमुखींची ॥ २१ ॥ श्रीसमर्थप्रभूचें उपरोधिक वचन । निघतां वैष्णवशिष्य जाला लज्यायमान । श्रीसमर्थचरणीं घाली लोटांगण । स्वामी पूर्ण सर्वसाक्षी ह्मणे ॥ २२ ॥ देवा जाली ते व्यथा मजचि जाणवली । देवें पाहिजे मज रंका क्षमा केली । धिक्कार आमुचीं दांभिक सोवळीं । मजचि फळलीं अभाविकत्वें ॥ २३ ॥ तुह्मी श्रीसमर्थ गोसावी । माझी श्वानविटंबना सहावी । अपराधपरनाळिका हृदईं साठवावी । लज्जा रक्षावी बहु काय बोलूं ॥ २४ ॥ तंव भाविकें विस्मयें देखती । ह्मणती हे कोण गूढ चमत्कृती । श्रीसमर्थ त्यांसी क्षणीं वारिती । वोळखीप्रती न पुसावें ॥ २५ ॥ भाविकआग्रहो विशेष देखिला । वीरवैष्णवें साद्यंत वृत्तांत निवेदिला । साष्टांगें श्रीसमर्थचरणीं लागला । पंगती बैसला श्रीसमर्थमेळीं ॥ २६ ॥ श्रीसमर्थ हृदयस्थ जाणती । वीरवैष्णवशिष्य पावला प्रचिती । दूरवर गेली श्रीस-

मर्थकीर्ती । शिवछत्रपती श्रीसमर्थ पूजी ॥ २७ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ १२८ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत भीमुविरचितायाम् । नानालीलाचरित्रकथनन्नाम पंचदश प्रसंग निरूपणन्नाम सम्पूर्णमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थ रामदासार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १६ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



म हाराज श्रीरामदास नमो । येणें भजनेसीं सर्वकाळ रमो । हाचि एक परम पुरुषार्थ गमो । परम धर्मोपदेशिता ॥ १ ॥ जय जयाजी श्रीरामदास । सर्वभावेंसीं तूंचि परेश । तुझेनि भजनें चुकती सायास । विधीविधानास मी नेणें ॥ २ ॥ श्रीरामदासनाम परम जप । श्रीरामदासनाम परम तप । श्रीरामदासीं कीजे अत्यंत साक्षेप । वैकुंठ आपेंआप वोळंगिजे ॥ ३ ॥ श्रीरामदासनाम परम धर्म । श्रीरामदासनाम निजविश्रामधाम । श्रीरामदासनामीं पद पाविजे उत्तम । कैवल्यधाम श्रीरामदास ॥ ४ ॥ श्रीरामदासाविण योग । योग नव्हे तोचि भवरोग । संसारभुरळीं भरले भणंग । श्रीरामदास निर्व्यंग विसरले ॥ ५ ॥ मरणभय लागलें शरीरा । जाणोनि नेणती ह्या विचारा । मरतां देखोनि शोक करिती पुरा । परी हितनिर्धारा नेणती ॥ ६ ॥

जन संसारीं बुडाले । मायामोहें वाहात गेले । श्रीरामदासभजन विसरले । दुःख पावले मूर्खत्वें ॥ ७ ॥ सांडूनि संसारिकांचा संग । सर्वकाळ स्मरिजे श्रीसमर्थ श्रीरंग । येणें सकळ अर्थ पुरती सांगोपांग । भवभंगनिर्मूळत्वें ॥ ८ ॥ ऐसा श्रीरामदासपदीं निर्धार । धरितां संकटीं सत्वर । निजदासाचा घेतसे कैवार । निरंतर पाठीं उभा ॥ ९ ॥ त्या श्रीरामदासचरणीं । म्यां वारंवार घेतली लोळणी । सर्वपरी माझी वाइट करणी । क्षमा करूनी सांभाळिलें ॥ १० ॥ आइका श्रोते हो सादर । श्रीसेतुबंधीं चालिले श्रीसमर्थ दातार । सवें घेतला शिष्यपरिवार । श्रीरामनामगजर गर्जविती ॥ ११ ॥ ठाईं ठाईं कथा निरूपण । ठाईं ठाईं श्रीरामनामघोषगर्जन । श्रीसमर्थप्रभूचें लीलावर्तन । जडमूढउद्धरण ठाईं ठाईं ॥ १२ ॥ मार्ग क्रमीन चालिले । सुस्थळ देखोनि राहिले । रात्रौ कीर्तन आदरिलें । श्रोते मिळाले अपरिमित ॥ १३ ॥ तये नगरीं एक श्रीमान । द्रव्यलोभी अत्यंत कृपण । कहीं नेणें कथाकीर्तन । स्त्रीपुत्रांत रत सदां ॥ १४ ॥ माता पिता बंधू पुत्र । सर्वभावेसीं आवडे कलत्र । संसारधर्मीं अत्यंत प्रीत । परमार्थमात तो नेणें ॥ १५ ॥ तेचि नगरीं श्रीसमर्थ आले । श्रीसमर्थकीर्तनबहु गाजलें । धनलोभ्या इष्टमित्रजनीं आग्रह केले । कीर्तनीं आणिलें श्रीसमर्थजीच्या ॥ १६ ॥ कीर्तनीं श्रीसमर्थ अभंग बोलिले । येणें श्रोतयां वैराग्य भरलें । धनलोभ्या नत्रचे मानलें । संशय भरले विशेषेंपरीं ॥ १७ ॥ श्रीसमर्थप्रभूचें निरूपण । जे दारा पुत्र आणि धन । अंतकाळीं कोणी कामा न येती जाण । एकाकी मरोन जाणें वडे ॥ १८ ॥ अंतकाळीं यमजाचणीं । आप्तवर्ग न धांवती सोडवणी । यालागीं श्रीरघुनाथभजनीं । अनुदिनीं रमावें ॥ १९ ॥ कोण कोणाची माता । कोण कोणाचा पिता । कोण कोणाची स्त्री चुलता । यमपंथें

जातां सर्व सांडिती ॥ २० ॥ ऐसियां निर्धारीं निरूपण चाले। कीर्तनोत्तर जन मार्गस्थ जाले । धनलोभिया तें नवचे मानलें । श्रीसमर्थांसी पुसिलें साक्षेपें ॥ २१ ॥ धनलोभी ह्मणे श्रीसमर्थ-प्रभूसी । तुमची कीर्तनमर्यादा कैसी । हा हो जी अप्रमाण वच-नासी । हरिकथेसीं आणिता ॥ २२ ॥ मज आहेत आप्तगण । जे मज आवडते जीवाहून । त्यांसीं मजसीं सहाय्यता परिपूर्ण । उणेंपण पडोंचि न देती ॥ २३ ॥ ऐसे एकागळे सहाय्यकारी । असतां यमधर्माची कोण थोरी । नाथिलेंचि तुह्मीं भरविलें धांकेभरीं । मज निर्धारीं अप्रमाण जालें ॥ २४ ॥ देवें स्मित-हास्य केलें । एकांत गूज निरूपिलें । मृतसोंग क्षणमात्र आण-विलें । तत्काळ अनुभव पाहूं ॥ २५ ॥ धनलोभ्या श्रीसमर्थ-वचन मानलें । गृहीं जातां मृतवेष धरिलें । भार्येनें रुदन आरं-भिलें । आप्त धांवले दुःखातिवेगीं ॥ २६ ॥ मोठा हाहाःकार जाला । आप्तवर्गीं आकांत मांडिला । मायबापीं उरफोड घे-तला । बंधू बंधू मांडिला उभड भारी ॥ २७ ॥ अकस्मात मृत्यु आला । ह्मणती गोसावियानें चेटुक केला । एकाकीं मूठमार पडला । यावेगळा प्रकार न ह्मणती ॥ २८ ॥ ग्रामस्थीं पंचाईत केली । श्रीसमर्थांवरी आळ आणिली। अपरात्रीं मंडळी आली । श्रीसमर्था अळुमाळीं उठविलें ॥ २९ ॥ ह्मणती सावकारा एकांत केला।सावकारदेहीं उपद्रव घडला । निःशंकबोल तुह्मा-वरी आला । ह्मणीं घराला क्षणएक चलावें ॥ ३० ॥ श्रीसमर्थ सशिष्य निघाले । सावकारगृह ठाकोनि आले। आप्तवर्गीं अ-पशब्द आरंभिले । उठवा ह्मणितलें मृतशरीरा ॥ ३१ ॥ श्रीस-मर्थ ह्मणती स्थिर व्हावें । सांगतों उपचारा करावें । येथ ए-कासी लागे मरावें । येणें उठावें निश्चयत्वें ॥ ३२ ॥ ऐसिया वचनीं जन चमत्कारले । परस्परीं विचारीं पडिले । कवणाहि न वचे धारिष्ट उदेलें । आपआपुले जीव प्रिय ॥ ३३ ॥ माय

आक्रंदत होती भारी । देवें आज्ञापिलें तिसी निर्धारीं । ह्मणती निज पुत्रा उठवणें असेल जरी । निज देह सत्वरीं अर्पावा ॥३४॥ माय वदे पुत्र एक निवर्तला । तरी तिघे आहेत मला । मरत्यामागें मरणाला । लौकिकाला कोण मरती ॥ ३५ ॥ तैसेंचि पितयासी पुसिलें । तेणें निज स्त्रिये ऐसेंचि अव्हेरिलें । बंधुवर्गीं हि अवमानिलें । मृत्यावेगळें कोण आहे ह्मणती ॥३६॥ धनलोभियाची भार्या बोलाविली । श्रीसमर्थें तीर्थप्राशनीं आज्ञापिली । तिनेंहि विरुद्ध वृत्ति स्वीकारिली । ह्मणे तान्हुलीं लेंकुरें कोण संरक्षील ॥ ३७ ॥ पतिदेह जरी उठिला । तरी लेंकुरां कोण उपेगा आला । देहप्रारब्धीं देहपात घडला । ईश्वरीक्षोभाला कोण वारी ॥ ३८ ॥ ऐसें एकेकेपरीं । निज प्राण वांचविती परोपरी । श्रीसमर्थ ह्मणती आह्मीच मरतों निर्धारीं । प्रेत सत्वरी उठवावया ॥ ३९ ॥ ऐसिया वचनीं श्रीसमर्थ बोलतां । धनलोभ्या वैराग्य भरलें चित्तां । लागवेगीं उठोनि लोटांगण घालितां । माता पिता तटस्थ देखती ॥ ४० ॥ सकळांसी नवल जालें । ह्मणती प्रेत कैसें उठलें । आप्तवर्ग लज्जित जाले । आह्मीं अव्हेरिला ह्मणती देह याचा ॥ ४१ ॥ धनलोभी ह्मणे श्रीरामदासां । जी देवा आतां मज तुमचाचि भरंवसा । पुरे पुरे स्त्रीपुत्रआशा । आप्त सर्वथा कामा न येती ॥ ४२ ॥ आप्तइष्टादिकीं मजकारणें । अंतकाळीं केलीं कठिण अंतःकरणें । यांसी मी ह्मणीं आप्तवर्ग न ह्मणे । श्रीरामदास साजणे मज आतां ॥ ४३ ॥ स्त्री अत्यंत जिवलग । तीहि राहिली अलग । वरी वरी हावभाव दाविते चांग । अंतरंग कामीं लोभली ॥४४॥ माय बाप बंधू माईक भाव । आजि हा पूर्णत्वें बिंबला भाव । स्वामी एक स्वयमेव । विश्रांती ठाव दिसतसे ॥ ४५ ॥ वारंवार घाली लोटांगण । वारंवार करी नामस्मरण । स्वामींनीं दिधलें दृढालिंगन । क्षेम परिपूर्ण दिधलें ॥ ४६ ॥ सकळीं श्रीसमर्थ-

प्रभूसी स्तविलें । अनुग्रह प्रसाद मागितले । त्यांसीं देवें कृपापूर्ण अवलोकिलें । जन लाविले भजनमार्गीं ॥ ४७ ॥ धनलोभी उद्धरिला । श्रीसमर्थ चालिले सेतुबंधाला । आणीक आइकावें चमत्काराला । श्रीसमर्थलीला सुखदाई ॥ ४८ ॥ श्रीसमर्थप्रभू मार्गीं चालतां । भगवच्चर्चा सुखवार्ता । श्रीरामनाम गातां नाचतां । विकल्प व्यथा उडोनि पळे ॥४९॥ श्रीसमर्थप्रभूच्या संगतीं । महान् महान् सिद्ध असती । श्रीरामनामीं टाहो फोडिती । धन्य ह्मणविती श्रीसमर्थसत्संग ॥ ५० ॥ असंख्य संतमंडळी मीनली । श्रीसमर्थसंगतीं मार्गीं चालिली । सुस्थळ देखोनि विश्रांतीं राहिली । अंबराई गर्जविली श्रीरामनामीं ॥ ५१ ॥ वैष्णवमेळीं जयकार थैकार । गिरा गर्जे गर्जती श्रीरघुवीर । श्रीरामनामीं कोंदलें अंबर । सामर्थ्य अपार श्रीरामदासीं ॥ ५२ ॥ श्रीसमर्थांसी उच्चासनीं बैसविती । प्रेमपडिभरें श्रीरघुनाथगुण वर्णिती । अमरां सुरवरां वांकुल्या दाविती । धन्य जगतीं श्रीरामदास ह्मणती ॥ ५३ ॥ उंच उंच पताका रोंविल्या । गरुडटके ध्वजा फडकाविल्या । माळामुद्रांकित संतमंडळ्या । देती आरोळ्या श्रीरामनामीं ॥ ५४ ॥ श्रीसमर्थप्रभूच्या परिवारीं । एक अत्यंत नेमिष्ठ शिष्य निर्धारीं । तेणें नित्य करावी मधुकरी । नित्य निरंतरी नियम ऐसा ॥ ५५ ॥ तेणें निज नियमावरी । नगरीं फिरविली मधुकरी । गृह पाहोनि वदला श्लोक वैखरी । अति साजिरी श्रीसमर्थवचन ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥

समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ।
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥

अचुक भविष्य जाणणें । अचुकाचि मरण सांगणें । नगरीं गाजलें प्रसिद्धपणें । श्रीसमर्थसेवकानें तें घर घेतलें

॥ ५७ ॥ श्रीसमर्थसेवकमुखींचा श्लोक । भविष्यवादी विचारी निष्टंक । भविष्यीं शिष्यमरण देखिलें अचुक । एकचि रात्र अटक उरली ॥५८॥ ह्मणीं भविष्यवादी सरसावला। श्रीसमर्थशिष्य न्याहाळिला । अति दर्पें शब्दप्रयोग केला । असत्य वचनाला कां जल्पसी ह्मणे ॥ ५९ ॥ कोण समर्थ तुझा श्रीगुरू । कोण मरणभय निवारील निर्धारू । उदईक तुज मरण सत्वरु । श्लोकाक्षर वृथा जल्पसी ॥ ६० ॥ मरणा एक रात्री मात्र उरली । जा सुखें जपे रामनामावळी । नको भुलों श्लोकाक्षरमेळीं । तुज अळुमाळीं मरण उदईक ॥ ६१ ॥ श्रीसमर्थशिष्य चमत्कारला । धांवत सोंई श्रीचरणीं लागला । जाला वृत्तांत श्रीचरणीं निवेदिला । मरणभयाला कोण वारी ॥६२॥ श्रीसमर्थें चित्तीं जाणिलें । भविष्यवादियाचें निरीक्षण केलें । निजासनीं निजशिष्यासी बैसविलें । भीतीसी वारिलें निजसामर्थ्यें ॥ ६३ ॥ श्रीसमर्थ ह्मणती भिवों नको । श्रीरामनाम सांडूं नको । बैसलें आसन चळों नको । लोभ धरूं नको अन्य कांहीं ॥ ६४ ॥ शिष्य होता मनीं भ्याला । तेणें श्रीरामनामघोष आरंभिला । संत साधू देखती चमत्काराला । श्रीसमर्थ समाधीला बैसले ॥ ६५ ॥ अष्ट प्रहर लोटले । शिष्यवरें श्रीरामनाम गर्जविलें । पुनरपी शिष्यासी आज्ञापिलें । भिक्षे पाठविलें तेचि गृहीं ॥६६॥ श्रीसमर्थें तोचि श्लोक बोलविला । शिष्य भविष्यवाद्यागृहीं पाठविला । भविष्यवादी थकित जाला । प्रश्न केला मधुकऱ्यासी ॥ ६७ ॥ ह्मणे बापा तुज श्रीगुरु कोण । तो मज दाखवी जाण । धन्य धन्य तयाचें महिमान । निजशिष्यसंरक्षण जेणें केलें ॥ ६८ ॥ तुज निश्चयें मरण आलें । तया मरणासी हि मरण जेणें आणिलें । निजवचनीं सामर्थ्य सिद्ध केलें । संरक्षिलें निज सेवका ॥ ६९ ॥ भविष्यवादी त्वरें आला । येवोनि श्रीसमर्थचरणीं लागला । श्रीस-

मर्थस्तुतिस्तव आरंभिला। चित्तीं लाजला निज पुरुषार्थें ॥७० ॥ श्रीसमर्थ ह्मणती भविष्यवादिया। पुण्य वृथा वेंचिलें भविष्य सांगावया। पुढें यमयातना भोगावया । निश्चयें चुकवावया कोण तुह्मा ॥ ७१ ॥ जनीं भविष्य सांगणें। येणें अत्यंत दोष सम्पादणें। अंतीं यमयातना भोगणें। संकटीं पचणें दीर्घकाळ ॥ ७२ ॥ गांठीं पुण्य तोंवरी । सत्ता चालेल बरी। पुण्यांश सरतां सत्वरी। देह पतनावरी येईल ॥ ७३ ॥ ऐसें श्रीसमर्थवचन । भविष्यवादी श्रवण करी चमत्कारोन। ह्मणीं निरहंकार वृत्ति होवोन। श्रीसमर्थां शरण साष्टांगें आला ॥७४॥ वारंवार स्तुतिस्तव करी। वारंवार साष्टांगें नमस्कारी। श्रीसमर्थ वोळले शुद्धभावावरी। श्रीरामनामावरी उद्धरिला ॥७५॥ श्रीसमर्थमहिमान गाजलें । निजशिष्या मरणीं वांचविलें । प्रत्यक्ष कळिकाळा परतविलें। सकळां मानले श्रीसमर्थस्वामी ॥ ७६ ॥ नागरीक जनलोक धांवले। श्रीसमर्थचरणीं लागले । श्रीसमर्थगुणकीर्तनीं रंगले। उपासक जाले श्रीरघुनाथभक्ती ॥ ७७ ॥ भक्तमंडळी विस्तारली । श्रीसमर्थसंगतीं मार्गीं चालिली। श्रीरामनामीं वाट क्रमिली। ठाकोनि आले तंजावरा ॥७८॥ तंजावरनगरीचा नृपवर । शिवराजबंधू व्यंकोजी थोर। आस लागली श्रीसमर्थीं फार। श्रद्धा अपार श्रीसमर्थचरणीं ॥ ७९ ॥ श्रीसमर्थप्रभूचें आगमन । तंजावरस्थां आनंद पूर्ण। सान थोर आले धांवोन । लोटांगणें घालिती ॥८०॥ भूप चरणीं चालिला। सर्वे आश्रित परिवार शोभला। श्रीसमर्थचरणीं साष्टांगें लागला। श्रीसमर्थें आलिंगिला कृपाकटाक्षें ॥८१॥ सकळीं श्रीरामनाम गाजविलें। दिंड्यापताकादि उभविलें । टाळ मृदंग झणत्कारले। तंजावर गजबजिलें श्रीरामनामीं ॥८२॥ नगर श्रृंगारिलें वाडेंकोडें। मार्गीं घातिले कुंकुमसडे। ठाईं ठाईं झडती चौघडे। मंगळ गाढें तंजावरीं गाजलें॥८३॥ दिंड्या पताकांचे भार। वैष्णव श्रीरामनामीं घेती हैकार थैकार। जय जय

गर्जती श्रीरघुवीर । श्रीसमर्थ दातार तंजावरीं ॥ ८४ ॥ श्रीर-घुनाथनामावरी । भक्त आलापिती वैखरी । श्रीरामनामगिरा गजरीं । तंजावरीं श्रीसमर्थ आले ॥८५॥ राव सामोरा आला । श्रीचरणीं लोटांगणीं गेला । सुखासनीं श्रीसमर्थस्वामी बैसविला । नृपभवनीं आणिला मंगळ गजरीं ॥ ८६ ॥ श्रीसमर्थमहा-पूजन जालें । राणियांनीं श्रीसमर्थचरण वंदिले । नृपमातेनें श्रीसमर्थां साष्टांग नमन केलें । श्रीसमर्थ पूजिले शुद्धभावें ॥ ८७ ॥ रायें श्रीसमर्थस्तुतिस्तवन केलें । उपरी श्रीसमर्थअनु-ग्रह घेतिलें । राजमाता राणीवसा अनुग्रह प्रसाद पावले । उ-पासक जाले श्रीसमर्थसंप्रदाई ॥ ८८ ॥ तंजावरस्थीं श्रीचरण वंदिले । अनुग्रह प्रसाद पावले । सर्वकाळ श्रीरामनामीं रंगले । आनंदीं आनंदलें तंजावर ॥ ८९ ॥ नित्य कथा कीर्तन । आ-वडीं नगरजन करिती श्रवण । धन्य धन्य राजा व्यंकोजी जाण । जेणें श्रीचरण जोडिले ॥ ९० ॥ एक मासवरी । राह-विली श्रीसमर्थस्वारी । नित्य हरिकीर्तन रामनामगजरीं । निज नगरी गर्जविली ॥ ९१ ॥ पाथरवट मूर्तिकार । श्रीसमर्थभेटी आला सत्वर । ह्मणे स्वामी करूं जाणतों मूर्ति सुंदर । परी नेत्रीं अरुवार नाडिलें ॥ ९२ ॥ श्रीसमर्थ कृपावचन बोलिले । आह्मीं तुज दृष्टीतें जरी दिधलें । तरी घडावे श्रीराम चांगले । अत्यंत सोज्वल ध्यान कोदंडधारी ॥ ९३ ॥ क्षणीं देवें चमत्कार केला । पाथरवटनेत्रीं तुलसीमाळास्पर्श मात्र केला । तों तत्काळ दिव्य दृष्टीतें पावला । नेत्र तेजाळ झळकती ॥ ९४ ॥ सकळीं चमत्कार देखिला । पाथरवट श्रीसमर्थचरणीं लोटांगणीं आला । राव व्यंकोजी थकित जाला । श्रीसमर्थगुण-लीला अतर्क्य ह्मणे ॥ ९५ ॥ श्रीसमर्थनामघोष गाजला । तंजावरीं श्रीसमर्थप्रताप प्रगटला । वारंवार वर्णिती श्रीसमर्थ-गुणलीला । सानथोराला श्रीसमर्थभक्ति ॥ ९६ ॥ पाथवरटें

वर मागितले । ह्मणे देवें पाहिजे उपकार केले । आज्ञाप्रमाण
कार्य सम्पादीन चांगलें । परी नेत्र पूर्ववत् व्हावे जी ॥ ९७ ॥
श्रीसमर्थमूर्ति चित्तीं वसो । समूळ अज्ञानतिमिर नासो ।
जनीं पूर्ववत अंधवृत्ति बैसों । दृष्टि न वसो पापवासनीं ॥९८॥
परद्रव्य परनारी । डोळे देखती सरोभरीं । याहूनि राहों अं-
धत्वें निर्धारीं । हृदयांतरीं श्रीचरण वसो ॥ ९९ ॥ ऐसें पाथ-
रवटें विनविलें । श्रीसमर्थें भक्तहृदय जाणिलें । ह्मणती भलें
मागसी तें दिधलें । अंतरमेळें शुद्ध भक्ति ॥ १०० ॥ पाथरवटें
जयजयकार केला । श्रीसमर्थप्रभू साष्टांगें वंदिला । देवें व्यं-
कोजीचा निरोप मागीतला । राव कष्टला अत्यंत मनीं ॥ १ ॥
राव वदे स्वामीविण । आतां आह्मां न गमे पळ क्षण । कांहीं
चिरकालस्मरण देवोन । स्वामींनीं गमन करावें ॥ २ ॥ व्यं-
कोजीस्नेह देखिला । देवें तंजावरीं मठ संस्थापियला । तोचि
भीमस्वामीप्रति निरविला । आपण श्रीसेतुबंधाला चालिले ॥३॥
श्रीसेतुबंधदर्शन केलें । हिंडत फिरतां कृष्णातिरा आले । शिवछत्र-
पतीनेंश्रीगुरु पूजन केलें । लोटांगण घातिलें श्रीचरणीं ॥ ४ ॥
श्रीसमर्थचरणाचे सेवक । श्रीरंगोबा परम निष्टंक । पर्यटणीं
असतां जाहलें कवतुक । आइका भाविकहो सावधान ॥ ५ ॥
श्रीरंगनाथस्वामींचें कीर्तन । अत्यंत भक्तिरस प्रधान । सान
थोर देहभाव विसरोन । श्रीरघुनन्दन आठविती ॥ ६ ॥ श्री-
रंगनाथभजनीं जन लागले । श्रीरंगनाथपूजासमारंभ चाले ।
एकेकीं भोजनसमारंभ आदरिले । सोहळे केले यथाशक्ति ॥७॥
तंव श्रीरंगनाथकीर्तनश्रवणीं । वृद्ध दरिद्री स्त्री येतसे अनुदिनीं ।
तियेच्या मनीं न्यावे रंगोबा सदनीं । कण्या भोजनीं समर्पू
ह्मणे ॥८॥ गृहीं अठराविस्वे दरिद्रता । आदरें आमंत्रिलें श्रीरंग-
नाथा । केली दो भाकरींची सिद्धता । श्रीरंगनाथा गृहीं आ-
णिलें ॥ ९ ॥ शुद्धभावें वोळंले श्रीरंगनाथ । पात्रीं बैसले हो

भोजनार्थ । ग्रास घेतां आठवले श्रीसमर्थ । खंत बहूत श्रीसमर्थभेटी ॥ ११० ॥ ह्मणती स्वामी श्रीसमर्थगुरु । पंक्ती भोजनीं यावा दातारु । इतुकें ह्मणतांचि जय जय श्रीरघुवीर । हाक सत्वर आइकिली ॥ ११ ॥ वृद्ध स्त्रियेनें दार उघडिलें । तंव जटाजूट स्वामी दृष्टी पडिले । क्षणीं श्रीरंगनाथीं श्रीसमर्थचरण वंदिले । पंक्तीं बैसविलें अत्यंत प्रीतीं ॥ १२ ॥ दोनचि होत्या भाकरी । वृद्ध स्त्रियेनें वोगरिल्या दोन्ही पात्रीं । तंव श्रीसमर्थां आठवले जयराम अंतरीं । तोंचि राम राम द्वारीं हांक फुटली ॥ १३ ॥ वृद्धेनें कवाड उघडिलें । जयरामीं तत्काळ साष्टांगें श्रीसमर्थ वंदिले । त्रिवर्गां दृढालिंगन पडले । वृद्धेसी पाडिलें टकमक ॥ १४ ॥ ते वदे म्यां केल्या दों चि भाकरी । आतां तिसऱ्यासी काय वोगरूं निर्धारीं । श्रीसमर्थ ह्मणती पहा वैलावरी । तंव देखिली भाकरी वृद्धेनें ॥ १५ ॥ श्रीजयरामपात्र वाढिन्नलें । उपरी श्रीसमर्थां श्रीकेशवस्वामी-स्मरण जालें । स्मरतांचि द्वारीं श्रीरघुवीरध्वनी उमटले । आलिंगिलें परस्परीं ॥ १६ ॥ वृद्धेसी परम संकट पडिलें । ह्मणे एकेक संत चमत्कारेंचि प्रगटले । माझिये सदनीं अत्यंत दारिद्र्य भरलें । नवचे पुरविलें अन्न आतां ॥ १७ ॥ श्रीसमर्थ ह्मणती वैलावरी । असेल तरी आणी भाकरी । पहातां आढळली त्याच परी । शेष उरली विशेष एक ॥ १८ ॥ श्रीसमर्थ ह्मणती रे राहिला । आपुला आनंदमूर्ति भला । स्मरण होतांचि द्वारीं घोष दाटला । श्रीरघुनाथनामाला आइकिलें ॥ १९ ॥ श्रीआनंदमूर्ति आले । ते श्रीरघुनाथनाम गर्जिन्नले । ब्रह्मानंदीं बुडोनि गेले । क्षणीं आले वृत्तीवरी ॥ १२० ॥ मोठा चमत्कार जाला । स्मरणसोई मीनले एके स्थळाला । वृद्ध स्त्रियेगृहीं करिती भोजनाला । वृद्ध स्त्रियेला टकमक ॥ २१ ॥ ते ह्मणे म्यां रंगनाथां पाचारिलें । तंव एकेका साधूचें येथ पेव फुटलें ।

कई देखिलें ना ऐकिलें। नवल केलें श्रीरंगनाथें ॥ २२ ॥ श्रीसमर्थ ह्मणती रंगोबासी । तुझिया आमंत्रणींच आलों भोजनासी। वेगळें राखितां नयेचि वृद्धेसी । निजपंगतीसी बैसवीं ॥ २३ ॥ श्रीरंगनाथें वृद्धेसी निजपंगतीं घेतलें । श्रीसमर्थें कृपाकटाक्षें न्याहाळिलें। भोजनसोंई निजसमाधिशेजें बैसविलें। वृद्धेसी उद्धरिलें हेळामात्रें ॥ २४ ॥ वृद्धेसी समाधी लागली। तंव संतसज्जनीं टाळी पिटिली । झणींच पूर्ववृत्तीवरी आणिली। भजनीं लाविली श्रीरामीं ॥ २५ ॥ सकळ संतीं भोजन केलें । वृद्धेसी तत्काळ उद्धरिलें। नेणों कोण पुण्य फळा आलें । श्रीसंत भेटले पुण्यरूप ॥ २६ ॥ नाहीं केलें तपाचरण। नाहीं फिरली तीर्थाटण । अवचटें वंदिले श्रीसंतचरण । जालें उद्धरण अकस्मात ॥ २७ ॥ श्रीसंत-दर्शनें पाप पळे। श्रीसंतदर्शनें भाग्य उजळे। श्रीसंतदर्शनें शुभ शकुन आगळे। कळिकाळ रुळे पायरवीं ॥ २८ ॥ श्रीसंतकृपें भगवंत आकळे। श्रीसंतकृपें अज्ञाननिशी मावळे। श्रीसंतकृपें विश्व वोळे। कीर्ति उजळे दिगंतरीं ॥ २९ ॥ श्रीसंतांचा अगाध महिमा । नाहीं दुसरी द्यावया उपमा । जयांचा सर्वकाळ अंकित परमात्मा। श्रीसंतमहिमा सुरवरां नेणवे ॥ १३० ॥ श्री-समर्थदेवें वृद्ध स्त्री उद्धरिली। सकळ संतमंडळी अदृश्य जाली । श्रीसंतलीला न वचे अनुवादली । गुह्यांतरखोली नेणवे ॥ ३१ ॥ श्रीरामदासानुदास लडिवाळ। बाप श्रीसमर्थकृपा सोज्वळ। श्रद्धाबोल माझे प्रेमळ। श्रीसमर्थ दयाळ अंगिकारी ॥ ३२ ॥ श्रीसमर्थ रामदास तुष्टला । ग्रंथगर्भी सहाय्यभूत जाला। माझा ग्रंथार्थ तेणें पाहिला। श्रीसंतलीला तो वर्णवी ॥ ३३ ॥ श्रीसमर्थरामदासचरणीं। म्यां अनन्य प्रीतीं घेतली लोळणी। सर्वकाळनामस्मरणीं। प्रेमें करुनी गर्जवी तो ॥३४॥ श्रीसमर्थरामदासस्वामी । तयाचा अत्यंत कनिष्ठ किंकर मी ।

श्रीसमर्थचरित्रसंभ्रमीं । नित्यनेमीं आरूढलों ॥ ३५ ॥ श्री-रामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधर-चरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ १३६ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत । भीमुविरचितं नानाचरित्रलीला वर्णनन्नाम षोडश प्रसंग सम्पूर्ण ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थरामदासार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १७ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरु रामदासायनमः ॥



ता धन्य श्रीगुरु । तेणें पावलों अभय वरु । आतां कवणा पदर पसरूं । उदरंभरु काबाडियां ॥ १ ॥ दिसें तें तें नासे । सत्य साच श्रीगुरुस्वरूप वि-लसे । शुद्धसंकल्पावबोधित्वें ठसे । अज्ञानतिमिर नासे श्रीगुरुचिंतनें ॥ २ ॥ दीपपतंगसोई । जीव भुलले प्रपंचप्रवाहीं । निजमरणाचा आठव नाहीं । अधर्मप्रवाहीं वहात गेले ॥ ३ ॥ अहं ब्रह्मास्मि आठव विसरले । अना आनीच भ्रमले । भ्रमबुद्धीं बरळों लागले । खाती झोले चौ-ऱ्याशीचे ॥ ४ ॥ अहंकाराचा मोठा वारा । उभविला संसार-पसारा । भ्रमें नाचवी सैरावैरा । विवेकविचारा रिगमु नाहीं ॥ ५ ॥ माया कवटाळीण आली । देहासगट गिळों लागली । शुद्धसात्विक बुद्धि पळविली । पापकळी नांदणूक ॥ ६ ॥ आप-पर नेणणें । मी माझें ऐसें चि वोसणणें । अहंपणें ब्रह्मांड ठेंग-

णें । तुच्छपणें पुढिलांसि देखे ॥७॥ स्वार्थीकबुद्धि बळावली । न्यायनीति सर्वस्वें त्यागिली । आपस्वार्थें हानी जाली । नागवण ठाकली परलोकपंथें ॥८॥ हितवचन नाइके । पापभीतीं न वचके । हरिभक्तीं मन न टिके । रंजवी लाडकें स्त्रीपुत्रादिक ॥ ९ ॥ संसारवार्ता विशेष आवडे । आणि परमार्थी निद्रा पवाडे । ते नर पडती कळिकाळदाढे । नरदेहीं चोखडें हित नेणती ॥ १० ॥ परम दुर्लभ नरदेहसंधी । जाणोनि प्रवर्तती विषयांमधीं । महाभय कळिकाळ आधीव्याधी । भवचक्रव्याधी अनिवार ॥ ११ ॥ प्रापंचिक उदंड ज्ञान । परमार्थविषयीं पूर्ण अज्ञान । ते नरदेहीं शुद्ध पाषाण । भार होवोन मेदिनी कष्टे ॥१२॥ श्रीहरिचरणीं नाहीं लोळणी । ते नर भारभूत मेदिनीं । जन्मा येउनी वायांच जननी । गर्भधारणीं कष्टविली ॥ १३ ॥ नाहीं देवद्वारीं गमन । नाहीं साधुसंतदरुषण । नाहीं सत्संगेसीं मन । ते नर पाषाण मेदिनीं ॥ १४ ॥ ऐसी दुर्जनाची जाति । संगत्यागचि कीजे त्यांप्रति । निजहितार्थ भगवंत आठवावा चित्तीं । धारणागती दृढनिष्ठा ॥ १५ ॥ जनबोला न लागावें । निजहित शोधोन साधावें । मन हळुहळु वळवावें । उद्धरावें निजकुळा ॥ १६ ॥ श्रीरामदासभजनें कुळ उद्धरे । श्रीरामदासभजनें कळिकाळ भेदरे । श्रीरामदासभजनें सामर्थ्य विस्तरे । धांवती सामोरे लोकालोक ॥ १७ ॥ सांडूनि लौकिक लाज । जिरवोनि संसारीचा माज । श्रीरामदासभजनीं नाचावें भोज । श्रीरामदास सहज बोलंगिजे ॥ १८ ॥ देहाचें निजभूषण । करावें अविश्रम श्रीसमर्थचिंतन । वृथा अलंकार-लेणीं लेवोन । मढें शृंगारोन नाडती ॥ १९ ॥ श्रवणाचें निजभूषण । करावें हरिकथाश्रवण । वृथा बुगड्या बाळ्या लेवोन । मढें सजवोन विचरती ॥ २० ॥ चरणांचें निजभूषण । घडावें देवालईं गमन । वृथा आना आनीं भ्रमोन ।

अधोवदनें श्रम पावती ॥ २१ ॥ करीं कंकणें घालिती । उपराउपरी दाविती । कांडोकांडीं मुद्या अडकविती । स्मशानगति विसरोनि॥ २२ ॥ कंठीं सुवर्ण मणिभूषण । दाविती अहंभारें दाटोन । शहाणे होवोन भगवद्भजन । दाटून विसरले ॥ २३ ॥ हे संसारप्रियांची वार्ता । मज तंव सर्वथा न मने चित्ता । मी तंव रिघालों शरण श्रीसमर्था । अन्य आतां न रुचे ॥२४॥ मज श्रीरामदास पाठीं पुढें । माझें हितगुज तोचि जाणे वाडेंकोडें । पडों नेदी कांहींच सांकडे । प्रेम गाढें निज तान्हयाचें ॥ २५ ॥ अवचटें संशय उठिला । श्रीसमर्थावरी भार घातला। चरित्रसंकल्प सिद्धी पाववला । प्रत्यक्ष प्रमाणाला काय बोलूं ॥ २६ ॥ ॐ नमो भगवंता श्रीसमर्था । तुजविण अन्य न देखों जी दाता । भवभयाची सर्व निरसली चिंता । कृपावंता तूं माय माझी ॥ २७ ॥ श्रीसमर्थकथा श्रवण करिती । ते जन मोक्षसायुज्यता पावती । अमर सुरगण वंदू धांवती । पवित्राचि जगतीं श्रीसमर्थकथा ॥ २८ ॥ जगीं कळिकाळभय दाटुगें । तें श्रीसमर्थचरित्रश्रवणें भंगे । कथाश्रवणें मन भगवंत मागे । खुलें अंतरंग श्रीसमर्थकथाश्रवणें ॥ २९ ॥ श्रीसमर्थचरित्रमहिमान । माझें मजचि आलें कळोन । सर्वकाळीं श्रीसमर्थचरित्रचिंतन । परम कल्याण जीवाशिवा ॥ ३० ॥ श्रीसमर्थचरित्र गातां । माझी समूळ पळाली अहंता । श्रीसमर्थ हृदईं ध्यातां । देहशुद्धता परिपूर्ण जाली ॥ ३१ ॥ कोणी केलें कांहीं । मज श्रीसमर्थचरित्रचिंतनेंविण नाहीं । श्रीसमर्थचिंतनें भवडोहीं । श्रीसमर्थें निजबाहीं तारिलें ॥ ३२ ॥ जन्मांतरींचें पुण्य फळलें । श्रीसमर्थश्रीचरण हृदईं आले । तेणें वृथाभिमानासी निरसिलें । पुनीत जालों नरदेहीं ॥ ३३ ॥ आतां श्रोतीं द्यावें अवधान । बोलेन श्रीसमर्थचरित्रविंदान । विशेष आगळें निरूपण । निजांगें आपण श्रीसमर्थ बोलविती ॥ ३४ ॥ तीर्थ-

क्षेत्रींचें पर्यटण । श्रीसमर्थें आधींच केलें निवडोन । ठाईं ठाईं तीर्थक्षेत्रें शोधोन । क्षेत्रमाहिमान वाढविलें ॥ ३५ ॥ क्षेत्रें पुनीत व्हावयासाठीं । संतां क्षेत्रपरिभ्रमणअटाटी । नाना जीव भवभयसंकटीं । देऊनि भेटी उद्धरावें ॥३६॥ आणिकी संप्रदाईं, विशेष दुराग्रह कांहीं । पुढिलां तुच्छ आपणां श्रेष्ठ पदवी । नवल नवाई उपासनेची ॥३७॥ श्रीसमर्थप्रभूसी जगदुद्धरणें । ठावोठाव शोधोनि पाहणें । विश्वकुटुंबी पदवी गाजविणें । झेंडा रोवणें श्रीरामनामीं ॥ ३८ ॥ प्रयागराजीं विद्वांस ब्राह्मण । नाहीं हरिकथा नाम स्मरण । दिंडी टाळमृदंगवादन । वैष्णवनर्तन नाहीं तेथें ॥ ३९ ॥ प्रयागराजीं जावें । पितृतर्पणातें करावें । दाढीमिशासी मुंडावें । विद्रूपत्वें यावें निजस्थळा ॥४०॥ जनापवादीं इतुकाचि भाव । परी प्रगट नांदतो श्रीसदाशिव । सर्वकाळ स्मरे श्रीराघव । जाणती वैष्णव महिमान ऐसें ॥ ४१ ॥ श्रीरामनामाचें महिमान । श्रीशंकरें गाजविलें प्रयागीं बैसोन । जन येती दाढीमिशा मुंडोन । वर्म ऊणखूण नेणती ॥ ४२ ॥ तया श्रीसदाशिवाचे पातीकर । निवडले श्रीसमर्थ दातार । संगें घेवोन वैष्णवांचा भार । सोहळा अपार मार्गीं चालिला ॥ ४३ ॥ उंच उंच पताका झळकती । टाळ मृदंग झणत्कारें झडती । हरिगुणगीतीं वैष्णव गर्जती । थैकारें नर्तती नानापरी ॥ ४४ ॥ टाळ मृदंग येकचि धुमाळी । श्रीरामनामीं देती आरोळी । लोटांगणें घेती एकमेळीं । पाप समूळीं धुवोनि जाये ॥ ४५ ॥ थैकार हैकार नामगर्जन । गीरा गंभीर अभंगीं आलापन । रंगीं रंग भरोन । विमानीं बैसोन अमर पाहती ॥ ४६ ॥ तुळशीमाळा मणिभूषण । अबीर बुक्क्याचें उधळण । त्रिपुंड्र भाळीं गोपीचंदन । वैष्णवजन नटताती ॥ ४७ ॥ श्रीसमर्थप्रभू प्रयागीं आला । संगें वैष्णवांचा मेळा । प्रयागीचा जनलोक सामोरा धांवला । श्रीसमर्थचरणाला पूजिती ॥ ४८ ॥

श्रीसमर्थरामदासमहिमान । प्रयागीं श्रुत होतें परिपूर्ण । विशेष प्रत्यक्ष होतां दरुषण । लोटांगणीं जन धांवती ॥ ४९ ॥ विद्वांस ब्राह्मणमांदी मिळाली । श्रीसमर्थमहापूजा आरंभिली । श्रीसमर्थ नाना स्तुतिस्तवनें गाइलीं । श्रीसमर्थमाउली पूज्यमान ॥ ५० ॥ प्रयागराजीचे ब्रह्मवृंदगण । विनविती श्रीसमर्थांलागोन । देवा धन्य आजि देखिलें श्रीचरण । येणें उद्धरण निश्चयें पावलों ॥ ५१ ॥ धर्म गेला रे गेला । हाचि बोल होता रूढला । तो तुह्मीं निज पुरुषार्थें लटिका केला । भूप स्थापिला छत्रपति शिवराज ॥ ५२ ॥ श्रीरामावतारीं घडलें । तेंचि तुह्मीं आजि साच दाविलें । विश्वजनां मुक्तिपदा नेलें । साम्राज्य जालें शुद्धसत्वाचें ॥ ५३ ॥ तंव द्विजवरां श्रीसमर्थें घातिलें लोटांगण । ह्मणती स्वामी तुमचें हें कृपादान । तुह्मी प्रत्यक्ष वेदोनारायण । धगधगायमान पुण्यरासी ॥ ५४ ॥ वेदविधी कर्माचरण । तें तुह्मींच आचरावें निर्वाण । वेदासी वज्रांगीं होवोन । यज्ञयाग करोन मेघ वर्षविजे तुह्मीं ॥ ५५ ॥ तुह्मां ब्रह्मवृंदाचें चरणरज । मी एक दुर्बळ भेटी आलों सहज । आह्मां तुह्मीं पढवावें हितगुज । श्रीरघुराज तुमचा अंकित ह्मणवी ॥ ५६ ॥ यापरी देवें ब्रह्मवृंदस्तुतिस्तवन केलें । एक मास प्रयागीं वस्तीसी राहिले । नित्य श्रीरामनाम गाजविलें । हरिकथे मांडिलें नित्यानित्य ॥ ५७ ॥ श्रीरामनामाचें महिमान । प्रयागीं जाणविलें सानथोरालागोन । ते भजों लागले श्रीसमर्थश्रीचरण । विस्मरण क्षणएक नाहीं ॥ ५८ ॥ श्रीरामनामाची पताका । प्रयागसंगमीं श्रीसमर्थें रोविली देखा । संसारधंदा नाठवे जनलोकां । श्रीरघुनायका घडीघडी आळविती ॥ ५९ ॥ प्रयागीं भजनमार्ग रूढविला । श्रीसमर्थें क्षेत्रवासियांचा निरोप घेतला । श्रीविश्वनाथविरह अत्यंत दाटला । परस्परांला दृढालिंगन पडिलें ॥ ६० ॥ श्रीप्रयागराजीं मठ संस्थापियला ।

अत्यंत कष्टें क्षेत्रनिरोप घेतला। श्रीसमर्थविरहव्यथा सानथोराला। श्रीसमर्थचरणाला वंदिती ॥ ६१ ॥ भजनानंदें सुरडले। श्रीसमर्थप्रभु कृष्णातटाला आले। शिवराज सामोरे धांवले। उत्साव केले मंगळघोषीं ॥ ६२ ॥ श्रीसज्जनगडावरी। यात्रा राहविली मासवरी। नित्य नूतन कीर्तनगजरीं। सह्याद्रिगिरि दुमदुमविला ॥ ६३ ॥ श्रीसमर्थ श्रीशिवराय नित्य एकांत। कवणासी हे नेणवेचि मात। रावें दिनमान नेम नेमिला निश्चित। छत्रपति निभ्रांत श्रीसमर्थबोधीं ॥ ६४ ॥ रावें दिनमान नेम नेमिला। जातां स्तवी श्रीसमर्थप्रभूला। तें करुणावचन साद्यंत नेणवे मज पामराला। संकेतवचनाला अल्पमात्र बोलूं ॥ ६५ ॥ ॐ नमो नमस्ते श्रीसमर्थ सुखधाम। नमो नमस्ते श्रीलोकाभिराम। नमो नमस्ते तूं पूर्णकाम। कैवल्यधाम कैवल्यनिधी ॥६६॥ नमो नमस्ते श्रीसच्चिदानंदकंदा। नमो नमस्ते श्रीसुखारविंदा। नमो नमस्ते श्रीचिन्मयानंदा। सुखस्वानंदकंदा परमबोधा ॥ ६७ ॥ नमो नमस्ते श्रीजगदुद्धरण। नमो नमस्ते आदिमूळकारण। नमो नमस्ते मायाचक्रचाळण। पद निर्वाण अर्पिता ॥ ६८ ॥ विधिहरिहरादिक। हे अवतार तुझे निष्टंक। अज्ञान बापुडे जीव रंक। तुझें कौतुक नेणती ॥ ६९ ॥ हे दशावतारमाळिका। तूंचि लेइलासी सकौतुका। अधर्म दंडोनि देखा। जनलोकां सुखरूप करिसी ॥ ७० ॥ भ्रांतिमंदा तव भाव न कळे। तुज मानुषी भाविती केवळ। धिग् धिग् तें ज्ञानडहुळ। पाप प्रबळ मूर्खत्वेंसीं ॥ ७१ ॥ हें काय एक म्यां बोलावें। श्रोतीं राया छत्रपतीचें वाक्य परिसावें। झणीं माझिये हातीं आलें स्वभावें। श्रीसंतसेवे ठेवितों ॥७२॥

श्रीशिवराज उवाच:—

सद्गुरुबापा तूं माहेरा। मातें तुझाचि उबारा।
पार कीजे भवसागरा। पूर्णोदारा स्वामिया ॥ १ ॥

अनन्याच्या प्रतिपाळका । दारुणभवभयहारका ।
रक्षा आपुल्या बाळका । नका नका उपेक्षूं ॥ २ ॥
भवसर्पें गुंडाळिलें । तेणें मन हें व्याकुळ जालें ।
हिताहित विसरलें । सांभाळिलें पाहिजे ॥ ३ ॥
मोकलिलें तुह्मीं जरी । निरवावें म्यां कवणेपरीं ।
तुह्मांवीण गति दूसरी । मातें नाहीं दयाळा ॥ ४ ॥
शुद्ध करोनियां मन । पूर्ण निजरूप जाणून ।
श्रीरामदासीं लोटांगण । शिवरायानें घातिलें ॥ ५ ॥

समचीत अनुभव शिवरायाला । उपमा कायसी प्रत्यक्ष प्रमाणाला । देह विदेहीं समाधि गेला । श्रीसमर्थस्वरूपाला एकरूप जालें ॥ ७३ ॥ श्रीगुरुचरणाचें महिमान । श्रीशिवरायें अनुभविलें परिपूर्ण । क्षणींच वृत्ति सांवरोन । श्रीसमर्थस्तवन वारंवार करी ॥ ७४ ॥ नेत्रीं प्रेमाश्रुपूर भरला । गहिंवरें अत्यंत दाटला । वारंवार घाली लोटांगणाला । सस्वरूपाला पूर्णत्वें पावला ॥ ७५ ॥ चारी प्रहर प्रेममिठी पडली । उभयतां निवृत्ति जाहली । ब्रह्मानंदीं देहबुद्धि हरपली । एकाकारलीं एकेकीं ॥ ७६ ॥ शिवराया नाहीं शिवराजपण । श्रीसमर्थां नाहीं श्रीसमर्थपण । एकाकार जालीं एकपणें । दृढालिंगन एकएकां ॥७७॥ ऐसी मासपर्यंत । श्रीशिवश्रीसमर्थेंसीं मात । गुप्तत्वें वर्तती गुप्त विवरांत । तत्वबोधांत एकपणें भेटी ॥ ७८ ॥ देह क्षणभंगुर बुडबुडा । भरंवसा धरील तोचि वेडा । श्रीशिव श्रीसमर्थ निर्विकल्प जोडा । तत्वझाडा पूर्णत्वें ॥ ७९ ॥ देह प्रारब्धीं टाकिला । हर्षामर्षासी विसरला । मायाअविद्यात्याग केला । भ्रम निरसला शुद्धज्ञान उजळलें ॥ ८० ॥ श्रीगुरुभजनप्रसादें । आंतु धर्मराणीव ज्ञानावबोधें । अकर्तव्य त्यागिलें जगनिंद्य । सहजानंदें साक्षित्व पावला ॥ ८१ ॥ श्रीगुरुचरणसेवा उतराई । वर्तणें धर्मसंस्थापन संप्रदाई । जीवभूतां सायुज्यपदवी । देणें नवलनवाई श्रीगुरुकृपा ॥ ८२ ॥ बाप श्रीगुरूचें महि-

मान । करी रंका आपुले समान । देहासगट वैकुंठीं पाठऊन । चिरंजीव करोन नांदवी ॥ ८३ ॥ असो रायें श्रीसमर्थनिरोप घेतला । श्रीसमर्थें भूप सप्रेमें गौरविला । सांगती युगायुगीं धर्म उजळावयाला । तुह्मां आह्मांला येणें घडे ॥ ८४ ॥ तुवां श्रीरघुनाथउपासना केली । कलीं धर्मसंस्थापना गाजविली । उदंड कीर्ति विश्वीं दुमदुमिली । नभमंडळीं अमर तुज गाती ॥ ८५ ॥ अवरंग्या पापी बुडविला । म्लेच्छसंहार तुवां केला। श्रीरघुनाथसंकेत सिद्धी नेला । आतां देहप्रारब्धाला न टाळिजे ॥ ८६ ॥ बापा शिउबा परंधामा गमन । तुज आवश्य आलें ठाकोन । सप्तमात्र उरलें दिनमान । परीक्षिति समान व्रत आचरीं ॥ ८७ ॥ करीं महालिंगें लाखोली । षोडशोपचारें अर्चीं बेलफुलीं । सहस्रभोजनीं तोषवीं द्विजमंडळी। काळ अळुमाळीं सार्थकीं लावीं ॥ ८८ ॥ श्रीगुरुचरणउपासन । तुज शुद्धभावें घडलें रे परिपूर्ण । आतां याचकां करीं गोभूसुवर्णदान । धीर धरोन श्रीरामराय स्मरें ॥ ८९ ॥ सांडीं निजदेहाची ममता । सांडीं दारासुतादिममता । सांडीं राज्यवैभवममता । श्रीरघुनाथा स्मरें बापा॥ ९० ॥ श्रीराघवावीण देखों नको । श्रीराघवावीण स्मरों नको । श्रीराघवावीण क्रमों नको । चळों नको अंतकाळीं श्रीराघवा ॥ ९१ ॥ तूं पूर्णत्वें परिपूर्ण राजा। तुज साभिमानी श्रीराम वोजा । मुक्ति सायुज्यपदवी पावसी सहजा। वैकुंठीं ध्वजा तुझेनि नामें ॥ ९२ ॥ तुझिया पुण्यासी नाहीं सीमा । तुझा धाक कळिकाळादि गरिमा । कृतकृत्य जालासि तूं भजननेमा । पदा उत्तमा पावलासि तूं ॥ ९३ ॥ श्रीशुकें राया परीक्षितीसी उद्धरिलें । श्रीसमर्थें शिवराजा वैकुंठपदीं बैसाविलें । कलीं न भूतो न भविष्यति चरित्र दाविलें । सुरवर निखिळ तटस्थ देखती ॥ ९४ ॥ रायें साधुसंतमंडळी अभिवंदिली । श्रीस्वामीसमर्था त्रिवार प्रदक्षिणा घातिली । श्रीरघु-

वीरनामीं उत्कट गर्जना केली । निजस्थळाला चालिले ॥ ९५ ॥ सकळ सांप्रदाई नमिले । उद्धव कल्याण दूरवर निरवीत आले । श्रीशिवराज रायगडीं चालिले । पुन्हःपुन्हा अवलोकिलें श्रीसज्जनगिरीतें ॥ ९६ ॥ श्रीसमर्थशिवराजगुप्तमात । कवणा नेणवे अणुमात्र । उद्धव कल्याण साशंकित । प्रश्न करिती स्वामियां ॥ ९७ ॥ देवें शिवराजा मास एक राहविलें । एकांत वसतीसी घेतलें । अनुमानें चित्त हळहळलें । भय जाहलें अंतर्यामीं ॥ ९८ ॥ तरी स्वामींनीं कृपा करोन । आमुचा संशय फेडावा पूर्ण । तंव श्रीसमर्थ दीर्घ श्वास टाकोन । संकेतवचन बोलती ॥ ९९ ॥ तुह्मा दोघांजणा । बरवी देखिली धारणा । बाप हो शिवराज करितो परंधामगमना । अवघा सप्तदिन उरलासे ॥ १०० ॥ उद्धवकल्याणा विरहव्यथा दाटली । महंतमंडळी चित्तीं हळहळली । श्रीसमर्थें पुढील भविष्यकथा वर्णिली । अल्पमात्र अवधारिजे ॥१॥

श्रीसमर्थरामदासस्वामी उवाचः—

जन्मदुःखें जरादुःखें । नित्य दुःखें पुन्हपुन्हा ।
संसार त्यागणें जाणें । आनंदवनभूवना ॥ १ ॥
वेधलें चित्त जाणावें । रामवेधीं निरंतरीं ।
रागें हो वीतरागें हो । आनंद० ॥ २ ॥
संसार वोढितां दुःखें । ज्याचें त्यासी च ठाउकें ।
परंतू एकदा जावें । आनंद० ॥ ३ ॥
न सोसे दुःख तें होतें । दुःख शोक परोपरी ।
एकाकी एकदा जावें । आनंद० ॥ ४ ॥
कष्टलों कष्टलों देवा । पुरे संसार जाहला ।
देहत्यागासि येणें हो । आनंद० ॥ ५ ॥
जन्म ते सोसिले मोठे । अपाय बहुतांपरी ।
उपायें धाडिलें देवें । आनंद० ॥ ६ ॥
स्वप्नीं जें देखिलें रात्रीं । तें तें तैसें चि होतसे ।
हिंडतां फिरतां गेलो । आनंदवन० ॥ ७ ॥

हे साक्ष देखिली दृष्टी । किती कल्लोळ ऊठिले ।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों । आनंदवन ० ॥ ८ ॥
स्वधर्माआड जीं जीं विघ्नें । तीं तीं सर्वत्र ऊठलीं ।
लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहु ॥ ९ ॥
विघ्नांच्या उठिल्या फौजा । भीम त्यावरि लोटला ।
घर्डिलीं चिर्डिलीं रागें । रडविलीं बडविलीं बळें ॥१०॥
हाकिलीं टाकिलीं तेणें । आनंदवनभूवनीं ।
हाकबोंब बहू जाली । पुढें खतल्ल मांडिलें ॥ ११ ॥
खौळले लोक देवाचे । मुख्य देव चि ऊठिला ।
कळेना काय रे होतें । आनंदवन० भूवनी ॥ १२ ॥
स्वर्गीची लोटली जेथें । रामगंगा महानदी ।
तीर्थासी तुळणा नाहीं । आनंद० ॥ १३ ॥
ग्रंथीं जे वर्णिली मागें । गुप्तगंगा महानदी ।
जळांत रोकडें प्राणी । आनंद० ॥ १४ ॥
सकळ देवांची साक्षी । गुप्त ऊदंड भूवनें ।
सौख्य चि पावणें जाणें । आनंद वनभूवना ॥ १५ ॥
त्रैलोक्य चालिलें जेथें । देव गंधर्व मानवी ।
ऋषी मुनी महायोगी । आनंदवन भूवनीं ० ॥ १६ ॥
अक्रा अक्रा बहू अक्रा । काये अक्रा कळचिना ।
गुप्त तें गुप्त जाणावें । आनंद० ॥ १७ ॥
त्रैलोक्य चालिल्या फौजा । सौख्य बंदाविमोचनें ।
मोहीम मांडिली मोठी । आनंदवन० ॥ १८ ॥
सुरेश उठिला अंगें । सुरसेना परोपरी ।
विकटें कर्कशें यानें । शस्त्रपाणी महाबळी ॥ १९ ॥
देव देव बहू देव । नाना देव परोपरी ।
दाटणी जाहली मोठी । आनंदवन० ॥ २० ॥
दिग्पती चालिले सर्वै । नाना सेना परोपरी ।
वेष्टीत चालिले सकळै । आनंद० ॥ २१ ॥
मंगळें वाजतीं वाद्यें । महागणासमागमें ।
आरंभीं चालिला पूढें । आनंद० ॥ २२ ॥
राशभें राखिलीं मागें । तेणें रागें चि चालिला ।
सर्वत्र पाठिशीं फौजा । आनंद० ॥ २३ ॥
अनेक वाजतीं वाद्यें । ध्वनीकल्लोळ ऊठिला ।
छबीनें डोलती ढाला । आनंद० ॥ २४ ॥

विजई दीस जो आहे । ते दीसीं सर्व ऊठती ।
अनर्थ मांडिला मोठा । आनंदवन० ॥ २५ ॥
देव चौ तुष्टला होता । त्याचे भक्तीसि भूलला ।
मागुता क्षोभला दुःखें । आनंद० ॥ २६ ॥
कल्पांत मांडला मोठा । म्लेंच्छ दैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंद० ॥ २७ ॥
बुडाले सर्व ही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंद० ॥ २८ ॥
पूर्वीं जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवन० ॥ २९ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाउकें विवेकी जनां ।
कैपक्ष घेतला रामें । आनंद० ॥ ३० ॥
भीम चौ धाडिला देवें । वैभवें धांव घेतली ।
लांगूळ चालिलें पूढें । आनंद० ॥ ३१ ॥
येथूनि वाढला धर्मू । रमाधर्म समागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥ ३२ ॥
बुडाला अवरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंद० ॥ ३३ ॥
बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी ।
ताडिले पाडिले देवें । आनंद० ॥ ३४ ॥
गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।
निर्मळ जाहली पृथ्वी । आनंद० ॥ ३५ ॥
उदंड जाहलें पाणी । स्नान संध्या करावया ।
जप तप अनुष्ठानें । आनंद० ॥ ३६ ॥
नाना तपें पुरश्चरणें । नाना धर्म परोपरी ।
गाजली भक्ति हे मोठी । आनंद० ॥ ३७ ॥
लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंद० ॥ ३८ ॥
बंड पाषांड ऊडालें । शुद्ध अध्यात्म वाढलें ।
राम कर्ता राम भोक्ता । आनंद० ॥ ३९ ॥
देवाळयें दीपमाळा । रंगमाळा बहुविधा ।
पूजिला देव देवांचा । आनंद० ॥ ४० ॥
रामवरदाइनी माता । गर्द घेऊनि ऊठिली ।
मर्दिले पूर्विचे पापी । आनंदवन० ॥ ४१ ॥

प्रत्यक्ष चालिली राया । मूळमाया समागमें ।
नष्ट चांडाळ ते खाया । आनंद० ॥ ४२ ॥
भक्तांसी रक्षिलें मागें । आतां हि रक्षिते पहा ।
भक्तांसी दीधलें सर्वें । आनंद० ॥ ४३ ॥
आरोग्य जाहली काया । वैभवें सांडिली सिमा ।
सार सर्वस्व देवाचें । आनंद० ॥ ४४ ॥
देव सर्वस्व भक्तांचा । देव भक्त दुजें नसे ।
संदेह तुटला मोठा । आनंद० ॥ ४५ ॥
देव भक्त एक जाले । मिळाले जीव सर्व ही ।
संतोष पावले तेथें । आनंद० ॥ ४६ ॥
सामर्थ्यें येशकीर्तीचीं । प्रतापें सांडिली सिमा ।
ब्रीदें चि दिधलीं सर्वें । आनंद० ॥ ४७ ॥
राम कर्ता राम भोक्ता । रामराज्य भुमंडळीं ।
सर्वस्व मी च देवाचा । माझा देव कसा ह्मणों ॥ ४८ ॥
हें चि शोधोनि पाहावें । राहावें निश्चळीं सदा ।
सार्थक श्रवणें होतें । आनंद० ॥ ४९ ॥
वेदशास्त्रेंधर्मचर्चा । पुराणें महात्में किती ।
कवित्वें नूतनें जीणे । आनंद० ॥ ५० ॥
गीत संगीत सामर्थ्यें । वाद्य कल्लोळ ऊठिला ।
मिळाले सर्वही अर्थार्थी । आनंद० ॥ ५१ ॥
वेद तो मंद जाणावा । सिद्ध आनंदभूवनीं ।
अतुळ महिमा तेथें । आनंद० ॥ ५२ ॥
मनासी प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाटला ।
कामना पुरती सर्वें । आनंद० ॥ ५३ ॥
येथूनि वांचती सर्वें । तें ते सर्वत्र देखती ।
सामर्थ्य काय बोलावें । आनंद० ॥ ५४ ॥
उदंड ठेविलीं नामें । आपस्तुति च मांडिली ।
ऐसें हें बोलणें नाहीं । आनंद० ॥ ५५ ॥
बोलणें वाउगें होतें । चालणें पाहिजे बरें ।
पुढें घडेल तें खरें । आनंद० ॥ ५६ ॥
स्मरलें लिहिलें आहे । बोलता चालता हरी ।
काये होईल पाहावें । आनंद० ॥ ५७ ॥
महिमा तो वर्णवेना । विशेष बहुतांपरी ।
विद्यापीठ तें आहे । आनंद० ॥ ५८ ॥

सर्वसद्या कळा विद्या । न भूतो न भविष्यति ।
वैराग्य जाहलें सर्वें । आनंद० ॥ ५९ ॥

हें श्रीसमर्थप्रभूचें भविष्यमान । ऐकोनि चाकाटले सिद्ध-गण । श्रीशिवराज करितो परंधामगमन । ह्मणों अवतरोन येईल पुन्हा ॥ २ ॥ म्लेंच्छ संहराया कारणें । शिवराज येईल निश्चयेंकरोन । श्रीसमर्थ ह्मणती न धरा रे अनुमान । आनंद-भुवन आनंदऊं पुन्हां ॥ ३ ॥ करवीरपंचवटीपर्यंत । निवा-सार्थ श्रीआज्ञा निश्चित । प्रत्यक्ष पंचवटीं श्रीरघुनाथ नांदत । संशयार्थ न धरावा ॥ ४ ॥ शिवराज पुनरपि येईल । पाप नि-र्मूलन करील । वैभव ऐश्वर्य भोगील । उपरि अवतरेल द्विज-कुळीं ॥ ५ ॥ द्विजकुळीं जन्म घेवोन । बद्रिकाश्रमीं करील योगसाधन । तो देह त्यागोन । सस्वरूपीं भरोन अवतार संप-वील ॥ ६ ॥ ऐसें श्रीहनुमंतबखरीचें निरूपण । ते चि आधारें मी हि बोलिलों जाण । धीटपाठ न ह्मणावें हें वचन । श्रीसमर्थ-वचनआधारीं ॥ ७ ॥ आतां येरीकडे रायगडावरी । छत्रपतीं-ची येवोन स्वारी । उभयपुत्रां मेळ घालोनि सत्वरीं । संभाजी अनावरी बंदिस्त केला ॥ ८ ॥ ज्येष्ठ संभाजी पुरुषार्थी थोर । परी मूर्खत्वें करी अविचार । रायासी न मने तो प्रकार । पुत्र सत्वर बंदिस्त केला ॥ ९ ॥ रायें अष्टप्रधान पाचारिले । राजा-राम सिंहासनीं नेमस्त केले । दानधर्मादि उत्साव आरंभिले । ब्रह्मवृंद मेळविले अपरंपार ॥ ११० ॥ पन्हाळगडीं पुत्र बंदिस्त केला । रायगडीं दानधर्मोत्सव आरंभिला । महालिंगलाखो-ळीला । ब्रह्मवृंदाला नेमिलें ॥ ११ ॥ गोदानें भूमिदानें । अपर-मित द्रव्यदानें । नित्य द्विजवरांसी सहस्र भोजनें । हर्षनिर्भ-रोन धर्म चालिला ॥ १२ ॥ ऐसा नित्य धर्मसमारंभ चालतां । भक्त श्रीरघुनाथनामीं गर्जता । छत्रपति शिवराज राम राम स्म-रतां । देह आतौता सांडिती ॥ १३ ॥ शके सोळाशें दोन । रौद्र

संवत्सर रविवार दिन । चैत्रशुद्ध पौर्णिमा दोन प्रहर पूर्ण । राम राम स्मरोन शिवराज गेले ॥१४॥ परिवारजनीं आकांत मांडिला । महाराष्ट्रप्रतापसूर्य चि मावळला । दीर्घ काळकूट अंधःकार भरला । त्या अवकळेला काय वर्णू ॥ १५ ॥ श्रीशिवरायें देह सांडिला । प्रधानीं स्वामिनिवेदनीं दूत पाठविला । श्रीसमर्थ होते वोवरीला । श्रीसज्जनगिरीला अपशकून जाणवले ॥१६॥ म्लानवदनी दूत देखिला । त्यासी न वचे बोल बोलिला । थोरा कष्टें शब्द उमटला । निजधामाला श्रीछत्रपती गेले ह्मणे ॥ १७ ॥ श्रीसमर्थ ह्मणती देहप्रारब्धेसीं । शिवराज गेला निजधामासी । असें ह्मणतां अश्रु नयनासी । अळुमाळेंसीं चालिले ॥ १८ ॥ तत्काळ श्रीसमर्थ उठिले । एकांत वसतीसी गेले । भक्तवर्ग विरहव्यथें दाटले । सांतवन केलें न वचे कवणा ॥ १९ ॥ पृथ्वीवरी राजे असंख्य होती । होती जाती न करवे गणती । परी कीर्तिवंत त्रिजगतीं । तुळणा तुकती विरुळाले ॥ १२० ॥ राज्यमद वैभवमद । सामर्थ्यमद अधिकारमद । त्यांसी प्रजामेळीं चिरकालद्वंद्व । भेदाभेद विरुद्ध भावने ॥ २१ ॥ पुत्रवई प्रजापालन । केलें एके रुक्मांगदें जाण । कां तो हरिश्चंद्र आपण । धर्मप्रजापालनीं दक्ष निवडला ॥ २२ ॥ श्रीराम श्रीकृष्ण अवतार धरोन । जन निर्द्वंद्व केले परिपूर्ण । अभंग अक्षई राहिले विश्वीं भरोन । कीर्ति पावन जगदुद्धरणीं ॥ २३ ॥ श्रीशिवरायें देह ठेविला । महाराष्ट्रीं हाहाःकार जाला । तें दुःख वर्णावया मज पामराला । सामर्थ्य बोला नसे कीं ॥ २४ ॥ धन्य शिवरायाचा प्रताप । धन्य शिवरायाचा साक्षेप । धन्य शिवरायाचा आटोप । दुष्टां चळिकांप ज्याचेनि नावें ॥ २५ ॥ शिवरायासी च ह्मणावें पुरुष । शिवरायासी च ह्मणावें क्षितीश । शिवरायासी च फावलें यश । श्रीसमर्थ सर्वेश अंकित ज्यासी ॥ २६ ॥ श्रीशिव श्रीस-

मर्थ जोडी । यासी उपमा देतां थोडी । पुरुषार्थबळें अमर-सुरवरें जालीं बापुडीं । यश पुरुषार्थ प्रौढी प्रत्यक्ष गाजली ॥ २७ ॥ किंचत् पुरुषार्थ गाजतां । अहंकार ताठा फुटे चित्ता । धन्य त्या छत्रपतीयशपुरुषार्थसत्ता । अहंकारचळथा विरोनि गेल्या ॥ २८ ॥ किंचित् मात्र द्रव्य जोडिलें । तें कुटुंबपोषणीं संग्रहिलें । धन्य श्रीशिवराज्यभांडार भरलें । कारणीं लाविलें परमार्थमार्गीं ॥ २९ ॥ तो श्रीशिवछत्रपती । अद्याप आठवे आबाळवृद्धाचित्तीं । यावचंद्रदिवाकरौ स्मृति । महीवरती राहेल ॥ १३० ॥ प्रधानपंतीं विचार केला । राजाराम सिंहासनीं बैसविला । उपरी श्रीशिवराजअंत्यविधी सम्पादिला । दुःखशोकाला आवरिलें ॥ ३१ ॥ गंभीर धीर धुरीण । मिळोन अष्ट हि प्रधान । राज्यभार चालविती पुरुषार्थें करोन । परी विघ्न दारुण वोढवलें ॥ ३२ ॥ ताम्रपतीनें स्वारी मांडिली । राया संभाजीसी अवकळा आठवली । सापत्न माता हलाहलें मारिली । बंदिखाणी दिधली राया राजारामा ॥ ३३ ॥ मोठा अनर्थ जाला । सज्जनांसी उपमर्द घडला । सांगों येती श्रीसमर्थप्रभूला । अनन्वित अनर्थाला निवेदिती ॥ ३४ ॥ राव संभाजी परळीसी आला । तेणें इच्छिलें श्रीसमर्थ-दर्शनाला । श्रीसमर्थें भेटियोग अव्हेरिला । हितपत्राला जनाग्रहें लिहिलें॥ १३५ ॥

श्रीसमर्थ उवाचः—

" अखंड सावधान असावें । दुश्चित्त कदापि नसावें । तजवीज करीत बसावें । एकांतस्थळीं ॥ १ ॥ कांहीं उग्र स्थिती सोडावी । कांहीं सौम्यता धरावी । चिंता पराची लागावी । अंतर्यामीं ॥ २ ॥ मागील अपराध क्षमा करावे । कारभारी हातीं धरावे । सुखी करुनि सोडावे । कामाकडे ॥ ३ ॥ पाटांतील तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना । तैसें जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥ जनाचा प्रवाह चालिला । ह्मणजे कार्यभाग आटोपला । जन ठाईं

ठाईं तुंबला । ह्मणिजे तें खोटें ॥ ५ ॥ श्रेष्ठीं जें जें मेळविलें । त्यासाठीं भांडत बसलें । तरी मग जाणावें फावलें । गलीमासी ॥ ६ ॥ ऐसें सहसा करूं नये । दोघे भांडतां तिसऱ्यासि जाये । धीर धरूनि महत्कार्यें । समजूनि करावें ॥ ७ ॥ आधीं च पडली धास्ती । मग कार्यभाग होय नास्ती । याकारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ८ ॥ राजीं राखतां जग । मग कार्यभागाची लगबग । ऐसें जाणोनियां सांग । समाधान करावें ॥ ९ ॥ सकळ लोक एक करावे । गलीम निवडूनि काढावे । येणें करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥ १० ॥ आधीं गाजवावे तडाके । तरी मग भूमंडळ धाके । ऐसें न करितां धक्के । राज्यास होती ॥११॥ समय प्रसंग वोळखावा । राग निपटूनि काढावा । आला तरी कळों न द्यावा । जगामाजीं ॥ १२ ॥ राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक । लोकालोकांचे मना धाक । उपजों चि नये ॥ १३ ॥ बहुत लोक मेळवावे । एकविचारें भरावे । कष्ट करोनि घसरावें । म्लेंच्छावरी ॥ १४ ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आधीक मेळवावें । महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥ अहंमति लोकीं धरावी । हिमतीची तरवार करावी । चढती वाढती पद्वी । पावाल येणें ॥ १६ ॥ शिवराजास आठवावें । जीवित तृणवत् मानावें । इहलोकीं परलोकीं तरावें । कीर्तिरूपें ॥ १७ ॥ शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप । शिवरायाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥ १८ ॥ शिवरायाचें कैसें बोलणें । शिवरायाचें कैसें चालणें । शिवरायाची सलगी देणें । कैसी असे ॥ १९ ॥ सकळ सुखाचा केला त्याग । करूनि साधिजे तो योग । राज्यसाधनाची लगबग । कैसी केली ॥ २० ॥ त्याहूनि करावें विशेष । तरी च ह्मणवावें पुरुष । याउपरी आतां विशेष । काय लिहावें ॥ २१ ॥

छत्रपती संभाजीनें श्रीसमर्थपत्र वंदिलें । पत्रदेत्या आदरें सन्मानिलें । श्रीस्वामीआज्ञे वर्तन ह्मणितलें । पढतमूर्खत्व बाणलें मागुतें तैसें चि ॥ ३६ ॥ आइका पुढील प्रसंगींचें निरूपण । श्रीसमर्थस्वामीपरंधामगमन । ते चि बोलविती हृदईं येवोन । मी निमित्त्य जाण आडनांवाचा ॥ ३७ ॥ श्रीसमर्थकृपेचें महिमान । मज किंचित् आलें जी कळोन । येथोनि न घडो न घडो जी विस्मरण । तुमची आण स्वामिराया ॥ ३८ ॥

जन्मजन्मांतरीं । हें मस्तक जडो श्रीचरणावरी । नित्यनित्य वदो वैखरी । राम राम गजरीं निर्धारें ॥ ३९ ॥ किंचित्मात्र चरित्र गाइलें । येणें माझे महादोष संव्हारिले । हें माझें मज चि कळों आलें । चरित्र चांगलें श्रीसमर्थरायाचें ॥ १४० ॥ श्रीसमर्थस्वामी साभिमानी जाला । माझा संदेह तेणें निरसिला । चित्त सर्वस्वें वेधिलें श्रीचरणाला । जन्ममरणाला पांगविलों ॥ १४१ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ १४२ ॥

इति श्रीरामदासकथासारामृत । भीमुविरचितायाम् श्रीशिवराजनिजधामगमनन्नाम सप्तदश प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसमर्थरामदासार्पणमस्तु ॥

॥ एवं ओवीसंख्या २१९ ॥

---

॥ श्रीराम ॥

## प्रसंग १८ वा

आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकम् ।
श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥

॥ श्रीसद्गुरुरामदासायनमः ॥



सत्य तूं सत्य तूं स्वामीराया । धांवसी निजभक्त तारावया । सामर्थ्य देसी भजन करावया । मंगळ काया तुझेनि प्रसादें ॥ १ ॥ तव सामर्थ्य नवलनवाई । ते किती ह्मणोनि वर्णावी । हा मस्तक जडो तुझिये पायीं । आणीक कांहीं न मागों स्वामी ॥ २ ॥

भक्तजनांच्या हृदयनिवासा । अंकित होतां पुरविशी आशा । महानुभावा श्रीरामदासा । पुराणपुरुषा नमोस्तुते ॥ ३ ॥ नमो नमो श्रीरामदासा । नमो नमो श्रीजगन्निवासा । नमो नमो तूं श्रीसर्वेशा । आशापाश सर्व तोडीं ॥ ४ ॥ नमो जी सर्वसुखैकधामा । नमो नमो जी श्रीआत्मारामा । नमो नमो जी सर्वोत्तमा । मायाभ्रम निवारीं ॥ ५ ॥ नमो नमस्ते विश्वतारणा । नमो नमस्ते जगदाभरणा । नमो नमस्ते भवभयसंहरणा । विश्वकारणा श्रीसमर्थदेवा ॥ ६ ॥ जयजया जी तूं श्रीअनंत । जयजया जी तूं श्रीअच्युत । जयजया जी तूं श्रीसर्वातीत । साधुसंतविश्रामधाम ॥ ७ ॥ जयजयाजी श्रीदेवदेवा । जयजया जी श्रीकेशवा । जयजया जी श्रीमाधवा । श्रीसमर्थदेवा तूं चि तूं ॥ ८ ॥ जयजया जी श्रीनृहरि । जयजया जी श्रीमधुकैटभारि । जयजया जी रावणांतकारी । निजनिर्धारीं श्रीसमर्थदेवा ॥९॥ जयजया जी श्रीविश्वंभरा । जयजया जी सर्वोपकारा । प्राप्तकाळीं येसी अवतारा । निजमाहेरा अनाथबंधो ॥१०॥ नमो नमो श्रीशेषशयना । नमो नमो श्री आदिनारायणा । नमो नमो श्रीरघुनन्दना । वायुनन्दना श्रीसमर्थदेवा ॥ ११ ॥ जयजया जी श्रीकमलवदना । जयजया जी श्रीकमलनयना । जयजया जी श्रीकमलवसना । आनंदभुवना श्रीरामदासा ॥१२॥ जयजया जी श्रीदीनदयाळ । जयजया जी श्रीप्रणतपाळ । जयजया जी भक्तकृपाळ । परमस्नेहाळ दीनबंधो ॥ १३ ॥ श्रीसमर्थदेवा तुज गावें । तेणें सर्व शरीर सुख पावे । श्रीसमर्था तुमचे चरणीं लीन व्हावें । जीवेंभावें देहबुद्धि हरपे ॥ १४ ॥ श्रीसमर्थ रामदासांचें चिंतन । तेणें जीवशिवा पडे आलिंगन । असंख्य जीव जाले पावन । भविष्यमान उद्धरती ॥ १५ ॥ नमो नमो तुज माहेरा । नमो नमो तुज कृपासागरा । नमो नमो तुज सर्वाधारा । पूर्णागरा पूर्णबोधा ॥ १६ ॥ नमो नमो तुज दीनबंधू ।

नमो नमो तुज आनंदकंदु । कृपें वारिजे भेदाभेदु । संसार छंदु मावळोनि ॥ १७ ॥ तुझा छंद मज लागला । शुद्धसंकल्प प्रत्यक्ष फळला । परमानंद अनुभवा आला । तुझी लीला अतर्क्य कळली ॥ १८ ॥ नाहीं घडलें तपाचरण । नाहीं घडलें विशेष तीर्थाटण । नाहीं घडलें निर्वाणभजन । मन भरोन तुज नाहीं भजलों ॥ १९ ॥ नेणवे कोण पुण्य वोढवलें । जे तुझें कृपाकिरण देखिलें । दिव्यज्ञान दृष्टीं उजळिले । धन्य जालों संसारीं ॥ २० ॥ किती देऊं धन्यवाद । कृपें वोळला नित्यानंद । सुखावला निजत्माबोध । चारित्रछंद मनें घेतला ॥ २१ ॥ माझी उजळ केली मति । निजांगें लेखणी धरविली हातीं । जिव्हे वैसविली श्रीसरस्वति । चरित्रकीर्ति बोलविली तुवां ॥ २२ ॥ आला ग्रंथाचा कळस । तो हा श्रीसमर्थसमाधिसौरस । सकळांमाजीं अठरावा विशेष । श्रीसमर्थ सर्वेश बोलविता ॥ २३ ॥ नातरी टिटवी चांचूवरी । माप घाली सागरीं । माझा प्रयत्न तियेपरी । तुवां निर्धारीं सिद्धीस नेला ॥ २४ ॥ माहानुभाव सिद्धपुरुष । तुझे वर्णिताती यश । ते मज बाळकाची पुरविली आस । श्रीसमर्थ सर्वेश मज वोळला ॥ २५ ॥ तुझा कृपाकर लाधला । माझा मनोभाव उजळिला । चरित्रलेखनीं अंकुर फुटला । प्रसंगाला प्रसंग सजविले ॥ २६ ॥ तुझिया चरित्राचेनि गुणें । माझें उदंड वाढलें व्यसन । जन्मवरी करीन गुणगान । अखंड खंडण न होतां ॥ २७ ॥ आतां सभाग्य श्रोतयां करूं नमस्कार । ध्यानीं आणूं श्रीसमर्थदातार । अठरावा प्रसंगविस्तार । अत्यादरें निरोपूं ॥ २८ ॥ मागील प्रसंगीचें निरूपण । श्रीशिवरायें केलें परंधामगमन । पुढें श्रीसमर्थपरंधामगमन । हें चिकथन श्रोतीं अवधारिजे ॥ २९ ॥ श्रीशिवरायें केलें परंधामगमन । महाराष्ट्र दुःखार्णवीं बुडाला परिपूर्ण । स्वामींनीं घेतलें एकांतवसतिस्थान । परिभ्रमण राहविलें ॥ ३० ॥ देशोदे-

शींचे महंत येती । श्रीसमर्थप्रभूसी अवलोकिती । श्रीसमर्थ त्यांसी सद्बोधिती । कार्य सांगती अधिकारपरत्वें ॥ ३१ ॥ बाप हो जरी श्रीरामदास्य करणें । तरी सांगतों तीं जीवीं धरावींत लक्षणें । अन्य उपाव नसे याविणें । श्रीसमर्थ ऊणखूण अभंग बोलिले ॥ ३२ ॥

अभंग:—

कायावाचामनें । यथार्थ रामीं मिळणें । तरी च श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ १ ॥ काम क्रोध खंडणें मद मत्सर दंडणें । तरी च श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ २ ॥ परस्त्रीनपूंसक होणें । परद्रव्यें न पोसणें । तरी च श्लाघ्यवाणें रामदास्य ॥ ३ ॥ जैसें मुखें बोल । तैसी क्रिया चालणें । तरी च श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ ४॥ रामदास ह्मणे । निर्गुणीं सुख लाधणें । तरी च श्लाघ्यवाणें । रामदास्य ॥ ५ ॥

ऐसी श्रीरामउपासनरीति । महंतां श्रीसमर्थ निरूपिती । पुढें महंतपदसौख्यस्थिति । यथानिगुती निरूपिती ॥ ३३ ॥

॥ श्रीसमर्थ उवाच:—

महंती सुखाची नाहीं । येथें दुःख उदंड हि । उदंड दुःख लोकांचें । ऐकतां उर फूटतो ॥ १ ॥ लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती । पहावे ते किती डोळां । ऐकावे श्रवणे किती ॥ २ ॥ क्षमितां ऊर तो दाटे । बोलतां वाणि खुंटते । तऱ्ही ते मस्तमस्तीनें । वळितां वळतीच ना ॥ ३ ॥ वळितां दुःख मानीती । अन्यायें घात नेणती । सांगतां हित वाटेना । ऐकतां त्रास मानिती ॥ ४ ॥ झंझणती चंचणती । फंफणती हटेंतटें । हटेंतटें उद्धटें होतीं । आपशुद्धि असेचिना ॥ ५ ॥ उद्धटें वर्तती क्रीया । उद्धटें शब्द बोलती । उद्धटें नास्ति मर्यादा । उद्धटें नास्ति नम्रता ॥ ६ ॥ उद्धटें गर्व वर्तावा । उद्धटें प्रीति नासती । उद्धटें आर्त तोडीती । उद्धटें प्रीति खंडती ॥ ७ ॥ अखंड सर्व सोसावें । भलेपणाचि कारणें । परंतु सुख तें नाह्मीं । कांहीं कांहीं क्वचित ही ॥ ८ ॥ सीण उदंड होताहे । नेणत्यासंगतीगुणें । जाणतासंग भेटेना । दुःखाळ पडिला गमे ॥ ९ ॥ सज्जनें काय करावें । लोक मोठा अनावरु । कीं त्यासी काय सांगावें । मनांतून कळेचिना ॥ १० ॥ सज्जः

नीं फारसी निष्ठा । देव त्यासी च बोळतो । अन्याय वर्ततां तो तो । भ्रष्ट होती अनावरु ॥ ३१ ॥

श्रीसमर्थमंहतमालिका । कवणा करवेल तयाचा लेखा । श्रीसमर्थसंप्रदाय निका । मतिमंद बाळका काय कळे ॥ ३४ ॥ देशोदेशीं महंत स्थापिले । वरी कार्यपरीक्षक नेमिले । माजीं कल्याण मुखरण निवडले । श्रीस्वामियां जाणविलें नाना महंतकार्यें ॥ ३५ ॥ श्रीसमर्थप्रभूच्या संगतीं । किती अधिकारपदवी पावती । जडमूढ जनांप्रति । सहजगति तारूं जाहलें ॥ ३६ ॥ न कळे काय जालें । श्रीसमर्थप्रभूच्या मनीं आलें । श्रीकल्याण महंतीं पाठविले । प्रांत नेमिला परंडा ॥३७॥ श्रीकल्याणस्वामींचें महिमान । वर्णूं जातां असाधारण । सर्व सामर्थ्य अंगीं भरोन । श्रीसमर्थपद पावोन निरभिमानी ॥३८॥ श्रीसमर्थप्रभूनें पढविलें । श्रीकल्याणें सबाह्य ग्रहण केलें । श्रीसमर्थमनीं परिपूर्ण भरले । पद पावले श्रीसमर्थजीचें ॥ ३९ ॥ श्रीसमर्थ ह्मणती कल्याणा । तुवां जावें करावें जगदुद्धरणा । मठ स्थापीं चालवीं महंतपणा । विश्वजना मार्ग दावीं ॥ ४० ॥ तुज माझी आज्ञा प्रमाण । वृक्षाखालीं वृक्ष न वाढे चि जाण । महंतपदवीसी तूं मुख्य मुखरण । श्रीरघुनन्दन तुज सहाकारी ॥ ४१ ॥ ऐसी श्रीसमर्थआज्ञा होतां । अत्यंत विरहव्यथा श्रीकल्याणचित्ता । ह्मणे स्वामी हें कोण आलें मनोगता । मज आतां श्रीचरण दुराविती ॥ ४२ ॥ माझी श्रीसमर्थमाउली । ह्मणीं मज कैसी कंटाळली । निजांगें श्रीचरणसेवा अंतरली । महंती आली नागवणा ॥ ४३ ॥ तंव अक्का उद्धव सन्निध आले । आणीक हि महंत मीनले । श्रीकल्याण विरहव्यथेनें हळहळले । अश्रु भरले दुःखातिवेगीं ॥ ४४ ॥ आतां श्रीसमर्थआज्ञा कोण पाळील । श्रीसमर्था कोण अंगप्रक्षाळण करील । कोण श्रीचरणसेवनीं धांवेल । मागता देईल तांबूल कोण ॥ ४५ ॥

कोण करवील भोजन । सवें अरण्यपंथें कोण करील गमन । सहजस्फूर्तीचें कवन । निजांगें लेखन करील कोण ॥ ४६ ॥ यापरी नाना प्रेमविवंचना । हुरहुर जाहलें कल्याणा । उकसाबुकसी करी रुदना । श्रीसमर्थचरणा लोटांगण घाली ॥ ४७ ॥ तंव श्रीसमर्थ ह्मणती कल्याणा । तुज हें कोण आलें मना । श्रीगुरुआज्ञापरिपाळण । शिष्यगणा परमधर्म हा ॥ ४८ ॥ तो तूं सर्व जाणता । आणि नाथिली मांडिली शोकावस्था । तुजमाजीं आह्मी सर्वकाळ रहाटतां । अंतरस्था ऐक्यस्थितीं ॥४९॥ आठव करितां सन्निध आह्मी । हें निखिळ ज्ञान तुज संभ्रमीं । रहाटे अंतर्बोधधामीं । आह्मी तुह्मी भिन्न न हों चि कदा ॥ ५० ॥ हांक फोडितां चि धांवोन । तुझ्या मागें पुढें राहेन । ह्मणशील तेथें प्रगटेन । येविषीं अनुमान न धरीं तूं ॥ ५१ ॥ तुजऐसा जो भाव धरील । त्यासी हि मज भेटी घडेल । एतद्विषयीं जो अनुमान धरील । जिव्हा झडेल निश्चयेसीं ॥ ५२ ॥ ऐसें श्रीसमर्थनिर्वाणवचन । कल्याण सहपरिवार करिती श्रवण । सकळीं श्रीचरणीं घातिलें लोटांगण । नेमिलें गमन श्रीकल्याणमहंती ॥५३॥ श्रीसमर्थप्रभूची शिकवण । श्रीकल्याणा लाधली परिपूर्ण । अंगीं महंती असाधारण । कांहीं ऊणखूण श्रीसमर्थ बोलिले ॥ ५४ ॥

श्रीसमर्थ उवाचः—

प्रत्यहीं मागणें भिक्षा । मिळाली न मिळो तरी । नित्यनूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥ १ ॥ कथा ते करावी आधीं । बाधी ते दुराशा नको । उपाधी आतळावेना । जावें ना वैभवाकडे ॥ २ ॥ सर्वत्र लोक शोधावे । बोधावे भक्तिच्या गुणें । रहावें दुर्बळाचेथें । देवाल्यें कां नदीतिरीं ॥ ३ ॥ पर्वतीं नदीतीरीं । सन्निध चि एकीकडे । फार एकांत सेवावा । अभ्यास नित्यनूतनु ॥ ४ ॥ सहावीं उष्णसीतादि । पहावीं रम्यसीं स्थळें । करावे आपण कष्ट । बांधावीं तीं हळूहळू ॥ ५ ॥

कल्याणें श्रीचरणा नमिलें । परंडाप्रांतीं गमन केलें । महंतपणीं धवळ कीर्ति उजळले । जन लाविले भक्तिपंथा ॥५५॥ श्रीकल्याणें बहु व्याप केला । भत्ययज्ञानें जन बोधिला । श्रीसमर्थनामीं ध्वज उभविला । डोंबगांवाला जा पहा ॥५६॥ श्रीकल्याणें डोंबगांवीं मठ केला । निजनिवास संनिध पर्वतीं नेमिला । मासपरत्वें रहिवास नेमिला । श्रीकल्याणाला जन शोधिती ॥५७॥ चारी मास परंड्यासी राहती । चारी मास कड्यावरी वसती । चारी मास डोणजेनिकट जाती श्रीभगवतीमंदिरीं ॥५८॥ येरीकडे चांफळीं नउमी । होतसे अत्यंत आनंद संभ्रमीं । भक्तपाळ रंगती श्रीरामनामीं । सेवाधर्मीं परमागळे ॥५९॥ श्रीनउमीउत्छाव सम्पादून । भक्त येती श्रीसमर्थदर्शनालागून । श्रीस्वामी माजघरीं बैसोन । सानथोरांलागोन आसिर्वचन बोलती ॥६०॥ श्रीस्वामी धुनीनिकट बैसती । जनलोकां दुःखव्याधी पुसती । महारोगादि पळविती । धुनींतील विभूती मात्र देतां ॥ ६१ ॥ छत्रपती संभाजी राज्यारोहणीं । श्रीसमर्था पाचारिलें आदरोनि । तिहीं अस्वस्थ शरीर ह्मणुनी । दिवाकर गोसांवियालागुनी पाठविलें ॥ ६२ ॥ राज्यारोहणसमारंभ जाला । श्रीस्वामिया भविष्यकाळ जाणवला । मूर्तिध्यास मनीं बैसला । अक्का उद्धवाला निकट पाचारिलें ॥ ६३ ॥ भक्तमंडळी मिळाली । श्रीसमर्थचरणीं लागली । श्रीसमर्थें श्लोकार्थें मात जाणविली । पूर्ती केली श्रीउद्धवें ॥६४॥

॥ श्लोक ॥

रविकुळटिळकाचा वीध सन्नीध आला ।
तदुपरी भजनासीं पाहिजे सांग केला ।
अनुदिनिं नउमी हे मानसीं आठवावी ।
बहुत लगबगीनें कार्यसिद्धी करावी ॥ १ ॥

देवें स्मित हास्य केलें । उद्धवा धन्य धन्य ह्मणितलें । दशमास कालमान नेमिलें । नउमी नेमिली माघवद्याची ॥ ६५ ॥ तें श्रीसमर्थसमाधिकालनिरूपण । श्रीभीमस्वामी गेले बोलोन । तें चि

श्रोतीं करावें श्रवण। विश्वास पूर्ण जीवीं धरूनि ॥ ६६ ॥ दश-मावरी टीका करितां । स्वयंवराची आली कथा । श्रीदयार्णवीं श्रीनाथचरणीं वाहोनि माथा। श्रीनाथप्रणित स्वयंवरकथा निज-ग्रंथीं ठेविली ॥ ६७॥ श्रीनाथस्वामींनीं लिहिलें स्वयंवर । श्री-दयार्णवीं ग्रंथीं तें चि केलें सादर । मज हि तो चि बाणला श्रेष्ठ विचार। भीमस्वामी बोलिले साचार तें चि घेऊं ॥ ६८ ॥ तं-जावरमठपति । श्रीभीमस्वामी प्रसिद्ध जगतीं । प्रत्यक्ष अनुभ-विली स्थिति वर्णिती । संशयनिवृत्ति श्रोतयांची ॥ ६९ ॥

श्रीभीमस्वामी उवाचः—

" समाधि श्रीसमर्थांची पूर्ण । वर्णून जाले सुखसम्पन्न । श्रवण क-रितां श्रोतेजेन। पावन होती ॥१॥ राजा श्रीशिवछत्रपति । श्रीसमर्थां-सी अतिप्रीति । सज्जनगडीं तेहीं वसती । कराविली ॥२॥ बहुत दि-वस करूनि सेवा। आला कर्नाटकीं यावा । विजई होउनी आपुले गां-वा । प्रवेशले ॥३॥ शंभुराजा प्रतिष्ठिला । श्रीसमर्थदर्शनासी आला। समारंभ थोर केला । यथा परंपरे ॥४॥ याउपरी रुद्र संवत्सरीं। यात्रा चाफळीची बरी । करूनि आले गडावरी । भक्त सर्व ॥५ ॥ दिवाकरें नमस्कार । करितां बोलिले उत्तर । आदिकरुनी वस्त्रपात्र । पत्रीं लि-हिणें ॥ ६ ॥ पत्र प्रसंगानसार । राजासंनिध सत्वर । ठेऊनि बोलावें उत्तर । रघु ऐसियासी ॥७॥ चाफळीं त्या दीपमाळा। दोनी कराव्या विशाळा । उकलूनियां देवालयाला । दृढ करावें ॥८॥ शिवराजें मा-न्य । केलें होतें ह्मणोनि स्मरण । देत जातील अंतःकरण । येरी कर-तील तैसें ॥९॥ त्यास देव देईल बुद्धी । तैसी करितील सिद्धी । ह्म-णऊनि सांगीतलें आधीं । करुणालयें ॥१०॥ संवत्सरीं दुर्मतीं। सज्ज-नगडीं हो इमारती । दोनी सहस्र निष्क प्रीतीं । वेंचले रायें ॥११॥ घर बांधिलें विशाळें । गृहप्रवेश करतिये वेळे । वैशाख मासीं भक्त-पाळे।प्रवेशले॥१२॥तेव्हां बोलिले वचन। आह्मांस राहणें स्वल्प जाण । दहामास संख्या पूर्ण । तेव्हां केली ॥ १३ ॥ माघ व॥ ९ । जाणें आहे परंधामीं । केला निश्चय अंतर्यामीं । भावें ऐसा ॥ १४ ॥ याउपरी बाहेरि येणें । न घडे बहूत बोलणें । श्रीचें कार्य श्रीस्मरणें । करीत जावें ॥ १५ ॥ बुद्धि देईल रघुनाथ । तैसी वर्तणूक सत्य । करणें हें हो श्रुत । न करीं कोण्हा ॥ १६ ॥ घरच्या उत्तरभागीं थोर । देवा-

लय तें थोर। करूनि प्रतिष्ठा रघुवीर। प्रेमें पूजा ॥ १७ ॥ ऐसी पूर्वी आज्ञा केली। ग्रंथसमाप्ति उपरी जाली। मार्गशीर्षमासीं बोली। लिहिल्या तेथें ॥१८॥ आपणामागें भगवंतासी। भज्यत जावें निश्चयेसीं। हें चि मागणें शिष्यासी। आणीक नाहीं ॥१९॥ ऐसें सांगीतलें सर्वांला। वस्त्रें दिधलीं सकळांला। मग आपण हो केला। वस्त्रत्याग ॥ २० ॥ मध्यगृहीं केलें राहणें। नावडे मनुष्य येणें जाणें। पलंगावरी उताणें। तेजील मग ॥२१॥ अन्न पाणी दोन्ही नाहीं। अखंड समाधिस्त पाहीं। भक्तजन लवलाहीं। विनविती ॥२२॥ व्यथा स्वामीअंगीं नसतां। बैसतां जाली अति क्षीणता। बहुतांवरी दया आतां। श्रीची असावी ॥२३॥ हा पर्वत शीतल। येथें राहूं नये पल। गडाखालीं सुस्थल। केलें आहे ॥ २४ ॥ अथवा चाफलासी जावें। परी ए स्थलीं नसावें। कृपालुवें आज्ञा भावें। थोर कीजे ॥ २५ ॥ तेव्हां बोलिले उत्तर। नलगे उपाधि शरीर। खालीं उतरतां स्थिर। देह नव्हे ॥२६॥ जेथें होईल हो प्रांत। तेथ भज्यतील हो भक्त। उच्छाव चाफलीं अद्भुत। राहेल तेव्हां ॥ २७ ॥ ह्मणोन सज्जनगडीं वास। आह्मांस करणें सावकाश। जें होईल देहास। तें घडो येथ ॥ २८ ॥ अनेक वचनें समईचीं। सांगीतलीं नानापरीचीं। रघु नारायण तयाची। जाली सये ॥ २९ ॥ पूर्वीं चाफलीं येउनी। मागीतलें श्रीलागुनी। सिद्ध जालियावरी स्मरण। नाहीं त्यास ॥ ३० ॥ त्यासी एक वेल लिहिणें। पडेल तें चि हो करणें। ऐसें आज्ञापिलें वचन। करुणालयें ॥ ३१ ॥ मल्हार निंबदेव भक्त। समर्थचरणीं हो चित्त। ठेऊनि परळीं येत स्वस्थ। असती भावें ॥ ३२ ॥ तेहीं चवदा मणाच्या मूर्ती। लक्षुमण सीता मारुती। आणि चवथा दाशरथी। रामचंद्र ॥ ३३ ॥ केल्या सत्वर पाठविल्या। केशव निस्पृहीं आणिल्या। माघ व॥ ५ आल्या। महोछाया ॥ ३४ ॥ मध्यरात्रीं सहावे तासीं। समर्थ पाहती त्या मूर्तीसीं। मेण होतें तें नयनासी। तें काढविलें ॥३५॥ श्रीचें मुखावलोकन केलें। परम समाधान जालें। याउपरी आपलें। राहणें न घडे ॥३७॥ अवकाश पांच दिवस। उरला आहे आह्मांस। कोण पूजील हो त्यास। यश घडो ॥ ३६ ॥ करणाराच्या करविल्याच्या। आणिल्याच्या श्रमाचा। प्रसाद जाला सर्वांचा। मनोरथ ॥ ३८ ॥ माघ व॥ ९ । दिवस दोन प्रहर नेमीं। शनवारीं परंधामी। योग केला ॥ ३९ ॥ पलंगाखालीं उतरले। पादुका पाईं लेइले। उत्तर दिसेकडे केलें। मुख बरवें ॥ ४० ॥ भक्तजन

विनविती। पलंगावरी बैसावें ह्मणती। तेव्हां बोलिले हो प्रीतीं। बैसणें नाहीं ॥ ४१ ॥ तुह्मी बैसवाल तरी पहा। ह्मणोनि उचलिती जाण दाहा। शक्तवंत करिती अहा। नुचलती आमुतें ॥ ४२ ॥ करितां बहुत चि यत्न। नुचले अणुमात्र आसन। तेव्हां आज्ञापिलें वचेन। बाहेर बैसा ॥ ४३ ॥ कोण्हीं विचार पुसिला कांहीं। पूर्वीं च सांगीतलें पाहीं। सांगावया आतां कांहीं। उरेचिना ॥ ४४ ॥ माझी काया आणि वाणी। गेली ह्मणाल अंतःकरणीं। परि मी आहे जगजीवनीं। निरंतर ॥४५॥ आत्माराम दासबोध। माझें स्वरूप स्वतःसिद्ध। असतां न करावा हो खेद। भक्तजनीं ॥ ४६ ॥ तीन वेळां स्मरण केलें। अंबर अवघें गर्जिन्नलें। रामनामें कोंदाटलें। जिकडे तिकडे ॥ ४७ ॥ मुहूर्त एक हो गर्जना। गगनीं कोंदाटली हो जाणा। विस्मय पावले निज जना। प्रेम आलें ॥ ४८ ॥ ध्वनी जाली सर्व पूर्ण। जाहला अवतार हो पूर्ण। देशोदेशीं भक्तजेन। जाते जाले ॥ ४९ ॥ स्थलमहिमा अपार। उद्दंड जाले साक्षात्कार। भीम ध्यातो निरंतर। चेरण रज ॥ ५० ॥"

श्रीसमर्थप्रभू समाधी गेला। श्रीसज्जनगिरीं हाहाःकारला। भरतखंडप्रदीप मावळला। कोंदाटला अंधकार भारी ॥ ७० ॥ शके शालिवाहन सोळासें तीन। दुर्मुखनाम संवत्सर पूर्ण। मंदवार माघ वा॥ नउमी सुदीन। माध्यान्हीं परंधामगमन श्रीस्वामियां ॥७१॥ धेनुवत्स हंबरती। तृणजीवना न सेविती। पक्षी नभीं न परिभ्रमती। हाहाभूत चित्तीं प्राणिजात ॥७२॥ भक्तमुखींची उतटली कळा। ज्यात्यासी आली अवकळा। श्रीसमर्थस्वामी बैसला डोळां। दुःखशोकाला न वर्णवें ॥७३॥ थोर थोर महंत। उद्धव अक्का शोकभरित। विचारिती अग्निसंस्कारार्थ। स्थळ निश्चित नेमिलें ॥७४॥ उत्तरसंस्कारविधि। श्रीउद्धव सम्पादिती निरवधी। विशेष पुत्रअपत्यस्थिति। यथानिगुती उद्धवा जोडली ॥ ७५ ॥ श्रीसमर्थसमाधिमंदिर केलें। अस्थीसी चांफळीं संरक्षिलें। पुण्यतिथी माघ वा॥ ९ नेमिलें। महंतीं सकळीं मिळोनि ॥७६॥ श्रीसमर्थप्रभूचें दरुषण। कल्याणा पुन्हां नाहीं जाण। माघ वा॥ ९ लागून। येती ठाकोन सज्जनागिरीतें ॥७७॥ श्रीकल्याण नव-

मिसी येती। श्रीसज्जनगिरी साष्टांगें नमिती। परळीमध्यें वास्तव्य करिती। श्रीसमर्थमूर्ति ' गड ' मानिती ॥७८॥ धन्य कल्याणस्वामींचा भाव। प्रत्यक्ष गड चि भासे स्वामीराव। धन्य धन्य अनन्य भक्तिवैभव। एकनिष्ठेचा भाव एकनिष्ठ जाणती ॥७९॥ श्रीकल्याणएकनिष्ठता। नेणवे थोरथोरां महंतां। तेथ मियां काय करावी वाच्यता। संकोच चित्ता वाटतो ॥८०॥ बाप श्रीगुरुभक्त गोसावी। बाप एकनिष्ठेची थोरवी। एकनिष्ठता श्रीसमर्थकल्याणीं पहावी। नवलनवाई गुरुशिष्य धन्य धन्य ॥८१॥ किती करावा शब्दविस्तार। धन्य स्वामी कल्याण शिष्यवर। कृपा करा जी निज तान्हयावर। भक्तिनिर्धार पढवा कांहीं ॥८२॥ धन्य तुमचें शिष्यपण। धन्य तुमचें श्रीगुरुअर्चन। धन्य तुमचें नामस्मरण। कल्याण होवोन तारितें ॥८३॥ धन्य तुमचें महंतपण। करितसे लहानाहूनि लहान। धन्य वैखरी शुद्ध होवोन। श्रीसमर्थचिंतन करील ॥८४॥ तुह्मीं श्रीसमर्थचरण सेविले। श्रीस्वामीमनोगत तुह्मीं च जाणिलें। कल्याणपदवी पावले। कल्याण जालें जग तुमचेनी ॥८५॥ कल्याण कल्याण। हें चि करावें नामस्मरण। येणें तुष्टेल श्रीसमर्थप्रभू पूर्ण। कल्याण निधान त्रिभुवनीं ॥८६॥ जयजया जी श्रीकल्याणदेवा। तुमचें भजन मज पढवा। दीन रंक आपुला ह्मणवा। श्रीसमर्थचरणीं अर्पिजे ॥८७॥ धन्य तुमचें श्रीगुरुसेवन। धन्य तुमचें पुरश्चरण। धन्य तुमचें अनुसंधान। श्रीगुरूवांचोन अन्य नेणा ॥८८॥ धन्य धन्य तुमचें शुद्ध ज्ञान। धन्य धन्य तुमचें ध्यान। धन्य धन्य तुमचें अवलोकन। श्रीसमर्थावांचोन अन्य नेणा ॥८९॥ श्रीसमर्थसमाधिमंदिर जालें। अस्थी प्रयागीं नेणें राहिलें। बहुतीं बहुवार श्रीकल्याणा पुसिलें। सम्मती वदले हो हो ह्मणोनि ॥९०॥ केशवीं वर्म नाहीं कळलें। तिहीं अस्थीप्रस्थान केलें। डोंबगांवानिकट जंव आले। तों चि परंधामगमन केलें श्रीकल्याणदेवें ॥९१॥ ॐ नमो जी श्रीकल्याणदेवा। तुमचा महिमा तुह्मी च बोलवा। कैसें दाविलें चरित्रवै-

भवा । समाधिसंभवा आचरोनि ॥९२॥ कोण तुमची पुरुषार्थ-थोरी । न देखों ऐसा श्रीगुरुनिष्ठ चराचरीं धन्य धन्य कल्याण दिगंतरीं । केशवा अंतरीं जाणवलें ॥ ९३ ॥ उपरी श्रीसमर्थक-ल्याणअस्थी । घेऊनि चालिले प्रयागाप्रति । क्षणक्षणा श्रीकल्या-णगुण आठवती । श्रीसमर्थ स्मरती क्षणक्षणा ॥९४॥ केशव प्र-यागीं आले । यथाविधी अग्निसंस्करण केलें । श्रीसमर्थकल्याण-चिंतनीं रंगले । ध्यान जडलें सर्व काळ ॥९५॥ श्रीकल्याणमहंती वाढली । शिष्यपरंपरा गाजली । ते तंव न वचे वर्णियली । धन्य मंडळी श्रीकल्याणपरम्परा ॥९६॥ भव्य समाधिमंदिर जालें । तें तंव न वचे वर्णियलें । श्रीकल्याणपुण्यतिथी महोत्साव गाजले । विश्व दुमदुमियलें श्रीकल्याणनामीं ॥९७॥ शके सोळासें छत्तीस । आषाढ अधिक त्रयोदशीस । श्रीकल्याणस्वामी गेले समाधीस । श्रीसमर्थपदवीस श्रीकल्याण शोभले ॥ ९८ ॥ श्रीसमर्थप्रभू गेल्या उपरी । अक्का संस्थान चालवी निर्धारीं । छत्तीस वरुषां माझारीं । संस्थान गजरीं चालविलें ॥ ९९ ॥ श्रीसमर्थआज्ञा-प्रमाण । श्रीउद्धव गेले जांबेलागून । वंशस्थ पुत्रा आले घेवोन । समारंभें करोन पूजन केलें ॥ १०० ॥ श्रीगंगाधरस्वामी सं-स्थापियले । अक्कामाउलीनें सुजाण केलें । अवकाळीं श्रीसं-स्थान संरक्षिलें । मूर्ति संरक्षिली अति दक्षगुणें ॥ १०१ ॥ पुढें अक्काकाल जाला । श्रीउद्धवीं प्रारब्धें देह विसर्जिला । श्री-समर्थकथा सुमनमाळा । प्रसंग अवलीळा वर्णिले ॥ २ ॥ श्री-समर्थचरित्राचा अंत । मज नेणवे तो प्रांत । श्रीसमर्थस्मरणें निवांत । पाय आठवीत बैसलों ॥ ३ ॥ ॐ नमो जी श्रीसमर्थ-स्वामी । तुमचा महिमा नेणों चि आह्मी । धरा उद्धरावया तु-ह्मी । येतसां अवनीं युगायुगीं ॥ ४ ॥ कैसें अवतारचरित केलें । दिगंतीं कीर्तिमंदिर उभारलें । अमर सुरवर वंदूं लागले । गंधर्व करिती गुणगायन ॥ ५ ॥ अखंड बाळब्रह्मचर्य दाविलें । जें

इतरां कोणा न वचे केलें । उपरी दृढ तप आरंभिलें । टाकळीं सन्निध पंचवटी ॥ ६ ॥ तपःसामर्थ्य प्रत्यक्ष घडलें । श्रीरघुनाथ हृदईं प्रगटले । असुर दानव थरारिले । धर्मसूर्य उगवला ॥ ७ ॥ महाभाग ऐसा डंका गाजला । अमोघ जनसंघ कांसे लागला । तितुका हि भवपार उतरिला । काळ आणिला शरणागत ॥ ८ ॥ संत महंत महानुभाव । जयाच्या पायीं लागती निगर्व । कथाकीर्तन महोत्साव । सोहळा समारंभ भजनाचा ॥ ९ ॥ ह्मणती कलियुग कैचें काईं । वैकुंठ येथ तंव रुळे पायीं । यमधर्मासी ठाव नाहीं । अमर केलें श्रीरामनामें ॥ ११० ॥ श्रीरामनवमी वाढविली । साधुसभा गाजविली । पापतापदैन्यें आघवीं पळविलीं । धरा केली पवित्र ॥ ११ ॥ शिवभूपती शरण आला । भाव जाणोनि अंगिकारिला । मग सिंहासनीं स्थापिला । धर्म रक्षिला भूमंडळीं ॥ १२ ॥ ऐसा श्रीरामदास गुणगंभीर महिमा जयाचा अतर्क्य अपरंपार । स्वामी श्रीमहारुद्रावतार । तो चि नटला दासरूपें ॥ १३ ॥ ह्मणोनि श्रीरामदासनामनौके शिरावें । मग संसारसिंधु सहज तरावें । कामक्रोधादिक हेलावे । कदा अंगीं न पवती ॥ १४ ॥ श्रीरामदास पदीं लोटांगण । घालितां साष्टांगभावें पूर्ण । तेणें जन्मांतरींचे दोष दहन । सहजें होतीं जाण पां ॥ १५ ॥ असो आतां नवल ख्याती । श्रीसमर्थदेवें वोवीचिये रीती । मज मूर्खाहातीं करविली पदपद्धती । येरव्हीं मी टोणपा ॥ १६ ॥ जयजया जी श्रीस्वामी समर्था । येथोनि मज प्रवर्तवावें परमार्था । जन्मोजन्मीं हे चि आस्था । शरणागत तुमचा मी ॥ १७ ॥ धन्य पारळें[1] नगरनाम क्षेत्र जाणा । तेथें नांदतो श्रीपारेश्वर कैलासराणा । शुकसनकादि येति नित्य दर्शना । भीमू जाणा रंक तेथें ॥ १८ ॥ श्री-

---

१ ग्रंथकर्त्याचें मूळ वसतिस्थान. हें मोगलाईंत औरंगाबादेजवळ वैजापूर तालुक्यांत आहे. येथून वेरूळ दौलताबाद १२ कोसावर आहे.

तुकारामप्रभु वैकुंठीं गेला । त्याचा प्रसाद श्रीनिळोबा लाधला । तेणें श्रीशंकरस्वामी अनुग्रहिला । क्षेत्रशिऊराला पुण्यतिथी गाजे ॥ १९ ॥ तेथील माझी माता । श्री गंगा देवी अत्यंत पवित्रा । तिनें जन्म देवोनि सत्वरता । वैकुंठपंथा आक्रमिलें ॥ १२० ॥ बहुत आबाळ जाली । अवकळा हि बहुकाळ भोगिली । भगिनी मैथुरेसीं करुणा उपजली । धांव घेतली स्नेहभरें ॥ २१ ॥ पूर्वील ऋणानुबंध मोठा । भेटला विश्वनाथ कुरुठा । अमरावती आणिलें हटातटा । विद्यापीठा पाठविलें ॥ २२ ॥ श्री विश्वनाथ दयाळु भारी । तेणें अंगिकार करूनि सत्वरीं । पित्यापरीं संरक्षण करी । लौकिकाचारीं बैसविलों ॥ २३॥ उपरी श्रीसमर्थप्रभु आठवला । जन्मांतरींचा भजनमार्ग उजळला । श्रीगुरु श्रीधरु लाधला । कृपें बोळला मजवरी ॥ २४ ॥ जनीं सर्वस्वीं वाळिला । परि मजसीं निजनिष्ठें बोलला । श्रीचरणीं वेधु लाविला । श्रीसमर्थचरणाला शरणागती ॥ २५ ॥ श्रीधरकृपा जाली । उपरी तीर्थयात्रा आदरिली । हिमालयीं तीर्थक्षेत्रें धुंडिलीं । स्थळें अवलोकिलीं परम रमणीय ॥ २६ ॥ उपरी घेतलें श्रीसेतुबंधदर्शन । दक्षिणेंतील सिद्ध सिद्ध स्थान । साष्टांगें आलों वंदून । श्रीपंढरीराणा वंदिला ॥ २७ ॥ श्रीसमर्थगुणीं चित्त वेधलें । श्रीशंकर श्रीकृष्णें अनुमोदिलें । माझें प्रेम विशेष दुणावलें । आरंभिलें श्रीचरित्रा ॥ २८ ॥ श्रीसमर्थीं श्रीशंकरीं स्नेहभरीं । मज उल्हास दिधला परोपरी । चरित्र वदविलें वैखरीं । संत साचोकारी शंकर श्रीकृष्ण देव ॥ २९ ॥

---

१ ग्रंथकर्त्याचें हें मातुळ, पारळ्याहून तीन कोसावर आहे. २ ग्रंथकर्त्याचें दीड वर्षाचें वय असतां च मातृवियोग घडला. ३ ग्रंथकर्त्याची वडील वहीण. ४रा. विश्वनाथ नरहर माटेगांवकर. ग्रंथकाराचे मेहुणे. यांनीं ग्रंथकर्त्यास इ. स. १९०१ च्या जानेवारींत उमरावतीच्या मराठी शाळेंत शिक्षणास पाठविलें. ५ इ. स १९०९ त हिमालयाची यात्रा. ६ इ. स. १९११ त श्रीसेतुबंधयात्रा. ७ ज्येष्ट व. ४ शके १८३५ रोजीं श्री. देवांचे कृपापत्रानें चरित्रलेखनास आरंभ केला.

धन्य 'देवां'चें भक्तिमहिमान । जडलें श्रीसमर्थचरणीं अनुसंधान । सर्वकाळीं दिधलें श्रीचरणीं चित्त वाहोन । श्रीसमर्थकाव्यनिधान प्रगट करिती ॥ ३० ॥ त्या श्रीशंकरश्रीकृष्णचरणीं । ज्यां अनन्यभावें घेतली लोळणी । धन्य देवा तुमची करणी । श्रीसमर्थकृपा पूर्ण तुह्मां जोडली ॥ ३१ ॥ आतां नमन असो संतसज्जना । श्रीबाळा[1]महाराज श्रीमल्हारी[2]चरणा । नमन त्या मंगरूळीच्या श्रीगजानना[3] । अनन्य भावना वंदिलें हो ॥ ३२ ॥ आतां वंदू श्रीसदाशीवबावा[4] । जो माझा परम सौख्यनिधानठेवा । ज्यासी सर्वकाळीं श्रीसमर्थभजनीं हेवा । वैराग्यवैभवा सप्रचीत जो ॥ ३३ ॥ वारंवार धांवला । मज परमार्थीं सहाय्यभूत जाला । नानापरी बोध केला । श्रीधरचरणाला विनटविलें ॥ ३४ ॥ श्रीदत्तात्रयउपासना । उत्कट आचरोनि दाविली जना । त्या पुण्यवंत बाळकृष्ण[5]चरणा । भावें वंदना केलें हो ॥ ३५ ॥ नित्यनेम उपासना । संप्रती पाहतां आडळेना । ते निर्धारोनि आणिली मना । भगवद्भजना बाळकृष्णें राखिलें ॥ ३६ ॥ बाळकृष्णाचे संगतीं । मज धणी वरी तृप्ति होती । पुण्यकीर्ति केली जगतीं । कीर्तनांतीं देह विसर्जिला ॥ ३७ ॥ बाळकृष्णें झणीं तनुत्याग केला । तो मज विरह दाटला । माझिया श्रीचरित्रश्रवणाला । महीतळाला बाळकृष्ण नाहीं ॥३८॥ आतां नमन असो त्या वामनचरणा । ज्यासी उदंड प्रीति श्रीसमर्थगुणवर्णना । मज हि सर्वस्वीं साह्य-

---

१ मेहेकरकर श्री बाळाभाऊ पितळे, पंढरीचे वारकरी, अधिकारी पुरुष, ग्रंथकाराचे परम स्नेही. २ श्री मल्हारीबुवा, नाशकानजीकचे रहिवासी, अधिकारी वारकरी, ग्रंथकर्त्यांचे प्रेमी. ३ वर्धा जिल्ह्यांत घोन्हाड येथील प्रसिद्ध श्रीकेजाजी महाराजांचे अधिकारी शिष्य व प्रसिद्ध कीर्तनकार, ग्रंथकर्त्यांचे प्रेमी, मंगरूळदस्तगीरचे रहिवासी. ४ परमार्थमार्गांतील परम सहकारी स्नेही रा. सदाशिव जनार्दन खोत, नागपूर. ५ बाळकृष्ण राजाराम कहाते, अत्यंत सत्वशील पुरुष, यांनीं दिवसभर सर्व व्यवहार नित्याप्रमाणें करून रात्रौ ह. भ. प. यादवराव शिंदखेडकरांचें रसाळ कीर्तन ऐकल्यावर दीड तासांनें सहज रीतीनें देह ठेविला.

भूत जाणा । दया अंतःकरणा वामनाच्या ॥ ३९ ॥ नमूं ज्येष्ठ बंधु श्रीखंडेराव । ज्यासी श्रीकृपें सम्प्रचीत प्राप्त वैभव । श्रीसमर्थभजनीं पूर्ण अनुभव । चित्रकौशल्यगौरव श्रीसमर्थाकारणें ॥ ४० ॥ शालिवाहन शके १८३८सोत्तरीं । अनलनाम संवत्सरीं । मार्गशीर्ष शुद्ध ११दशी माझारीं । फणीपुरीं[2] ग्रंथ सम्पादिला ॥ ४१ ॥ श्रीरामदासकथासारामृत । सावधान संतश्रोते परिसोत । श्रीधरचरणीं भीमु विनवीत । निजकृपामृत तुमचें हें ॥ ४२ ॥ इति श्रीरामदासकथासारामृत । भीमुविरचितायाम् । श्रीसमर्थसमाधिगमनन्नाम अष्टादश प्रसंग सम्पूर्णमस्तु ॥ शुभं भवतु ॥ श्रीसमर्थरामदासार्पणमस्तु । श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल । श्रीज्ञानदेव तुकाराम ॥ श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज की जय ! !

यदक्षरं पदभ्रष्टं मात्राहीनं च यद्भवेत् ।
तत्सर्वं क्षम्यतां देव राघवाय नमोस्तु ते ॥ १ ॥

अक्षरबिंदुमात्राणि पदपादाक्षराणि च ।
न्यूनानि चातिरिक्तानि क्षम्यतां परमेश्वर ॥ २ ॥

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेत्शिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ ३ ॥

भग्न पृष्ठ कटि ग्रीवा स्तब्धदृष्टिरधोमुखम् ।
कष्टेन लिखितं ग्रंथं यत्नेन परिपालयेत् ॥ ४ ॥




---

१ ग्रंथकर्त्यांचे ज्येष्ठ बंधु उपजत कुशाग्र चित्रकार, श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं ५० रु. दरमहा स्कॉलरशिप पांच वर्षे देऊन पुण्यास प्रो. पिंपळखरे यांचेकडे चित्रकला शिकण्यास ठेविलें. गेल्या सालांत त्यांच्या भाऊबंदांचे आपत्तींतून श्रीसमर्थकृपें सर्व मालमत्ता निजाम सरकारांनीं त्यांची त्यांस परत दिली.

२ नागपुरास.